ॐ

श्रीपरमात्मने नमः ।

# जैनधर्मादर्श.

लेखक

रावजी नेमचंद शहा, सोलापूर.

प्रकाशक

वालचंद कस्तुरचंद गांधी.

आवृत्ति १ ली, प्रती १,०००



"श्रीदत्तप्रसाद" छापखान्यात छापिले

श्रीमहावीर निर्वाण संवत् २४३७, सन १९१०.

किंमत १ रुपया.

# प्रस्तावना.

श्रीमत्परमगंभीरस्याद्वादामोघलांछनम् ॥
जीयात्त्रैलोक्यनाथस्य शासनं जिनशासनम् ॥१॥

धार्मिक व सामाजिक उन्नति करण्याची व्याख्यान व ग्रंथप्रसार हीं दोन मुख्य साधनें आहेत. 'नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण' या न्यायाने सध्यां आपला जैनसमाज हा देशातील इतर समाजाबरोबरच अवनतीच्या फेऱ्यात सापडला आहे. जैनधर्मासंबंधानें हल्लीं चोहोकडे अनवस्था दिसून येत आहे. याचे कारण उन्नतीच्या साधनाचा अभाव होय. प्राचीनकाळी धर्मोन्नतीची योग्य साधने पुष्कळ होती. हजारो दयाळु निर्ग्रंथ मुनी सर्वत्र विहार करून धर्मोपदेश करीत असत. त्याच्या विद्वतेच्या व तपश्चरणाच्या प्रभावामुळे त्याचा धर्मोपदेश लोकांच्या मनात चांगला ठसत असे, आणि त्यायोगाने लाखो लोक कुमार्गाचा त्याग करून सन्मार्गास लागत असत. कालवैपरित्यामुळे आतां तसले गुरु कोठेंहि पाहवयास मिळत नाहींत. त्यांतल्यात्यात समाधानाची गोष्ट इतकीच की, त्यानी अत्यंत परिश्रमानें लिहून ठेवलेले ग्रंथ अजून कोठेंतरी दृष्टीस पडतात. आमच्या पूर्वाचार्यांनी नानाप्रकारचे ग्रंथ, शास्त्रे रचून धर्मसंरक्षणाचा उपाय अमलात आणिला नसता तर या पंचमकालात जैनधर्म जिवंत राहिला असता की नाही याची शंकाच आहे. कोणत्याहि लोकांच्या उन्नतावस्थेची जी अनेक व्यंजकें आहेत त्यांपैकी त्याचा ग्रंथसंग्रह हे एक आहे. पूर्वीपासून आमच्या लोकाची ग्रंथप्रसिद्धि व संशोधन यांकडे फारशी प्रवृत्ति नसल्यामुळे आमचा बराचसा अमूल्य असा ज्ञानभांडार अज्ञातावस्थेत आहे. आमची वाङ्मयप्रसिद्धि-संशोधन-अभिवृद्धि यासंबंधाने पाश्चात्यानी खटपट करावी व सन्मार्गदर्शक गुरूच्या ठिकाणी असलेले अमूल्य हे ग्रंथ आज आमच्या अनादरामुळें जेथल्यातेथेंच

बंधनांत सडून जावेत हें कालवैपरित्याचेच निदर्शक होय! आमच्या या कृतीने पूर्वाचार्यांचे प्राचीन उपयुक्त ग्रंथ कितीतरी नष्ट झाले आहेत! आणि त्यायोगानें आमच्या वाङ्मयाचे जे नुकसान झाले ते भरून येण्यासारखें नाही. आमच्या पूर्वाचार्यांनीं व विद्वान पंडितांनी न्याय, व्याकरण, काव्य, ज्योतिष, तर्क, गणित, वैद्यक वगैरे अनेक उपयुक्त विषयांवर गीर्वाणभाषेंत लिहिलेले ग्रंथ आज उपलब्ध आहेत. धर्माच्या बाबतीत आपणास जें मोठे महत्वाचें कार्य करावयाचे आहे ते हें कीं, आमचें वाङ्मय संस्कृतच्या मोहोरबंद गंगाजळींतून काढून सामान्य लोकांची लिहिण्याबोलण्याची जी भाषा आहे त्या भाषेच्याद्वारे बहुजनसमाजाला सुलभ करून देणे हें होय. शेकडो आध्यात्मिक ग्रंथ अद्यापि आहेत त्याच निगूढ स्थितींत आहेत. या ग्रंथाचा आस्वाद बहुजनसमाजास मिळावा ह्मणून ते ग्रंथ साध्या व सोप्या भाषेंत लिहिले पाहिजेत. त्याचप्रमाणें सुशिक्षित समाजावर धर्मतत्वाचे वजन पडण्यास नव्या तऱ्हेने व तुलनात्मक पद्धतीने त्या विषयाचे प्रतिपादन केले पाहिजे. तसेच जैनधर्म व जैनतत्वज्ञान यांविषयीं जैनांचे व जैनेतरांचे जे गैरसमज झाले आहेत ते नाहींसे होऊन आपल्या धर्मग्रंथाची सनातनता व उदात्त तत्वज्ञानाची ओळख सर्व जगाच्या निदर्शनास यावी अशी जर आपली महत्वाकांक्षा असेल, तर जैनधर्माचा दृढ व्यासंग करून ऐतिहासिकदृष्टीने त्याचे पूर्ण मंथन करून त्याचें सार सोप्या गद्यभाषेत तयार करणें हें समाजांतील पदवीधर संस्कृत पंडितांचे कर्तव्य आहे. सारांश, जनतेमध्ये खऱ्या ऐतिहासिक ज्ञानाचा प्रसार करून जैनग्रंथांची अनेक भाषेत रूपांतरें केली पाहिजेत. अशा तऱ्हेचे प्रयत्न केल्यासच जैनवाङ्मयाची खरी सेवा केल्याचे श्रेय मिळून सामाजिक व धार्मिक उन्नति होईल. असो. प्रस्तुतचा अल्पसा प्रयत्नहि याच दृष्टीनें केलेला आहे. सर्वसाधारण जनसमूहास जैनधर्मांची मूलतत्वें थोडक्यांत सुलभ रीतीने समजावीत, व जैनधर्मासंबंधानें जे कांही लोकांचे—विशेषतः पाश्चात्यांचे—गैरसमज झाले अस-

तील ते नाहीसे व्हावेत या प्रेरणेने प्रेरित होऊन हा लेखक 'जैन-धर्मादर्श' महाराष्ट्र वाचकांस सादर करीत आहे.

'जैनधर्मादर्शा'चे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग केले आहेत. बाबू बनारसीदास एम, ए, एल्, एल्, बी. यांनीं सन १९०१ साली मथुरेच्या धर्ममहोत्सवामध्यें 'जैनधर्म' या विषयावर एक इग्रजींत व्याख्यान दिले होते. तें व्याख्यान इग्रजीत छापून प्रसिद्ध झालें आहे. व त्याचे विस्तारपूर्वक असे भाषांतर हिंदी भाषेत बाबू देवीसहाय यांनी छापून प्रसिद्ध केलें आहे. ह्या दोन्हीं पुस्तकांच्या साहाय्यानेच या जैनधर्मादर्शाचा पूर्वार्ध लिहला आहे. उत्तरार्ध हा बहुतेक स्वतत्र असून त्यामध्ये जैनधर्माचे सिद्धात व तत्वज्ञान याचे विवेचन केले आहे. यातील ऐतिहासिक माहितीसबधानें जेथे शका येईल तेथें मूळ पुस्तक पाहून शका निवारण करून घ्यावी. कारण प्रस्तुत लेखकानें त्या व्याख्यानाचे मराठी रूपातर करून प्रसिद्ध केले आहे. या पुस्तकाच्या वाचनाने जर लोकास या विषयाची गोडी लागल्याचे दिसून येईल तर पुस्तक लिहण्याचे साफल्य होऊन अशा तऱ्हेची जनसेवा करण्यास त्यास पुढे जास्त उमेद येईल. अपुरा वेळ, अपुरी माहिती व अपुरे बुद्धिसामर्थ्य या सगळ्या साहित्याच्या मिसळण्यानें तयार केलेला हा पुढे वाढलेला पदार्थ आहे, हें लक्षांत ठेवून रसज्ञानीं याला बोट लावावयास प्रवृत्त व्हावें अशी वाचकांस विनति आहे. या ग्रथांत कोठें निष्कारण पाल्हाळ झाला असेल, कोठें व्हावें त्यापेक्षा अपुरतें विवरण झाले असेल व कोठें पुस्तककर्त्यांच्या हेळसाडीमुळे किंवा सकुचित वाचनामुळें व माहितीमुळे कांहीं गोष्टी अजिबात राहण्याचा सभव आहे. अशा प्रकारच्या प्रमादाबद्दल विद्वान व विचारी वाचकवृद क्षमा करील अशी आशा आहे. कारण आमचा हा पहिलाच प्रयत्न आहे आणि त्यामुळे यामध्यें बरेच दोष असण्याचा सभव आहे. तरी वाचकास विनति हीच आहे की, कोणाच्या नजरेस यांतील दोष आल्यास त्यानीं ते मेहेरबानगी करून आह्मांस कळवावेत. ह्मणजे पुढील आवृत्तींत सुधारणा करण्यास ठीक पडेल.

हें पुस्तक केवळ जैनधर्मियाकरितांच लिहिले आहे असे नाही; तर अन्यधर्मियाना सुद्धा यापासून बराच बोध घेता येण्यासारखा अस ल्यामुळे त्यांना सुद्धां हें बरेच उपयुक्त होईल, अशी आमची समजूत आहे.

हें पुस्तक रा. रा. **कृष्णाजी प्रभाकर खाडीलकर बी. ए. केसरीचे माजी संपादक,** व रा. रा. **सीताराम केशव दामले बी. ए. एल्. एल्. बी.** यानीं वाचून पाहून ज्या काहीं उपयुक्त सूचना केल्या त्याबद्दल हा लेखक त्याचा कृतज्ञतापूर्वक आभारी आहे. तसेच श्रीयुत **नेमचंद वालचंद गांधी वकील** यानीहि हें पुस्तक मोठ्या आनदाने तपासून देऊन प्रसिद्ध केल्याबद्दल हा लेखक त्याचा फार ऋणी आहे.

सरते शेवटी, भवतारक जिनवाणीचे ( जैनवाङ्मय ) सेवेंतच या लेखकाचा जन्म सफळ होवो अशी मगलमय प्रार्थना करून हा लेखक वाचकाची रजा घेतो.

श्रीवीरनिर्वाण संवत् २४३७
विक्रम सवत् १९६७
तारीख १९।१२।१९१०.

**रावजी नेमचंद शहा,**
**सोलापूर.**

# अर्पणपत्रिका.

परलोकवासी तीर्थरूप परमपूज्य आजी

**जमनाबाई पानाचंद शहा**

यांस

त्यांच्याठायीं वसत असलेली अढळ स्वधर्मनिष्ठा,
सत्यप्रीति, परोपकारबुद्धि, उद्योगप्रियता,
औदार्य, कर्तव्यदक्षता, सदाचारप्रीति

व

नेहमीची साधीवृत्ति
इत्यादि गुणांच्या स्मरणार्थ

हें पुस्तक

त्यांच्या उपकारबद्ध लेखकानें
परमादरपूर्वक अर्पण केलें आहे.

ग्रंथकर्ता.

रावजी नेमचंद शहा,
कुरूलकर.

# अनुक्रमणिका.


| विषय. | पूर्वार्ध. | पृष्ठ. |
|---|---|---|
| उपोद्घात | .... .... .... .... | १– ६ |
| जैनासंबंधाने आपल्या लोकांचे गैरसमज | .... | ६– ७ |
| पाश्चात्याचे विचित्र गैरसमज | . . .... | ७– ९ |
| गैरसमज होण्याची कारणे. | . ... | ९–११ |
| जैन शब्दाची व्युत्पत्ति व अर्थ | .... . . | ११–१२ |
| जैनाची प्राचीनता | .... . .... | १२–१३ |
| जैनधर्म बुद्धमताची शाखा नव्हे | .. ... | १३–१५ |
| हिंदुशास्त्र | ... .. .... .... | १५–२६ |
| बौद्धमताचे ग्रंथ | .... . .... | २६–२९ |
| बौद्धधर्माची उत्पत्ति (जैनशास्त्रातील) ... | ... | २९–३२ |
| बुद्ध हा महावीराचा शिष्य नव्हता | ... ... | ३२–३३ |
| बुद्ध हा महावीराचा समकालीन होता ... | .. . | ३३–३६ |
| जैनाचे विशेष प्राचीनत्व ... | ... .... | ३६–३७ |
| जैनधर्म हा ब्राह्मणधर्मापासून निघाला नाही | .... | ३७–३९ |
| चार्वाकाची मते | ... ... .... | ३९–४३ |
| जैनशास्त्रातील प्राचीन भारतवर्ष | . .... | ४३–४४ |
| प्रो. मोक्षमुल्लर साहेबाचे मत | ... .... | ४४–५१ |
| जैनधर्माचे संस्थापक पार्श्वनाथ नव्हेत तर ऋषभदेव हे होत. बौद्धग्रंथ .... | ... | ५१ |
| जैनशास्त्र व हिंदुशास्त्र | . .... | ५२ |
| मथुरेमधील शिलालेख | .... . . | ५७–६० |
| योगदर्शन | .... .... .... .... | ६०–६७ |
| सांख्यदर्शन | .... .... .... .... | ६७–७० |
| महाभारत | .... .... .... .... | ७१–७४ |
| चार्वाकदर्शन | .... ... .... | ७४–७६ |
| | **उत्तरार्ध.** | |
| जगत्कर्तृत्वमीमांसा | ... .... .... | ७७–८० |
| जीवतत्व | .... .... .... .... | ८१–८६ |
| अजीवतत्व–धर्मद्रव्य, अधर्मद्रव्य, आकाशद्रव्य, कालद्रव्य | | ८६–९२ |

| विषय. | पृष्ठ. |
|---|---|
| आस्रवतत्व .... .... . .... | ९३-९५ |
| बंधतत्व .... .... .... .... | ९५-१०२ |
| संवरतत्व .... .... .... .... | १०२-१०८ |
| निर्जरातत्व ... ... .... .... | १०९-११० |
| गुणस्थान .... .. .... .... | ११०-११५ |
| मोक्षतत्व .... .... .... .. | ११५-११९ |
| आठ कर्मे —ज्ञानावरणकर्म.... .... .... | ११९-१२३ |
| दर्शनावरणीकर्म... .... .... | १२३-१२४ |
| वेदनीयकर्म .... .... .... .... | १२४-१२६ |
| मोहनीकर्म ... ... ... .... | १२६-१२८ |
| आयुकर्म ... .... .... . | १२८-१३० |
| नामकर्म व षोडशकारणभावनावर्णन . . ... | १३०-१३६ |
| गोत्रकर्म .... .. .... .... | १३६-१३७ |
| अंतरायकर्म .... .. .... ... | १३७-१४० |
| ज्ञानावरणादि कर्मांची आठ चित्रे ... | १४०-१४८ |
| जैनांचे तत्वज्ञान व कालवर्णन .... ... | १४९-१६१ |
| रत्नत्रयी .... .... ... .... | १६१-१६९ |
| एकादशप्रतिमावर्णन .... ... .... | १६९-१८३ |
| दशलक्षणीधर्म .... .... .... . . | १८३-१८७ |
| द्वादश अनुप्रेक्षा .... ... ... | १८७-१९३ |
| गृहस्थी श्रावकांची षट्कर्मे... ... ... | १९३-१९४ |
| संस्कार अथवा क्रिया व श्रावकधर्म .... .. | १९४-१९५ |
| मुनींचे चारित्र .... .. .... .... | १९५-१९९ |
| ध्यान व पदस्थध्यानाचे कमळ ... ... | १९९-२०१ |
| जैनसाधू नग्न का असतात व जैनलोक नग्न मूर्तींची पूजा कां करितात ? ... .... .... | २०१-२०८ |
| सप्तभंगीनय .... .... .... ... | २०८-२१५ |
| उपसंहार .... ... .... .... | २२४-२३२ |
| परिशिष्ट .... .... .... .... | १-८ |

ॐ

श्रीपरमात्मने नमः

# जैनधर्मादर्श

## पूर्वार्ध.

**यो विश्वं वेद वेद्यं जननजलनिधेर्भंगिनः पारदृश्वा ।**
**पौर्वापर्याविरुद्ध वचनमनुपमं निष्कलंकं यदीयम् ॥**
**तं वन्दे साधुवन्द्यं सकलगुणनिधिं ध्वस्तदोषद्विषन्तम् ।**
**बुद्धं वा वर्धमानं शतदलनिलयं केशवं वा शिवं वा ॥**

—( श्रीमद्भट्ट अकलंकदेव. )

जाणण्यास योग्य अशा सगळ्या विश्वास ज्याने जाणिले, ससार-रूपी महासागराच्या लाटापलीकडचे ज्याला दिसतें, ज्याची वचने परस्परांशीं अविरुद्ध, अनुपम आणि निर्दोष आहेत, जो सकळ गुणांचा निधि, जो साधूनाहि वद्य, ज्याने रागद्वेषादि अठरा दोषांना जिकून ठेविले आहे, आणि ज्याला शेंकडो लोक शरण येतात असा जो कोणी महात्मा त्याला माझा नमस्कार असो; मग तो परमात्मा शिव असो, विष्णु असो, बुद्ध असो, किंवा वर्धमान असो.

सभ्य गृहस्थहो, मी आज माध्यान्हाच्या वेळीं आपल्यासमोर ज्या धर्मावर व्याख्यान देण्याकरितां उभा राहिलो आहे त्याचा उपदेश भारतवर्षामध्ये फार प्राचीनकाळीं क्षत्रियांनी केला होता. त्या धर्माचा उपदेश ब्राह्मणानीं केला नव्हता, वैश्यानीं केला नव्हता, अथवा शूद्रांनीहि नव्हे तर क्षत्रियांनीं केला होता असें माझे ह्मणणे आहे. मी आपल्यासमोर ज्या धर्मासबधाने बोलावयाला उभा राहिलो आहे त्याचा उपदेश ज्या क्षत्रियानी केला ते क्षत्रिय प्राण्याची शिकार करणारे

नव्हते, अथवा यज्ञांमध्यें हिंसा करणारे नव्हते अगर ते जीव भक्षण करणारे नव्हते तर ते क्षत्रिय असे होते कीं, ज्यांनीं सर्व जगामध्यें

**अहिंसा परमोधर्मः, हिंसा सर्वत्र गर्हिता**

अर्थात्, कोणत्याहि प्राण्याचा वध करूं नका, असा दांडोर पिटविला होता. कोणत्याहि प्राण्याला त्रास देऊं नका, कारण हिंसेचा सर्वत्र निषेधच केला आहे आणि हाच परमधर्म आहे. हाच सर्वोत्कृष्ट धर्म आहे. अथवा ते क्षत्रिय असे ह्मणत असत, कीं, " मला कोणी धक्का दिला, ठोसा मारिला, धमकावणी दिली, बुक्की मारिली, डाग दिले, गांजणूक केली, अथवा ठार केले तर मला जसें दुःख होते, व केश उपटल्यापासून तो मरेपर्यंत जे दुःख व जी यातना होते, तशाच प्रकारचे दुःख व यातना, इतर सर्व प्राण्यांना वाईट रीतीने वागविले असतांना त्यानाहि होते हें पक्कें ध्यानात ठेवावे. आणि ह्यामुळेच कोणत्याहि प्राण्यांना ताडन करूं नये, त्यांच्याशीं निर्दयपणाने वागू नये, शिव्या देऊं नयेत, दुःख देऊं नये, व ठार करूं नये."

सभ्यगृहस्थहो, मी आज माध्यान्हाच्या वेळीं ज्या धर्मावर बोलण्याच्या उद्देशाने उभा राहिलो आहे त्या धर्माची कीर्ति मुके प्राणी, गायी, बकरी, मेंढ्या, कोंकरीं, कोंबड्या, व कबुतरें, व सर्व सजीव प्राणी व पक्षी आपल्या मुक्या वाणीने गातात. हजारो वर्षांपासून ज्याने मुक्या प्राण्यांचा पक्ष उचलला आहे असा हा जगामध्यें एकच धर्म आहे. बलिदान, आहार, शिकार, अथवा अशा प्रकारचा जीवहिंसा करण्यास सांगणारा स्वार्थप्रेरित कसलाहि विधि कां असेना, त्या सर्वांचा निषेध करणारा असा हा एकच धर्म होय. व "अहिंसा परमोधर्मः" या तत्वाला पूर्णपणे अनुसरणाराहि हा एकच धर्म होय. हें तत्व दृढतेनें व श्रद्धेने शेवटास ह्याच धर्माने नेले आहे.

**तीनभवनमे भर रहे थावर जंगम जीव ।**
**सबमत भक्षक देखिये, रक्षक जैन सदैव ॥**

हा दोहा अर्थपूर्ण करून जैनांनींच फक्त दाखविला आहे. आणि ह्याच

धर्मानें शेंकडो लोकांना आपले अनुयायी बनवून असंख्यात प्राण्यांचे जीव वांचविले आहेत. यदाकदाचित् हेच लोक मांसहारी बनते तर ह्यांच्या भक्ष्याकरितां त्यांचा वध करावा लागला असता, तसेच हेच लोक जर बलिदान अथवा शिकार अशा निंद्य व्यसनाला बळी पडले असते तर त्यांच्याकरिता ह्मणून लाखो प्राण्यांची आहुति द्यावी लागली असती.

सभ्यगृहस्थहो, ऋषीश्वर ऋषभदेवाने ज्या अवसर्पिणी कालामध्ये पहिल्याने ह्या धर्माचा उपदेश केला तेंव्हापासून तो यावत्कालपर्यंत ज्या दयामय जैनधर्मानें सहस्रावधि लोकांना आपले अनुयायी बनवून जीवांचे संरक्षण केले त्या धर्मासंबधाने मी आपणाला चार शब्द सांगणार आहे. इतकेंच नव्हे पण ह्याच धर्माने परधर्मी राजांच्या व बादशाहाच्या अंत:करणांमध्ये दयेचा पाझर फोडून त्याच्याकडून जेथें जेथें जैनाची वस्ती आहे त्या त्या ठिकाणी हिंसा न करण्याबद्दलचे हुकूम व आज्ञापत्रें सोडावयास लाविले. बर्फाच्छादित अशा हिमालयापासून ते थेट कन्याकुमारीपर्यंत व इकडे गुजराथपासून ते बहारप्रांतापर्यंत सुप्रसिद्ध अशा अशोकराजासारख्यां ( राजतरंगिणी, आय-

---

१ कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कालेजांतील मुख्य संस्कृताध्यापक आणि पालीभाषेंतील पंडित प्रो. **सतीशचंद्र विद्याभूषण** हे ता. २४ नोवंबर १९०३ च्या आपल्या पत्रांत ह्मणतात "अशोक राजा हा बौद्धधर्म स्वीकारण्यापूर्वी जैनधर्मी होता असे स्पष्टपणे जरी कोठें ह्मटले नाहीं, तरी महावंश नामक बौद्धग्रंथांत त्याचा आईकडून व स्त्रीकडून जैनाशीं संबंध लागत असे असें ह्मटलें आहे. अशोक बौद्धधर्म स्वीकारण्यापूर्वी, ह्मणजे त्याचा बाप बिंदुसार हा विद्यमान असता अवंति येथें व्हाइसराय उर्फ प्रतिनिधि होता हे प्रसिद्धच आहे. अशोकाची आई व स्त्री ही एका श्रेष्ठीची मुलगी होती. त्या काळचे श्रेष्ठी अथवा व्यापारी बहुधा जैन होते. यावरून अशोक हाही जैनधर्मी असावा असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

२ अशोकराजासंबधानें "**जैनहितैषी**" मासिक पत्राचे विद्वान संपादक श्रीयुत **नाथुराम प्रेमी** हे आपल्या पत्रात लिहितात:— इसवीसना-

निअकबरी, अशोकअवधान, गिरीनारावरील शिलालेख व जैनदंतकथा ह्यांवरून बौद्ध होण्याच्या पूर्वी तो जैनधर्मी होता ) जैनराजानीं कोणत्याही कारणाकरिता प्राण्यांची हिंसा वरील प्रांतांत करू नये असे जाहीर केलें होतें, ही गोष्ट इतिहासावरून कळते. व तसेच अकबरासारख्या बलाढ्य व निःपक्षपाती राजानीं सुद्धां जेथें जेथे जैनांची वस्ती आहे त्या त्या ठिकाणीं पजूसणाच्या दिवसात प्राणीवध करू नये ह्मणून हुकूम सोडिले होते अशीहि पण इतिहासावरून माहिती उपलब्ध होते. ( फरमान १ परिशिष्ट न. १ पहा ) मेवाडामधील दहा हजार गांवाचे अधिपति महाराज श्रीराजसिंहासारख्या हिंदु राजानीहि आपल्या मंत्री, अमीर, पाटील, पटवारी वगैरेना अशा प्रकारचे हुकूम सोडिले होतेः--( परिशिष्ट न २ पहा ) '( १ ) अनादि कालापासून जैनलोकांच्या देवाल्याना व वसतिस्थानांना अधिकार मिळाला आहे. याकरिता कोणीहि मनुष्याने त्याच्या हद्दीमध्ये हिंसा करू नये. हा त्याचा पूर्वपरंपरागत हक्क आहे. ( २ ) जे जे प्राणी– नर असो वा मादी असो–हिंसा करण्याकारितां ह्मणून त्याच्या गृहावरून नेले जातात

---

( मागील पानावरून पुढे चालू. )

पूर्वी तीनशें वर्षे हिंदुस्थानात अशोक नावाचा सार्वभौम राजा होऊन गेला. महावीरस्वामिनंतर होऊन गेलेल्या न्यायपरायण, धर्मात्मे व विद्वान राजामध्यें अशोकाचाच पहिला नंबर लागेल. जीवहिंसा बंद करण्यामध्ये व लोकाना धर्मनिष्ट बनविण्यात ह्या चक्रवर्ति नरेशाने जितके प्रयत्न केले त्याच्या एक दशांश तरी प्रयत्न आजकालचे राजे करतील तर देशामध्ये शांततेचे साम्राज्य नांदू लागेल. परंतु हाय ! भारतवर्षाच्या भाग्यामध्ये आता असे पुण्यपूत दिवस राहिले नाहीत. सध्या भरतभूमीचे पवित्र वक्षःस्थल गाय, हैस, हरिण इत्यादि असंख्यात निरपराधी प्राण्याच्या रक्तानें माखले जात असल्यामुळें दयालु लोकांच्या हृदयामध्ये घोर वेदना उत्पन्न होत आहे. **महाराज अशोक हे पहिल्यानें वेदानुयायी होते**, नंतर **जैनी झाले, व शेवटी त्यांनीं बौद्धधर्म स्वीकारिला होता असें ह्मणतात.** कारण शिलालेखावरून त्याचे विचार जैनसिद्धांताला धरून होते असेंच व्यक्त होते.

ते ते प्राणी अमर होतात–अर्थात त्याचा बचाव होतो.' हा ताम्रपट सवत १७४९ मध्यें राणा राजसिंग याने दिलेला आहे. तसेच रास्मी व ब्राकेली येथील शिलालेखांवरून राणाजीच्या घराण्याचें जैनांशीं किती आदरयुक्त वर्तन होतें हें दिसते. चातुर्मासांत तेल्यांचे घाणे व कुंभारांचीं चाकें अहिंसेसाठीं बद ठेवण्याचा राणाजींनी हुकूम दिला आहे. युद्धदेवतेच्या प्रसादासाठी बकरीं मारली जात असतांना तेथे कोणी जैन येऊन त्याने त्यांचा जीव वांचविण्यास सागताच त्याप्रमाणें रजपूत लोक करित असल्याचे प्रत्यक्ष मीं पाहिले आहे असे टॉडनामक प्रख्यात इतिहासकार ह्मणतो. अद्याप सुद्धां जेथें जेथे जैन राहतात तेथें तेथे पचमी, अष्टमी, चतुर्दशीसारख्या पर्व तिथींच्या दिवशीं प्राणी-वध होऊ नये ह्मणून दिलेले हक्क बऱ्याच ठिकाणीं दिसून येतात. इतकेच नव्हे, पण भडबुंजे लोक सुद्धा ह्या पुण्यतिथींस आपली भाद ( चणे वगैरे ) भाजीत नाहींत. माझ्या प्रातात खाटीक लोकांना मासाच्या पाट्या घेऊन जैनाच्या गल्ली मधून जाण्याची मनाई आहे. ह्या दयामय धर्माचा उपदेश क्षत्रियानी,–ब्राह्मणांनी, वैश्यानी अथवा शूद्रांनी नव्हे–केला होता हे आपण धान्यांत ठेवलें पाहिजे. अज्ञानाने पछाडलेल्या कित्येक लोकाचें असे ह्मणणे आहे कीं, जैनधर्म हा बनि-यांचा आहे, कांहींचें ह्मणणें हा श्रावगी लोकांचा आहे व कित्येकाचे ह्मणणें असे आहे कीं हा वैश्याचा धर्म आहे. परतु छे! हें त्याचें अज्ञान आहे, ही त्याची चूक आहे. अशा तऱ्हेने प्रतिपादन करणाऱ्या लोकांचा हा गैरसमज झालेला आहे. जैनधर्म हा क्षत्रियाचा धर्म होय. सर्व जैनतीर्थंकर–दिगबर ऋषी ऋषभेश्वरांपासून तों तहत दिगबर ऋषी वर्धमान ( महावीर ) पर्यंत–हे इक्ष्वाकुवश, हरीवशसारख्या उत्तम क्षत्रिय घराण्यात जन्मले होते. धर्मबधूहो, जैनधर्माची महति मुकीं जनावरें आपल्या नि:शब्द, वाणीने गात आहेत. ज्या धर्माने कोणत्याही कारणाकरिता होणाऱ्या जीवहिंसेचा सर्वस्वी प्रतिबध केला आहे असा दुसरा कोणता धर्म आहे? प्रत्येक कार्य करित असताना प्राण्यांची

हिंसा न होऊ देण्याबद्दल इतकी खबरदारी घेण्याबद्दल आज्ञा करणारा हा एकच धर्म होय. सद्गृहस्थहो, मी ह्यावेळीं आपल्यापुढें ज्या धर्माचा पाया क्षत्रियांनीं घातला व ज्याचा प्रसारहि क्षत्रियांनींच केला आहे, त्या धर्मासंबधाने चार शब्द सांगणार आहे, आणि ज्या ज्या धर्मांचें मुख्य तत्व (Motto) "अहिंसा परमोधर्मः" हें आहे त्या सर्वांमध्यें ह्याच धर्माला पहिला नंबर (अग्रेसरत्व) मागण्याचा योग्य रीतीनें हक्क पोहोंचतो.

## जैनासंबंधानें आपल्या लोकांचे गैरसमज.

सभ्यगृहस्थहो, जैनधर्मासबधानें लोकांचे अतिशय विचित्र गैरसमज झालेले आहेत. कित्येकाचे आमच्या उत्पत्तीबद्दल, कित्येकाचे आमच्या मताबद्दल, कित्येकांचे आमच्या तत्वज्ञानाबद्दल (अर्थात शास्त्राबद्दल), तर कांहींचे आपल्या प्राचीनतेबद्दल विपरीत ग्रह झाले आहेत. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे जैनधर्मासबधाने सर्वस्वीं चुकीच्या व भ्रममूलक कल्पना झालेल्या आहेत. नुसत्या ह्यासबधाने लोकांच्या मिथ्या कल्पना झाल्या आहेत इतकेच नव्हे तर कित्येक परधर्मीयानीं द्वेषबुद्धीनें विनाकारण कांहीं दोषारोप केले आहेत, व निंदा केली आहे. अशी स्थिती झाली असल्यामुळें जैनधर्मासबधाने हव्या त्या कंड्या पिकू लागल्या आहेत, कोणी ह्मणतात की जैनधर्म हा नास्तिक धर्म आहे. कोणी ह्मणतात कीं हा बानिया अथवा श्रावगी लोकांचा धर्म आहे. कित्येक बौद्धधर्माचें पिल्लू अथवा शाखा असेंहि ह्मणतात. कोणी ह्मणतात कीं जेव्हां शकराचार्यानीं बौद्धाचा पराभव केला तेव्हां पुष्कळसे बौद्धलोक ब्राह्मणधर्मांत आले; परंतु त्यावेळी जे थोडे बौद्धधर्मालाच चिकटून राहिले त्यांचेच वशज हे जैन. कोणी ह्मणतात कीं जैनधर्म हा बौद्धधर्माचा शेषभाग नव्हे तर ब्राह्मणधर्माचाच एक पथ आहे. कित्येक ह्मणतात कीं महावीरांनीं ह्या धर्माची स्थापना केली. कित्येक पार्श्वनाथाला ह्या धर्माचा उत्पादक ह्मणतात. कांहींजण मलीन व घाणेरड्या चालीरीतींचें माहेरघर ह्मणून जैनांची टर उडवितात. कांहीं

ह्मणतात जैन कधीं स्नान करीत नाहींत व दतधावनहि करित नाहींत. कित्येक जैन नागव्या देवाची पूजा करितात ह्मणून दोषारोप करितात. तर कित्येक जैनांना तत्वज्ञानच नाहीं ह्मणून ह्मणतात. ह्यापेक्षांहि कांहींनीं कमाल केली आहे—

**न पठेद्यावनीं भाषां प्राणैः कण्ठगतैरपि ।**
**हस्तिना पीड्यमानोऽपि न गच्छेज्जिनमंदिरम् ॥**

सारांश, प्राणावर येऊन बेतली तरी सुद्धा म्लेंच्छांची भाषा शिकू नये. आणि हत्तीनें आपल्या पायाखाली तुडवून प्राण घेतला तरी बेहेत्तर पण स्वतःचा प्राण रक्षण करण्याकरितां ह्मणून सुद्धां जैनांच्या देवायतनात प्रवेश करू नये. असा निषेध तत्कालीन काहीं दुरभिमानी लोकांकडून पाळला गेल्यामुळें जैनमदिराच्या भितीच्या आड काय आहे हें कळणे सुद्धां दुरापास्त झालें. असे लिहिण्यांत आह्मी अन्य धर्माचा द्वेष करीत नाही, तर तत्कालीन स्थिती कशी होती एवढेच आह्माला दाखवावयाचें आहे. हा द्वेष नव्हे, हा इतिहास आहे.

## पाश्चात्यांचें विचित्र गैरसमज.

हिंदुस्थानातल्या हिदुस्थानांत आज फार प्राचीन काळापासून हिंदूधर्मांशेजारीं असलेल्या जैनधर्माबद्दल हिंदूचें जर एवढे अज्ञान आहे तर हजारों कोसांवरून माहिती मिळविणाऱ्या व तिजवरून पुढें वाटतील ती अनुमाने काढणाऱ्या पाश्चात्यांच्या गैरसमजुतीला हसावयाला नको. तथापि त्यांचेहि गैरसमज गमतीचे असल्यामुळे त्यांपैकी एक दोहोंचा येथें उल्लेख करणे अप्रासगिक होणार नाहीं.

लेफ्टेनट कर्नल वुइल्यम फ्राकलिन यांनीं जैन व बुद्धधर्म यांच्या सबधानें १८१७ सालीं एक "Researches on the tenets and doctrines of the Jains and Budhsits; Conjectured to be the Brahmins of Ancient India" ग्रथ लिहिला त्यांत त्यांनीं जैनांना इजिप्शियन लोकांचे वंशज ठरविलें आहे! दुसऱ्या एका मि. कोलियर नामक साहेबांनीं "Scripture Miracles" नांवच्या

आपल्या पुस्तकांत जैन शब्दाची जी उत्पत्ति दिली आहे ती फार गमतीची आहे ते ह्मणतात कीं, "जैन" हा शब्द रोमन 'जेनस' या शब्दावरून झाला आहे. जेनस ही रोमन लोकांची एक उपास्य देवता होती. जसे शिवाचे उपासक शैव, विष्णूचे वैष्णव, तसे जेनाचे ते जैन!! ह्या साहेबांनी असे आपल्या शहाणपणाचे तारे तोडले आहेत तर एका मिशनरी गृहस्थांच्या कल्पनेने याच्यावरहि कडी केली आहे त्याचें ह्मणणे आहे की बायबलांत Genesis अथवा सृष्टीची उत्पत्ति या पहिल्याच प्रकरणाच्या चौथ्या अध्यायात केन व ॲबेल या बधु-द्वयाविषयींची कथा आहे, त्यांपैकी देवाच्या शापाने पीडित झालेला जो केन त्याची जी सतति तेच जैन होत!! आणि हे कशावरून? तर केनची सतति ज्याप्रमाणें विशालदेही आणि दीर्घायुषी होती त्या-प्रमाणें जैनतीर्थकरहि भव्य आकृतीचे आणि दीर्घायुषी होते असे जैनांविषयीच्या एकदर माहितीवरून कळते. यावरून जैनाना साहेब-बहादुरानीं केनचे वशज ठरवून टाकिलें आहे! याच्या तर्कशास्त्राच्या अगाध ज्ञानाबद्दल याची जितकी कीव करावी तितकी थोडीच आहे. हेच साहेबबहादूर पुढें या विधानाला दुसरेहि एक प्रमाण देतात. त्याच्या योगाने नुसते जैनच काय? पण कौशिक, अत्रि, कश्यप, वगैरे ऋषींचे वशज जे ब्राह्मण ते सुध्दा सगळे एका घटकेत इजि-प्शियन पूर्वजाचीं श्राध्दे करू लागतील! बायबलांमध्ये ह्मटले आहे की केनाला कोणी मारू नये ह्मणून त्याच्या कपाळावर खूण केली होती. जैन लोकांच्या व ब्राह्मणादिकाच्या कपाळी तिलक असतो. सबब या कारणावरून सदर मिशनऱ्याने तिलक लावणाऱ्या सर्वांनांच इजि-प्तमध्ये भटकत फिरणाऱ्या केनची सतति ठरविली तर सदर साहे-बांचें काय घेणार? तिसऱ्या एका मॉरिस नांवाच्या प्राचीन विद्यावि-शारदांनीं याच अनुमानाचें पुष्टिकरण थोडेसे निराळ्या रीतीने केले आहे. गौतमबुध्द व इजिप्तमधील प्रसिद्ध विद्वान व साधुपुरुष हर्मिस हे एकच होत. कारण, हर्मिस याने ज्याप्रमाणे लिहिण्याची कला

प्रचारांत आणून विविध विषयावर ग्रथ निर्माण केले, आणि एवढें सपादन केलेले ज्ञान चिरकाल टिकावे व लोकांच्या उपयोगी पडावे ह्मणून पुष्कळशी माहिती शिलास्तम्भावर त्याने कोरून ठेविली, त्याच-प्रमाणें बौद्ध व जैन लोकानी विद्येचें पुरस्कर्तृत्व आपलेकडे घेऊन अनेक शास्त्रग्रथ लिहिले, आणि कोरीव शिलास्तभ उभारले आहेत, अर्थात् ही शिलास्तभांची कल्पना जैनानी इजिप्तमधून आणली असे मानण्यास आणि हर्मिस व जैन याची सांगड घालून देण्यास मॉरिस साहेबाच्या कल्पनेस काहींच प्रयास पडले नाहीत. असो. पाश्चात्यांचीं हीं मते इतकीं पोचट, व फोल आहेत कीं, त्यांचे खण्डन करण्याचे कारण दिसत नाही. असे चुकीचे व भ्रामक गैरसमज होण्याची कारणे कोणतीं याचा थोडासा विचार करू या.—

## गैरसमज होण्याचीं कारणें.

अशा रीतीने गैरसमज होण्याला मुख्य तीन कारणे आहेत. ( १ ) तुच्छ समजणे ( २ ) नम्रता-( ३ ) द्रोह-परस्परातील भेद—( १ ) अन्य मतांच्या विद्वानाचे ह्या धर्मासबधाने तुच्छतेने पाहणे--विद्वानांची लीला ( २ ) जैनधर्मीयांचा मवाळपणा उर्फ फाजील सहिष्णुता आणि तिसरे कारण हिंदुधर्म व जैनधर्म यांमधील परस्पर उपस्थित झालेला द्वेष.

अन्यधर्मी विद्वानांचा आह्माला थोडासा फायदा झाला आहे. त्यांनी बरेचसे वैदिक व बौद्धिक वाङ्मय उजेडांत आणिले. व त्यांनी आश्चर्य-जनक असे कांहीं शोधहि लाविले आहेत. ह्या सर्व कृत्याबद्दल आह्मी त्यांचे कृतज्ञ आहोत. परतु मला येथे स्पष्ट ह्मटल्याशिवाय राहवत नाही की, ते आमच्या धर्माकडे तुच्छतेने पाहतात, आमच्या धर्माला क:पदार्थ समजतात, आणि आमच्या मताची चेष्टा करित असतात. असें निदान जैनधर्मासबधाने तरी आहे हे आपल्या सहज ध्यानांत येईल. ( १ ) एक विद्वान असे ह्मणतो, " जैनधर्माला १२०० वर्षें झालीं व तेव्हांपासून हा धर्म प्रचलित आहे," तर दुसरा ह्मणतो, " जैन-

धर्म ही बुद्धधर्माची शाखा आहे," तिसऱ्या विद्वानाचें ह्मणणें असे पडतें कीं जैनधर्म हा ब्राह्मणधर्मातलाच पथ आहे. कित्येक महवीराला त्याचे उत्पादक समजतात. तर दुसरे पार्श्वनाथाला त्याचे निर्माते ह्मणतात. अशा रीतीने उपहास करण्यासारखी धर्म–मग तो कोणचाहि असो– ही वस्तु नव्हे. धर्म हा थट्टेचा विषय नव्हे. धर्माच्या सभोंवती पवित्रता-रूपी मडल असते. त्याच्या भोवतीं एक प्रकारची जादू असते. अशा रीतीने परस्परविरोधी अर्थात् एकमेकांशीं विसगत अशीं मतें प्रतिपादन केलीं ह्मणजे सभोवतालचा तो पवित्रपणा कमी होतो. अशीं मते जादुरूपी मायेला तोडून टाकितात. आणि अशा धर्मलड माणसाच्या मताचा परिणाम त्या धर्माचे प्राचीनत्वास व पावित्र्यास बाधक असा होतो. आपण कोणाच्याहि धर्माविषयी बोलतांना आदराने श्रद्धेने व पूज्यबुद्धीनेच बोलणे योग्य होय. कारण धर्मासारखा दुसरा नाजुक विषय नाही.

आपणाला मुलगा आणि बेडूक यांची गोष्ट माहितच आहे. काहीं मुले तळ्यात दगड फेकीत होती. तेव्हां एक वृद्धबेडूक वर येऊन ह्मणाला "मुलानो तुमचा खेळ होतो, पण आमचा जीव जातो" त्याचप्रमाणे जैनधर्म–अनादि काळापासून चालत आलेला जैनधर्म– असें ह्मणतो, "पडितहो, ही तुमची लीला असेल. परतु आमचे त्या लीलेने अत्यत नुकसान होते." एखाद्या विद्वान पडिताने लीलेनें कोण-त्याही विषयावर वाटेल ते मत देणे ही गोष्ट त्याच्या दृष्टीने क्षुल्लक असेल. परतु त्याचें तें तशा प्रकारचे मत त्या धर्माची प्राचीनता व पवित्रपणा ह्या दोन्ही गोष्टीबद्दल सशय उत्पन्न होण्यास कारणीभूत होते.

(२) जैनलोक सुद्धां ह्या गोष्टीसबधाने अतिशय मवाळप-णानें वागतात. आपल्या धर्माची होत असलेली विटबना ते स्वस्थ-पणे पाहतात. आपणाला बौद्ध व चार्वाक लोकांमध्ये मिलाफ कर-ण्याचा अन्यधर्मीयांचा प्रयत्न त्याच्या दृष्टोत्पत्तीस आला आहे. जैन धर्मीयांसंबधाने अतिशय निद्य, अप्रिय, व घाणेरडी अशी मते प्रति-

पादन केलेली त्यांच्या कानांवर आलीं आहेत. अशा तऱ्हेने राजरोस-पणे आपली निंदा होत असताना सुद्धा वरील सर्व मते आपण शांत पणाने ऐकून घ्यावीत, व त्याविरुद्ध एक अक्षर बोलण्याचेहि मनोधैर्य आपण दाखवू नये हे आपल्या फाजील सहिष्णुतेस शोभण्यासारखेच आहे! ( ३ ) एकीकडे ब्राह्मणधर्मी व बौद्धधर्मी व दुसरीकडे जैनधर्मी या लोकांमधील परस्पर द्वेष याच्यामुळेहि बरेचसे गैरसमज झाले असावेत. याबद्दल एवढेच सांगणे येथे इष्ट वाटतें. इंग्रज सरकारच्या दयाळु राज्यछत्राखाली आह्मां हिंदु, जैन व बौद्ध या सर्वांना महामण्डलामध्ये एकत्र जमण्याची, व आपापल्या धर्माची योग्य रीतीने रक्षण करण्याची, व तसेच आपल्या आपल्या धर्माचे खरे खरे स्वरूप काय आहे हें प्रगट करण्याची सुसंधि मिळाल्याबद्दल मला आनंद वाटतो. खरोखर मी ह्या ठिकाणाला पवित्र समजतो, व आपणाला एकमेकाचे, एकमेकाच्या धर्मावरील विचार ऐकण्याची व ऐकविण्याची सुसंधि मिळाल्याबद्दल मी स्वतःला भाग्यवान समजतो.

आमच्या धर्मासंबंधाने अद्यापि सुद्धा बहुजनसमाजाचे विचित्र चुकीचे व भ्रामक असे गैरसमज झाले आहेत असें दिसून येते. व ऱ्याच मंडळींनी जैनधर्मावर मिथ्या दोषारोप करण्याचा निंद्य प्रयत्न केला ही गोष्ट मी आपणाला सांगितलीच आहे. आता मी थोडक्यात ते गैरसमज, त्या भ्रामक कल्पना, व ते दोषारोप धुवून टाकण्याचा प्रयत्न करितो.

## जैन शब्दाची व्युत्पत्ति व अर्थ.

आनंदगिरिकृत शंकरविजयात जैन शब्दाची व्युत्पत्ति अशी दिली आहे—'जीतिपदवाचस्य नेतिपदेन न पुनर्भवः तस्माज्जन्मशून्या. जैनाः' पण आह्मी जैन या शब्दाची व्युत्पत्ति निराळी देतो. ती अशी–"रागद्वेषादिदोषान् वा कर्मशत्रून् जयतीति जिनः तस्यानुयायिनो जैनाः" कामक्रोधादि अठरा दोष ज्यांनीं जिंकिले, अथवा ज्ञानावरणीय, दर्शनावरणीय, मोहनीय, अंतराय, इत्यादि कर्मशत्रूंना ज्यांनीं जिंकिले ते जिन ह्मणजे गणधरादिक होत, त्यांच्यामध्यें जे श्रेष्ठ

तीर्थकर केवलज्ञानी त्यांस जिनेश्वर ह्मणतात, त्यांस वीतराग, अर-
हत, परमेष्ठी, सर्वज्ञ, शास्ता अशींहि नांवे आहेत. अर्थात् जिनाचे
जे अनुयायी ते जैन होत.

## जैनांची प्राचीनता, जैनधर्म शंकराचार्यांमागून निर्माण झाला नाहीं.

आतां आपल्या प्राचीनतेविषयी विचार करू. जैनधर्म हा शंकराचार्यां-
मागून प्रचलित झाला नाहीं. " बौद्धमताचा ऱ्हास झाल्यानंतर जैन-
धर्मास सहाव्या शतकांत सुरुवात झाली. व अद्यापिहि कांहीं जैन
जरी आढळून येतात तरी त्याचा बाराव्या शतकात लोप झाला."
असे *लेथब्रिज (Lethbridge) व माउंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन (Mount
Stuart Elphinstone) सारखे लेखक जे लिहितात त्यात त्याची
मोठी चूक आहे. ह्यावरून त्यांचे फक्त जैनशास्त्रासंबंधाचे अज्ञान व्यक्त
होते असे नाही तर त्यांना हिंदूंच्या व तसेच बौद्धांच्या पवित्र ग्रंथाची
कितपत माहिती आहे हेहि चांगल्या रीतीनें दिसून येते. खुद्द **शंकरा-
चार्यांनीं** उज्जयनीजवळील एका ठिकाणीं जैनांशी वादविवाद केला
होता असे माधवांनी व आनंदगिरींनी आपल्या **शंकरदिग्विजया**--
मध्ये व **सदानंदांनीं** आपल्या **शंकरविजयसार** नावाच्या ग्रंथामध्ये
लिहिले आहे. ही गोष्ट वरील विद्वान लेखकाना माहित असावयाला
पाहिजे होती. एवढेच नव्हे, परंतु जैनधर्म हा अनादि कालापासून
विद्यमान आहे असे खुद्द **शंकरांनीं** लिहिलेले आहे कारण **व्यास**-
कृत वेदांतसूत्रावरील भाष्याच्या द्वितीय अध्यायामधील दुसऱ्या पदा-
तील ३३ ते ३६ जी सूत्रे आहेत ती सर्व सूत्रे जैनमतासंबंधाची
आहेत. बादरायण ( व्यासऋषी ) ऋषींच्या 'शारीरिक मीमांसा' नामक
ग्रंथांचे दुसरे भाष्यकार जे रामानुज त्यांनीं देखील आपल्या भाष्या-
मधील दुसऱ्या अध्यायांत बौद्धमताचे आणि जैनमताचे निरनिराळें
खंडन केलेलें आहे.

---

* लेथब्रिजकृत हिंदुस्थानचा इतिहास पान २७.
माउंटस्टुअर्ट एल्फिन्स्टनकृत हिंदुस्थानचा इतिहास पान १२२.

आतां **शंकराचार्य** स्वतः जैनासंबधानें असे लिहितात तर त्यांच्या नंतर जैनमत प्रचलित झाले असें ह्मणणे कसे सयुक्तिक होईल ? लेथब्रीजसारखे अथवा माउंटस्टुअर्ट एलफिनस्टन सारखे लेखक यापुढे आता जैनधर्म हा इसवी सन सहाव्या शतकामध्ये अस्तित्वात आला असे समजणार नाहीत अशी मला आशा आहे. वरील विद्वान लेखकांच्या पुस्तकांमधून अशा तऱ्हेने गैरसमज व मिथ्या भ्रम उत्पन्न करणारी वाक्ये जर काढून टाकण्यांत येतील तर जैनधर्मीयांना मोठा आनंद होईल. कारण ह्यामुळे लोकांचे अतिशय विपरीत ग्रह होत आहेत. लेथब्रीजकृत इतिहास शाळेमधून शिकविण्यात येतो. आणि अशा पुस्तकांच्या अध्ययनामुळे जैन धर्माविषयीं तरुण पिढीचे मिथ्या ग्रह होणे साहजिक आहे.

## जैनधर्म बुद्धमताची शाखा नव्हे.

आता आपण जैनधर्म ही बौद्धधर्माचीच शाखा आहे असें ह्मणणारे प्रोफेसर वुइल्सन, लॅसेन, बार्थ, वेबर वगैरे जे विद्वान आहेत त्यांच्या ह्मणण्यात कितपत तथ्य आहे हे पाहू. परंतु तसे करण्याच्या पूर्वी ही गोष्ट येथे आपण ध्यानात ठेवावी कीं, वरील लेखक फक्त एवढेच लिहितात की, बौद्धमत प्रचलित होण्याच्या पूर्वीच जैनधर्मास सुरवात झाली. परंतु हा धर्म केव्हा, कोणत्या परिस्थितीत, कोणत्या कारणामुळे निर्माण झाला, ही शाखा का झाली वगैरे बाबतींत त्यांनी मुग्धताच स्वीकारिली आहे. एवढेच नव्हे, परंतु कित्येकांनीं असें प्रांजलपणे कबूल केले आहे की आह्मी हे ग्रंथ लिहित असतांना आह्मांला जैनधर्मासंबधानें अतिशय थोडी माहिती होती. उदाहरणार्थ बार्थसाहेब हे आपल्या Religions of India 1892 ( हिंदुस्थानामधील धर्म ) ह्या पुस्तकांत जैनधर्मासंबधाने असें लिहितात, "भरतखंडामध्ये पुराणकाली ज्या ज्या धर्मांनीं मोठमोठाली अवर्णनीय कामे केलीं त्या धर्मांपैकी जैनधर्म हा एक जरी आहे तरी आह्मांला त्याविषयीं अतिशय थोडी माहिती आहे. अद्याप देखील फारच थोडी मा-

हिती यासंबंधाने उपलब्ध आहे. आणि ऐतिहासिकदृष्ट्या ह्या धर्माची प्रगति कशी कशी होत गेली ह्यासबधाने तर आमचे पूर्ण अज्ञान आहे ". " कोणत्या वेळीं जैनधर्म हा स्वतंत्र रीतीने अस्तित्वांत आला" ह्या प्रश्नाचें उत्तर देतांना त्यांनीं स्पष्टपणे व निःपक्षपातानें असे कबूल केलें आहे, " पहिल्याने आपण पुरातनकाली असलेल्या जैनधर्मांचें स्वरूप ओळखिले पाहिजे. आणि जेव्हा जैनमताचे धार्मिक ग्रथ व शास्त्रे आपणांला वाचावयाला मिळतील तेव्हाच आपल्या अंगीं त्याचे खरें स्वरूप ओळखण्याची पात्रता येईल व तदनतर हे कोडें उलगडणे सोपे जाईल. आजपर्यंत ह्या धर्मासबधाने आपणाला जी जी कांहीं माहिती कळली आहे ती सर्व माहिती दुसऱ्याच्या पुराव्यावरून–ग्रंथावरूनच उपलब्ध झाली आहे." वेबरसाहेब आपल्या History of Indian Literature " हिंदुस्थानातील वाङ्मयाचा इतिहास " या पुस्तकांत ह्मणतात, " आजकाल जैनासबधानें जी काहीं आह्मांला माहिती उपलब्ध आहे ती सर्व फक्त ब्राह्मणांच्या (वैदिक) ग्रंथापासूनच मिळालेली आहे." अशा परिस्थितीमध्ये ह्या विद्वानाची जी काही मते बनली त्या मतांना आह्मी फारसे महत्व देणें योग्य होईल काय? मुळीच नाही. ज्या विद्वानाना जैनधर्मासबधानें मुळीच माहिती नाहीं अशा विद्वानानी जैनधर्मासबधीं दिलेली मते पोचट व निराधारच असणार. कारण त्या विद्वानाजवळच हे मत त्यासारखेच दिसते, ह्यात बरीच साम्यता आहे एवढाच काय तो त्याच्या मतपुष्ट्यर्थ पुरावा असणार ह्याशिवाय दुसरा काहीं पुरावा आढळून येणार नाही. जैनधर्मामधील व बौद्धधर्मामधील साम्यता पाहून त्याना इतके आश्चर्य वाटले कीं, ते जैनधर्म ही बौद्धधर्माची नक्कल आहे असे समजू लागले, ह्यांना जैनधर्माची अतिशय थोडी माहिती होती; तरी पण जैनधर्मासबधाचे यथार्थ ज्ञान होण्याच्यापूर्वीच हे विद्वान जैनधर्म ही बौद्धधर्माची शाखा आहे असे मानूं लागले. ही विचारसरणी अतिशय पोंचट (लगडी) आहे. एका पथाला दुसऱ्या पथाचे अनुकरण करता येते. परतु

एवढ्यावरूनच एकानें दुसऱ्याचें अनुकरण केलें अथवा दुसऱ्यानें पहिल्याची नक्कल केली असे ह्मणण्यास मुळीच आधार नाहीं. असो, तथापि आपणाला एवढेच सागून स्वस्थ राहणें योग्य होणार नाहीं. जैनधर्म ही बौद्धधर्माचीच शाखा आहे की काय ह्यासबधानें हिदूच्या, बुद्धांच्या अथवा जैनाच्या पवित्र धर्मशास्त्रामध्ये काहीं उल्लेख आहे किंवा काय हे पाहू.

## हिंदुशास्त्र.

**हिंदू** आचार्यांनी जैनाना बौद्धांचीच शाखा असे ह्मटलेले कोठेंहि आढळून येत नाही. उलट हे दोन निरनिराळे स्वतत्र धर्म आहेत असेच ते नेहमीं ह्मणतात. **माधवांच्या शंकरदिग्विज** ग्रथांत **शंकरचार्यांनीं** बौद्धाशीं वाराणशी ( काशी ) क्षेत्रात आणि जैनाशीं उज्जयिनी येथे वाद केला असे ह्मटले आहे. जैन व बौद्धधर्म एकसारखे असते तर दोनदा निरनिराळ्या स्थली व प्रसगीं वाद करण्याचे कारण नव्हतें. आनदगिरीच्या शकरदिग्विजय ग्रंथामध्ये व सदानदाच्या शकरविजयसार ग्रथामध्येंहि हेच आढळून येतें. माधव हे आपल्या सर्वदर्शनसग्रह ग्रथामध्ये असे लिहितात कीं चौदाव्या शतकांत दक्षिणप्रांती जीं काहीं सोळा दर्शने ( Philosophies ) प्रचलित होतीं, त्यापैकीं जैनदर्शन हे एक होय. व त्यामध्ये ज्याप्रमाणे बौद्धदर्शन दिले आहे त्याप्रमाणे जैनदर्शनहि दिले आहे. जैनदर्शनापासून वेगळे असे बौद्धदर्शनहि त्यातलेच दुसरे एक आहे.

सदानद काश्मीरवाले यानी आपल्या अद्वैतब्रह्मसिद्धिनामक ग्रथामध्ये जैनांच्या व बौद्धांच्या तत्वज्ञानासबधाने जे लिहिलें आहे ते मनन करण्याजोगे आहे. त्यानीं बौद्धांचे चार पथ केले आहेत. (१) वैभाषिक (२) सौत्रातिक (३) योगाचार (४) व माध्यमिक. परतु त्यांनीं ह्या बौद्धाच्या चार पथांमध्ये जैनाना सामील केले नाही. त्याचप्रमाणे माधव यांनींहि आपल्या सर्वदर्शनसग्रहनामक ग्रथामध्ये जैनांना बौद्धांच्या चार शाखेमध्ये सामील केले नाही.

**" ते च बौद्धाश्चतुर्विधया भावनया परमपुरुषार्थं कथयन्ति । ते च माध्यमिकयोगाचारसौत्रांतिकवैभाषिकसंज्ञाभिः प्रसिद्धा बौद्धाश्च यथाक्रमं सर्वशून्यत्वबाह्यशून्यत्वबाह्यार्थानुमेयत्व बाह्यार्थप्रत्यक्षत्ववादाना तिष्ठन्ते "**

**अर्थः**– ते बौद्ध चार प्रकारच्या भावनेमुळें परमपुरुषार्थ असे ह्मणतात. हे माध्यमिक, योगाचार, सौत्रान्तिक, आणि वैभाषिक ह्या नावाने प्रसिद्ध आहेत. माध्यमिकाचे ह्मणणें असे आहे की, सारे जगत् शून्य आहे. योगाचार बाह्यपदार्थांना शून्य समजतात. सौत्रान्तिक ह्मणतात की, बाह्यपदार्थ अनुमानाने सिद्ध होतात व वैभाषिक असे प्रतिपादन करितात की, बाह्यवस्तु प्रत्यक्ष प्रमाणाने जाणल्या जातात.

बौद्धांच्या ह्या चारी शाखाचे वर्णन वरील श्लोकात चांगल्या रीतीनें केले आहे. परतु जैनांना ह्यामध्ये मुळीच सामील केले नाहीं. अर्थात् ह्यात जैन हे त्यांतलेच एक होत असे मुळीच ह्मटलें नाही.

सिद्धांतशिरोमणिकर्त्यांनी आपल्या ग्रथांत जैनांच्या व बौद्धांच्या ज्योतिषशास्त्रासबधाने वेगळे वेगळे वर्णन करून त्यांतील दोष दाखविले आहेत.

डॉक्टर कर्न ( Doctor Kern ) व इतर विद्वानांच्यामते वराहमिहिर हे इसवी सन सहाशेत होऊन गेले. वराहमिहिरानी आपल्या " बृहत्संहिता " नामकग्रथामध्यें जैनासबधाने व बौद्धासबधानें जो उल्लेख केला तो फार महत्वाचा आहे. ते ह्मणतात, " जैन हे जिनाची भक्ति करितात, व बौद्ध हे बुद्धाची उपासना करितात. "

**" शाक्यान् सर्वहितस्य शांतमनसो नग्नां जिनानां विदुः "**

**—( श्लोक १९ अध्याय ६१. )**

**अर्थः**– बुद्धदेवाचे जे उपासक आहेत, त्याना शाक्य अथवा बौद्ध ह्मणतात. व जिनदेवाची उपासना करणाऱ्यांना नग्न अथवा जैन ह्मणतात. ह्मणजे बौद्धलोक शांतचित्त व सर्वांचें कल्याण करणाऱ्या मूर्तीला भजतात. आणि जैन हे नग्न मूर्तीला भजतात असे ह्मटले

आहे. आणि वराहमिहिराला जैनधर्माविषयीं चागली माहिती होती असा बळकट पुरावा आहे. कारण त्याचा भाऊ भद्रबाहू हा जैन असून ते दोघेहि एकाच राजाचे पदरी होते.

सभ्यगृहस्थहो, वराहमिहिरांनीं जैनांचे व बौद्धांचे उपास्य दैवत अगदीं वेगळे वेगळे आहे असें सहाव्या शतकात ह्मटले आहे. ही गोष्ट येथे आपण चांगली ध्यानात ठेवावी.

हनुमान नाटकांतहि ह्या अर्थाचा उल्लेख केलेला आढळतो. राम हा जैनलोकांचा " अर्हत " आहे व बौद्धाचा " बुद्ध " आहे असे त्यांत ह्मटलें आहे.

**" यं शैवाः समुपासते शिव इति ब्रह्मेति वेदांतिनो ।**
**बौद्धा बुद्ध इति प्रमाणपटवः कर्तेति नैय्यायिकाः ।**
**अर्हन्नित्यथजैनशासनरताः कर्मेति मीमांसकाः ।**
**सोऽयं वो विदधातु वाञ्छितफलं त्र्यैलोक्यनाथः प्रभुः ।"**

—( श्लोक ३ अध्याय १ )

**अर्थः—** ज्याची शैवलोक ( वाणी ) " शिव " ( शकर ) ह्मणून उपासना करतात, ज्याला वेदांतीलोक " ब्रह्म " ह्मणतात, बौद्धलोक " बुद्ध " असे ह्मणतात, युक्तिशास्त्रात निपुण असे नैय्यायिक-लोक ज्याला " कर्ता " असे ह्मणतात अथवा जैनलोक ज्याला " अर्हत् " ह्मणून समजतात व मीमासक ज्याचे " कर्मरूप " ह्मणून वर्णन करि-तात असा तो तिन्ही लोकांचा स्वामी तुमचे वाछित मनोरथ पूर्ण करो!

वराहमिहिर हा पुढें असे लिहितो की, बुद्धाच्या व अर्हन् ह्मणजे जैनाच्या देवाच्या मूर्तीच्या रचनेत अगदी भिन्नता दिसते.

**आजानु लंबबाहुः श्रीवत्सांकः प्रशान्तमूर्तिश्च ।**
**दिग्वासास्तरुणो रूपवांश्च कार्योऽर्हतां देवः ॥**

—( श्लोक ४५ अध्याय ५८ )

**अर्थः—** गुडघ्यापर्यंत लांब हात असून छातीवर श्रीवत्साचे चिन्ह, शांतमूर्ति, नग्न, तरुण आणि रूपवान अशा प्रकारची जैनांच्या देवांची मूर्ति बनविली पाहिजे.

**पद्मांकितचरणः प्रसन्नमूर्तिः सुनीच केशश्च ।**
**पद्मासनोपविष्टः पितेव जगतो भवेद्बुद्धः ॥**
**—( श्लोक ४४ अध्याय ५८ )**

**अर्थः–** ज्याच्या चरणांवर कमळाचें लांछन ( चिन्ह ) आहे, ज्याची मूर्ति प्रसन्न आहे, ज्याचे केश सुदर असून खाली लोंबत आहेत, व ज्याने पद्मासन घातले आहे, अशी जगाच्या पित्यासमान बुद्धदेवाची मूर्ति असते.

**भागवतामध्यें** बुद्धाला बौद्धधर्माचा उत्पादक, व दिगबर ऋषी "ऋषभाला" जैनधर्माचा सस्थापक असें ह्मटले आहे. तसेच शारीरिक मीमासा व महाभारत या ग्रथाचे कर्ते जे **व्यासऋषी** बादरायण यांनीं जैन व बौद्ध हे निरनिराळे आहेत असे वर्णन केले आहे. व्यास-ऋषींनी ब्रह्मसूत्राच्या दुसऱ्या अध्यायातील दुसरे पादामध्ये ३३ ते ३६ जीं सूत्रें लिहिलीं आहेत त्या सूत्रामध्ये जैनमतावर टीका केली आहे. व त्यानीं बौद्धांचे दोष १८ ते ३२ सूत्रामध्ये दाखविले आहेत. या-शिवाय बौद्ध व जैन हे भिन्न होत ही गोष्ट सिद्ध करण्याला दुसरा पुरावा नको.

**महाभारता**मध्येसुद्धा जैनांना व बौद्धांना भिन्न भिन्न असेच ह्मटलें आहे. ह्या पुरातन **इतिहासां**मध्यें अश्वमेधपर्वाच्या अनुगीतेमध्ये अनेक धर्मांचे विवेचन केले आहे. व त्या धर्मांपैकी जैनधर्म व बुद्धधर्म हे दोन होत. ( अनुगीता अध्याय ४८ श्लोक २ ते १२ पहा ).

म्यॅक्समुल्लरसाहेब हे आपल्या एका ग्रथात असे ह्मणतात. " परस्परविरोधी असे पुष्कळ धर्म आपल्या पहाण्यात आले आहेत. शरीराचा नाश झाल्यानतर धर्म राहतो असें कित्येकांचे ह्मणणे आहे. दुसरे ह्मणतात की, ते मत चुकीचे आहे. कांहींचे ह्मणणे असे आहे कीं, प्रत्येक वस्तु शकान्वित ( सादिग्ध ) आहे. तर दुसरे ह्मणतात कीं, वस्तूमध्यें शका घेण्यासारखे असे कांहीच नाहीं. कांहीचे ह्मणणे असे आहे कीं, शाश्वत असा नियम अशाश्वत होतो, काहीं एखादा

वस्तूचें अस्तित्व मानतात तर दुसरे त्याचे अस्तित्वहि मानतात व अस्तित्व नाहीं असेंहि समजतात. ” इत्यादि. ह्यावर नीलकंठ आपले असे मत देतो:– “ देह पंचत्वाप्रत गेल्यावरहि जीव ( आत्मा ) राहतो ” असे कोणी ह्मणतात. लोकायथ व चार्वाकासारखे दुसरे काहीजण ह्या विरुद्ध प्रतिपादन करितात; प्रत्येक वस्तु शंकान्वित आहे ( अर्थात् त्याला २ नय आहेत ) असे स्याद्वादीयाचे (जैनाचे) मत आहे. ह्या विरुद्ध मोठे उपदेशक जे तीर्थक ते कोणत्याहि वस्तूमध्ये संदिग्धपणा मानित नाहींत. प्रत्येक वस्तु क्षणभंगुर आहे असे तीर्थक ह्मणतात. तर उलट मीमांसक प्रत्येक वस्तु शाश्वत अथवा नाशरहित आहे असे मानतात. कोणतीहि वस्तु नाही असे शून्यवादयाचे ह्मणणे आहे. व संयोक्त अथवा बौद्धलोक वस्तूचे अस्तित्व मानतात पण तिला क्षण-भंगुर अथवा नाशवंत समजतात ” इत्यादि. मोक्षमुल्लरसाहेबाच्या भाषांत-रांतील “ स्याद्वादी ” हा शब्द जैनाबद्दल घातला आहे. जैनासंबधीं मूळ श्लोकावर नीलकंठाची टीका ह्या प्रकारची आहे.

**“ सर्वं संशयितमिति स्याद्वादीनः सप्तभंगीनयज्ञाः ”**

**—( श्लोक २ अध्याय ४८ )**

**अर्थः–** सप्तभंगी न्यायाचे वेत्ते असे स्याद्वादी लोक प्रत्येक वस्तु संशयात्मक आहे असे मानतात. वरील विधान जैनासंबधाचेच आहे. ह्यावरून स्याद्वादी जैनी आहेत हे स्पष्ट रीतीनें सिद्ध होते. बार्थ-साहेबानें आपल्या “ भरतखंडातील धर्म ” ( Religions of India ) ह्या पुस्तकामध्ये **स्याद्वादी** हे **जैन** आहेत ही गोष्ट कबूल केली आहे. ( पान १४८ पहा. ) अमरकोशातील क्षेपकश्लोकामध्ये असे ह्मटलें आहे:-

**“ नैय्यायिकस्त्वक्षपादः स्यात्स्याद्वादिक आर्हकः ”**

**—( २ कांड—ब्रह्मवर्ग ६ ते ७ च्या दरम्यान. )**

**अर्थः–** नैय्यायिक हे अक्षपाद होत. व स्याद्वादी हे आर्हक अर्थात् जैनी आहेत. जैनलोक हे सप्तभंगीनयज्ञ होत. आणि ह्मणूनच पुष्कळ वेळां ब्राह्मणानीं सप्तभंगीनयावरच टीका करण्याचा प्रयत्न केला

आहे. जैनधर्मामध्यें त्यांच्या समजुतीप्रमाणे टीका करण्यासारखा कोणता विषय असेल तर तो सप्तभगीनयच होय असे ते मानित असत. बादरायण अथवा व्यासऋषींनी ३३ व्या सूत्रामध्ये ह्या सप्तभगीनयावरच टीका केली आहे.

**" नैकस्मिन्न सम्भवात् "**

शकराचार्यांनीं उज्जयनी नगरीजवळ जो जैनांवर जय मिळविला तो ह्या सप्तभगीनयामुळेंच असें माधव आपल्या शकरदिग्विजयसार-ग्रंथामध्यें लिहितो.

" स्वाराज्यसिद्धि " ग्रथामध्ये ह्या सप्तभगीनयावरच टीका केली आहे असे एका विद्वान पडिताने मला नुकतेच सांगितले.

महाभारत व वेदान्तसूत्रे ज्यावेळी लिहिली तेव्हापासूनच जर जैन व बौद्ध हे वेगवेगळालेच सप्रदाय आहेत असे लिहिलेलें आढळून येतें तर जैनधर्म ही बौद्धधर्माचीच शाखा आहे असें कसें सभवेल ? अर्थात् जैनाना बौद्धाची शाखा मानणें हे चुकीचें व असमजसपणाचे आहे.

ब्राह्मणांच्या ग्रथामध्यें जैनासबधाचा आणखी उल्लेख केलेला पहावयाचा असेल तर आपण महाभारतातील आदिपर्व अध्याय ३ श्लोक २६ ते २७ पहावेत. तेथे शेष हा उत्तकाची कुडलें नग्न क्षपणकाच्या वेषामध्ये येऊन चोरून घेऊन जातो.

**साधयामस्तावदित्युक्त्वा प्रातिष्ठतोत्तङ्कस्ते कुण्डले गृहीत्वा सोऽपश्यदथ पथिनग्नं क्षपणकमागच्छन्तं मुहुर्मुहुर्दृश्यमानमदृश्य-मानं च ॥ २६ ॥ अथोत्तंकस्ते कुंडले सन्यस्य भुमावुदकार्थं प्रचक्रमे । एतस्मिन्नन्तरे स क्षपणकस्त्वरमाण उपसृत्य ते कुंडले गृहीत्वाप्राद्रवत् ॥ २७ ॥**

---

" व्यासांनीं आणि **शंकराचार्यांनी** जैनमतातील अनेकात स्याद्वाद-मताचें जे खडन केले तें खरोखरच चुकीचे आहे. जैनमतातील स्याद्वाद अनेकात नयाने सागण्याची पद्धति त्याना न समजल्यामुळे व स्वमताच्या पक्षा-मुळेच त्यानीं तसे लिहिले आहे " असे डेक्कन कॉलेजातील प्रोफेसर **काशीनाथ बापूजी पाठक बी. ए.** याचे ह्मणणें आहे.

**अर्थः**— मी यत्नाने जाईन असे ह्मणून उत्तक ती कुण्डले घेऊन जात असतां त्यानें रस्त्यामध्ये नग्न क्षपणक येत आहे असे पाहिले. त्यानंतर तो उत्तक तीं कुडलें जमिनीवर ठेवून पाणी पिण्याकरितां गेला. मध्यतरी त्या क्षपणकाने घाईघाईने येऊन तीं कुडले घेतलीं व य·पलायन केले.

नीलकठ "क्षपणक" शब्दाचा अर्थ "पाखड भिक्षुक" ह्मणून करितो. नग्न पाखडी भिक्षुक ह्मणजे दिगबर जैन साधुच असला पाहिजे. जेव्हा एखादे वाईट काम करणाऱ्या व्यक्तीची भूमिका द्यावयाची असते तेव्हा ब्राह्मणांनी जैन साधूचा प्रवेश घालून त्याला त्याची भूमिका द्यावा ही मोठी शोचनीय गोष्ट होय! उदाहरणार्थ.- मुद्राराक्षस नाटकामध्ये एका जैन साधूला गुप्तपणे दूताचे अयोग्य असे काम करावयास लाविलें आहे. असो.

अद्वैतब्रह्मसिद्धीचा कर्ता क्षपणकाचा अर्थ जैन साधू असा करितो:—

**"क्षपणका जैनमार्गसिद्धांतप्रवर्तका इति केचित्"**

**—( पृष्ठ १६७ कलकत्ता आवृत्ती )**

**अर्थ**—क्षपणक हे जैनधर्माच्या सिद्धांताचे प्रवर्तक होत.

शांतिपर्वामध्ये मोक्षधर्म अध्याय २३९ श्लोक ६ ह्यात जैनांच्या सप्तभंगीनयाबद्दल विवेचन केले आहे. मूळ श्लोक येणेप्रमाणे:—

**एतदेवं च नैवं च न चोभयेनानुभे तथा ॥**
**कर्मस्याविषयं ब्रूयुः सत्वस्थाः समदर्शिनः ॥ ६ ॥**

**टीकाः— (नीलकंठ) आर्हतमतमाह एतदिति तैर्हि स्यादस्ति स्यान्नास्यिदस्ति च नास्ति चावक्तव्य स्यादवक्तव्य इति सप्तभंगी- नयः सर्वत्रयोज्यते अतएतदेवमिति स्यादस्त्युक्तचातएतन्नएवंच नेतिसंबंधेनस्यान्नास्तिस्यादवक्तव्यइतिचोक्तं न चोभेत्यनेन स्यादस्ति च नास्ति चस्यादस्ति चनास्तिचावक्तव्यइति चोक्तं कर्मस्या आर्हता- विषयघटादि एतदेवमस्तीत्यादि ब्रूयुरिति सम्बधः एतेषु पक्षेषु**

**कृतहानाकृताभ्यागमप्रसंगात्स्वभावमात्र पक्षस्तुच्छः बंधमोक्षादि-वस्तुमात्रस्वरूपस्यास्ति नास्तीत्यादिविकल्पग्रस्तत्वेनानवधारणा-त्मक आर्हतपक्षोपि तुच्छएवपरिशेषात्समुच्चयपक्ष एव श्रेयान् व्यवहारेपरमार्थस्तु सत्वस्थायोगिनः समदर्शिनो ब्रह्मैव कारणत्वेन पश्यंति ॥ ६ ॥**

**श्लोकार्थः**— ही वस्तु अशी आहे, ही वस्तु अशी नाहीं; ही वस्तु अशी आहेहि, व ही वस्तु अशी नाहींहि; ही वस्तु आहे असेंहि ह्मणतां येत नाहीं, व ही वस्तु नाही असेहि ह्मणता येत नाहीं, अशा तऱ्हेने घटादि ( वस्तु ) पदार्थांचे विवेचन परमार्थामध्ये तल्लीन झालेले योगी आर्हत् अर्थात् " जैनी " लोक करतात. सप्तभगीनयाचें वर्णन पुढे वेगळेच सविस्तर रीतीने दिले आहे.

शांतिपर्व मोक्षधर्म अध्याय २६४ श्लोक ३ मध्ये जाजुली तुलाधराला नास्तिक ह्मणतो.

**" नास्तिक्यमपि जल्पसि "**

**अर्थः**— नास्तिकाप्रमाणे व्यर्थ बडबड करितोस. ह्यावर नीलकंठाने अशी टीका केली आहे की, वैदिकयज्ञामधील हिंसेची जो निंदा करितो तो नास्तिक.

**" नास्तिक्यं हिंसात्मकत्वेन यज्ञनिंदा "**

**अर्थः**— हिंसा होते ह्मणून जो यज्ञनिंदा करितो तो नास्तिक.

ह्यावरून ज्यावेळी महाभारत लिहिले त्यावेळी अथवा त्याहूनहि पुरातनकाळी वैदिकयज्ञामधील हिंसेचा निषेध करणारा पंथ होता. व त्यानाच नास्तिक ह्मणत असत ही गोष्ट सिद्ध होते. वैदिकयज्ञाची निंदा करणारे सांख्य नव्हेत. कारण ते नास्तिक नव्हते. तर मग जैनासारखा त्याचाहि एक निराळाच संप्रदाय असावा.

योगवाशिष्ठामधील वैराग्यप्रकरणामध्ये श्रीरामचंद्रजीनी '**जिना**' प्रमाणे शांत होण्याची इच्छा दर्शविली आहे. तो श्लोक येणेप्रमाणेः—

**नाहं रामो न मे वांछा भावेषु न च मे मनः ।**
**शान्तमास्थातुमिच्छामि स्वात्मनीव जिनोयथा ॥**

—( अध्याय १५ श्लोक ८ )

**अर्थः**— रामचंद्र ह्मणतात—मी राम नाहीं, मला कर्मादिकाची वांछा नाहीं. विषयांमध्यें माझें मन मुळींच लागत नाहीं. " जिना " प्रमाणें आपल्यासारखीं सर्वप्राण्यांवर समता भाव ठेवून शांत असण्याची माझी इच्छा आहे.

रामायणाच्या बालकांड सर्ग १४ श्लोक २२ मध्ये दशरथाने श्रमणाला भोजन दिले ह्मणून लिहिले आहे.

**दशरथयज्ञे · ब्राह्मणाभुञ्जते नित्यं नाथवन्तश्च भुञ्जते।**
**तापसा भुञ्जते चापि श्रमणाश्चैव भुञ्जते ॥**

**अर्थः**— दशरथाच्या यज्ञात द्विजलोक ( ब्राह्मण, व क्षत्रिय, वैश्य ) आणि शूद्र नित्य भोजन करित असत. तापस अर्थात् शैवमार्गी व श्रमणहि भोजन करित होते.

श्रमण शब्दाचा अर्थ भूषण टीकेमध्यें दिगम्बर ह्मणून केला आहे.

**" श्रमणा दिगम्बरः श्रमणा वातवसना इति निघंटुः । "**

टिळकांनीं लिहिलेल्या टीकेमध्ये श्रमण शब्दाचा अर्थ बौद्ध सन्याशी ह्मणून केला आहे. तथापि हा शब्द जैनसाधू अशा अर्थाच्या ऐवजी बौद्ध ह्या अर्थीच उपयोगात आणिलेला बऱ्याच ठिकाणीं आढळतो. आणि त्यामुळे आपण ह्या शब्दाला विशेष महत्व देण्याचे कारण नाहीं. दशरथानें जैन व बौद्ध या दोघाच्याहि साधूना भोजन दिले असेल.

शाकटायनाच्या उणादिसूत्रामध्येंहि ' जिन ' हा शब्द आढळतो.

**" इणसिञ्जिदी ङुष्य विभ्योनक् "**

—( सूत्र २३९ पाद ३. )

सिद्धांतकौमुदीकारांनीं ह्या शब्दाचा अर्थ अर्हन् ह्मणून केला आहे. " जिनोऽर्हन् " हा शब्द जैनधर्माचा उत्पादक या अर्थी नेहमी योजण्यांत येतो. ह्या " जिन " आणि " बुद्ध " ह्या शब्दाचा अमर-

कोशांत समानार्थी उपयोग करण्यांत आला आहे ही गोष्ट खरी आहे. व मेदिनीकोशात जिन ह्मणजे (१) बुद्ध ह्मणजे बौद्धधर्माचा उत्पादक, (२) व " अर्हन " ह्मणजे जैनधर्माचा सस्थापक ह्मणून लिहिलें आहे.

**जिनोऽर्हति च बुद्धे च पुंसि स्यात्रिषु जित्वरे ।**

**अर्थः**– जिन हा शब्द पुल्लिगी अर्हत् किंवा बुद्ध याअर्थी योजितात. व " जिकणारा " याअर्थी तिन्ही लिंगी येतो. परतु जेथें जेथे " जिन " हा शब्द येईल तेथें तेथे तो शब्द जैनधर्माच्या प्रवर्तका-बद्दल घातला आहे ह्मणून समजावे. कारण बौद्धधर्माचा प्रवर्तक ह्मटल्या-पेक्षा " जैन " ह्या शब्दाची व्युत्पत्ति जिन ह्या शब्दापासून असल्यामुळें वर सागितलेलाच अर्थ करणे जास्त सयुक्तिक आहे. जेव्हा जेव्हां वृत्तिकार " जिन " या शब्दाचा अर्थ " अर्हन् " ह्मणून करितात तेथें तेथे तर विशेषेकरून हाच अर्थ असला पाहिजे. अशा प्रकारचा उपयोग उणादिसूत्रांमध्ये वर एके ठिकाणी केला आहे. तेथे सिद्धात-कौमुदीकारानी " जिन " हा शब्द " अर्हत् " बद्दल घातला आहे. सारांश उणादिसूत्रामध्ये " जिन " हा शब्द जैनधर्माच्या प्रवर्तका-बद्दल घातला आहे ही गोष्ट ह्यावरून सिद्ध होते.

आता शाकटायन हा कोणत्या काळी होऊन गेला ह्याचा निर्णय करू. यास्कनें आपल्या " निरुक्त " नामकग्रथामध्ये शाकटायनांतील उतारा प्रमाण ( Authority ) ह्मणून घातला आहे. तो असाः–

**'सर्वाणि नामान्याख्यातजानीति शाकटायनो नैरुक्तसमयश्च'**

—( **अध्याय १** )

**अर्थः**– सर्व नामें धातूपासून बनतात असें शाकटायन मत असून नैरुक्तसिद्धांतहि तोच आहे. यास्क हे पाणिनीच्या पूर्वी बरीच

१ **शाकटायन** ऋषि हे **दिगंबर जैनाचार्य होऊन गेले**. पाणि-नीनें आपल्या अष्टाध्यायीत तीन ठिकाणीं ह्याचा उतारा प्रमाण Authority ह्मणून घेतला आहे. हल्लीं शाकटयानकृत व्याकरण आपल्या कित्येक पाठशा-ळेंतून सुरू केले आहे ही मोठी आनदाची गोष्ट होय.

शतके होऊन गेले. व पाणिनी हे महाभाष्यकार जे पतञ्जलि त्यांच्या पूर्वीचे होत. व इसवी सनापूर्वी दोनशें वर्षे पतञ्जलि होऊन गेले असे ह्मणतात.

ब्राह्मणांच्या ग्रंथांमध्ये ' जिन ' अथवा ' अर्हन् ' हे दोन शब्द जैनधर्माच्या मूळ पुरुषाबद्दल घातलेले आढळून येतात ही गोष्ट येथे सांगितली पाहिजे. तथापि " अर्हन् " हा शब्द " जिन " ह्या शब्दापेक्षां बरेच वेळा आढळून येतो. उदाहरणार्थः— वराहमिहिरच्या " बृहत्संहिता " ग्रंथामध्ये नग्न ह्मणजे जिनाचे अनुयायी ह्मणून लिहिलें आहे.

अशोक राजाने जैनधर्म स्वीकारिला होता असे राजतरंगिणीमध्यें लिहिले आहे तेथें सुद्धां जिन हा शब्द आला आहे.

**" प्रपौत्रः शकुनेस्तस्य भूपतेः प्रपितृव्यजः ।**
**अथावहदशोकाख्यः सत्यसंघोवसुंधराम् ॥ २०१ ॥**
**यः शान्तवृजिनोराजा प्रपन्नो जिनशासनम् ।**
**शुष्कलेत्रवितस्तात्रौ तस्तारस्तूपमण्डले ॥ २०२ ॥ "**

—( **प्रथमस्तरंगः** )

**अर्थः**— तत्पश्चात् सत्यप्रतिज्ञ अशोक जो शकुनीचा पणतु व त्या राजाच्या चुलत भावाचा मुलगा पृथ्वीचा अधिपति झाला ॥ २०१ ॥ निष्पाप असा जो अशोक राजा त्यानें जैनधर्म स्वीकारला. [illegible] मध्ये ' शुष्कलेत्र ' व ' वितस्तात्र ' असे दोन [illegible] सुरुवात केले ॥ **२०२ ॥**

ह्या ' जिन ' शब्दावरूनच आह्मांस ' जैनी ' ही सञ्ज्ञा प्राप्त झाली आहे. कारण " जिनस्यानुयायिनो जैनाः " जिनाचे अनुयायी जैन. " अर्हन् " हा शब्द हनुमाननाटक, गणेशपुराण व भागवत-पुराण इत्यादि ग्रंथामध्ये आला आहे.

**" शैवं पाशुपातं कालमुखं भैरवशासनम् ।**
**शाक्तंवैनायकं सौरो जैनमार्हतसंहिता ॥ "**

**—( अध्याय ४७ श्लोक ३२ गणेशपुराण. )**

**अर्थः—** गणपतीची जी सहस्र नावे आहेत त्यांमध्येच " शैव, पाशुपत, कालमुख, भैरव, शासन, शाक्त, वैनायक, सौर, जैन आर्हत-शासन, " हीहि आहेत.

**यस्य किलानुचरितमुपाकर्ण्य कोंकवेंककुटकानां राजाऽर्हन्नामोपशिक्ष्य कलावधर्म उत्कृष्यमाणोभवितव्य न विमोहितः स्वधर्मपथमकुतोभयमपहायकुपथपाखंडपथमसमंजसं निजमनीषया मन्यसंप्रवर्तयिष्यते ॥**

**( भागवत पंचमस्कंध अ. ६ श्लोक ९ )**

**अर्थः—** ज्यांचे ( ऋषभदेव ) चरित्र ऐकून कोंक, वेंक, कुटकदेशाचा राजा श्रीअर्हत् हा श्रीऋषभदेवापासून दीक्षा घेऊन पूर्वकर्मानुसार कलियुगामध्ये जेव्हा पुष्कळ अधर्म होईल तेव्हां आपला धर्म सोडून ज्यामध्यें कोणत्याहि प्रकारची भीति नाही व सर्वांना असमत असे पाखड मत ( नास्तिक धर्म ) सुरुवात करील असे ह्मटले आहे. ह्या अर्हत् शब्दावरूनहि जैनांना ' आर्हता. ' असे ह्मणतात हें उघड आहे.

## बौद्धमताचे ग्रंथ.

आतां आपण **बौद्धधर्माच्या ग्रंथांचें निरीक्षण** करू. बौद्धशास्त्रांत जैनांचे अतिम चोविसावे तीर्थंकर जे महावीरस्वामी हे बुद्धाचे समकालीन होते असें वर्णन केले आहे. व बुद्धाविरुद्ध जे सहा प्रतिस्पर्धी उपदेशक त्याकाळी होऊन गेले त्यांपैकी महावीर एक होते असेहि ह्मटले आहे. कल्पसूत्र, आचारांगसूत्र, उत्तराध्ययन, सूत्रकृताग व दुसरे कांहीं श्वेतांबर ग्रथ आहेत त्यामध्ये महावीराला ' ज्ञातपुत्र ' असें ह्मटले आहे. व ' ज्ञात ' ही एक क्षत्रियांची जात आहे. क्षत्रियामधील ' ज्ञात्रिक ' कुलामध्ये महावीराचा जन्म झाला. उपरिनिर्दिष्ट जैनग्रथांमध्यें व तसेच इतर ग्रथामध्येंहि ' ज्ञात्रिकाचें ' वर्णन आले

आहे. महावीराला " वैशालिक " ह्मणजे वैशालीचा नागरिक, तसेच " वैदेह " ह्मणजे विदेहचा राजपुत्र ह्मणून ह्मणत असत. तो कश्यप गोत्राचा होता असेहि ह्मटले आहे. परतु त्याला जैनशास्त्रामध्ये ज्ञातपुत्र या नांवानेच सबोधिले आहे. बौद्धग्रथामध्ये त्याला नातपुत्त ह्मणजे ( प्राकृत ) नात=( सस्कृत ) ज्ञात अथवा ( प्राकृत ) पुत्त=( सस्कृत ) पुत्र असे ह्मटलेले आढळून येते. तसेच बौद्धग्रथामध्येहि ' ज्ञात्रिके ' ला नादिक अथवा नातिक असेहि ह्मटले आहे. जैननिर्ग्रंथ अथवा प्राकृतनिर्ग्रंथ यांचेहि बौद्धग्रथामध्ये वर्णन दिलेले बरेच वेळां आढळून येते. व त्याना निर्ग्रंथ नातपुत्त अथवा महावीर याचे अनुयायी असे ह्मटले आहे.

बौद्धग्रथात जैन धर्माच्या कांहीं महत्वाच्या गोष्टींचें वर्णन दिले आहे. उदाहरणार्थः- दिग्व्रत मुनींनी, थड पाणी उपयोगात न आणणे, कर्मवाद, क्रियावादीचे तत्व-इत्यादि विषयांसंबधाने बरीच उपयुक्त माहिती सापडते. त्या ग्रथामध्ये ह्या गोष्टी नातपुत्ताच्या ह्मणजे आपल्या महावीराच्या अथवा निर्ग्रंथ ह्मणजे जैन मुनी याच्या तोंडीं घातल्या आहेत. कित्येक ठिकाणी श्रावक अथवा स्रावक हा शब्द ' गृहस्थी जैन ' ह्याअर्थी योजिला आहे. महावग्ग आणि महापरिनिव्वाणसुत्त या दोन बौद्धग्रथात जैनमताचा उल्लेख आहे. पार्श्वनाथ अथवा पारसनाथ याचा चतुर्याम धर्महि सांगितला आहे. यावरून हे सगळे उल्लेख जैनाविषयीच असले पाहिजेत याविषयीं शका उरत नाहीं.

ह्या आश्चर्यकारक शोधाचे श्रेय बुल्हर ( Bulher ) व जेकोबी ( Jacobi ) साहेबाकडे येते. मी स्वत. " पौर्वात्याचे धर्मग्रथ " ' Sacred books of the East ' ह्यामधील महावग्ग व महापरिनिव्वाणसुत्त वाचिली आहेत. ज्ञातपुत्त, निर्ग्रंथ, अथवा त्यांचा धर्म, व श्रावक हे शब्द ज्या ज्या ( passages ) ठिकाणी आले आहेत त्या त्या ठिकाणची सर्व भाषातरे मी वाचली आहेत. जेकोबी साहेबांनीं " पूर्वेचे धर्मग्रथ " ह्या पुस्तकमालेतील ४५ व्या पुष्पांमध्ये ह्याचें वर्णन

केले आहे. (Vide Sacred books of the East Vol XLV ) महावग्ग व महापरिनिव्वाणसुत्त या दोन ग्रथांशिवाय जेकोबीसाहेबांनीं अनुगुतरनिकाय, दिघनीकाययाचे सामान्नफलसुत्त, सुमगलविलासिनी, दिघनीकाच्या ब्रह्मगाल सूत्रावर बुद्धगोपाची टीका, व माघमनिकाय ह्या ग्रथांतूनहि उतारे घेतले आहेत. ओरिएटल ( Oriental ) पत्रानेहि ललितविस्तार नामकग्रथाचाहि निर्देश केला आहे. वरील सर्व ग्रथ खिस्ती शकाच्या पूर्वीच लिहिले आहेत. मॅक्समुल्लरसाहेबांनीं Six systems of Philosophy & Natural Religions षट्दर्शन व स्वाभाविक धर्म अशी दोन पुस्तकें लिहिलीं आहेत. व ओल्डनबर्गने धी बुद्ध ( The Buddha ) ह्मणून एक उत्कृष्ट पुस्तक लिहिले आहे. महावीर व नातपुत्त हे दोघे एकच होत, व त्याचप्रमाणे महावीर हा बुद्धाचा समकालीन असून जे सहा तीर्थक उपदेशक होऊन गेले त्यापैकी एक होता असे ओल्डनबर्गच्या ‘ बुद्ध ’ ह्या ग्रथावरून कळते. त्यात असेहि लिहिले आहे कीं, नातपुत्त ( महावीर ) हा जैन ह्मणजे निर्ग्रथ मताचा संस्थापक होता. परतु हे वस्तुस्थितीला धरून नाही. महावग्ग, महापरिनिव्वाणसुत्त, व जेकोबीसाहेबांनीं बौद्धमताच्या ग्रथावरून कांहीं कांही ठिकाणची केलेली भाषांतरे ही सर्व मी मननपूर्वक वाचिलीं आहेत. व त्यावरून मी असें ह्मणतो कीं, नातपुत्त, निर्ग्रथ व त्यांचा धर्म व तसेंच कित्येक ठिकाणीं श्रावक हे सर्व ज्याचे बौद्धशास्त्रांत वर्णन केलेलें ते सर्व जैन होत. एवढेंच नव्हे, परतु बौद्धधर्मशास्त्रामध्ये चातुर्यामधर्म व पार्श्वनाथाचीं चार महाव्रते याचे वर्णन करून जे महावीराच्या ( नातपुत्ताच्या ) तोंडी घातले आहे ते सर्व चुकीचे आहे. सुधर्माचार्याचे गोत्र व महावीराची निर्वाणभूमि यासबधानेहि बौद्धग्रथांत लिहिले आहे. निर्ग्रथ हा शब्द फक्त जैन साधूमागेच लावितात हीहि गोष्ट येथे नमूद करणे जरूर आहे. श्रमण आणि ब्राह्मण ह्या शब्दाचा उपयोग जैनानीं व बौद्धांनीं आपापले साधु याअर्थी केला आहे. परतु निर्ग्रथ हे विशेषण केवळ जैन साधूंच्या मागेंच लावण्यात येते. निर्ग्रथ

' निर्गता ग्रंथा यस्मात् सः ' ह्मणजे ज्याच्याजवळ कोणत्याहि प्रकारचा परिग्रह नाही तो. बौद्धधर्माची शाखा जैनधर्म आहे असे समजणारे बार्थ ( Barth ) साहेब हे निर्ग्रंथ ( ह्या शब्दाचा उल्लेख अशोकराजाच्या आज्ञापत्रांत आला आहे. ) ह्मणजे जैनाचे पूर्वज असा अर्थ करितात. बार्थसाहेबहि, जेकोबी व बुल्हर ह्या साहेबानी जो शोध लाविला आहे तो पाहून आश्चर्यचकित झाले आहेत. तथापि त्याचें असें ह्मणणे आहे की, जास्त पुरावा मिळेतोपर्यंत स्वस्थ राहणेच उचित होय. बार्थसाहेबानीं हे इसवी सन १८९२ साली लिहिलें आहे व जेकोबीसाहेबांनी इसवी सन १८९५ साली आपल्या ' पूर्वेकडील धर्मग्रंथ ' भाग (खंड) ४५ ( Sacred Books of the Eeast Vol XLV ) मध्ये ह्यासंबधानें विशेष माहिती दिली आहे.

इसवी सनापूर्वी तीन चार शतकें अगोदर लिहिलेल्या बौद्धांच्या ग्रंथांमध्ये जर जैनासंबधाने असं लिहिलेलं आढळून येतें तर जैनलोक ही बौद्धाची शाखा असणे कसे संभवनीय तरी आहे ?

## बौद्धधर्माची उत्पत्ति.

### जैनशास्त्र.

आतां आपण **जैनशास्त्राकडे** वळू. बौद्धधर्माच्या उत्पत्तीबद्दल जैनशास्त्रात जी कांहीं माहिती मिळते ती अशी आहे. **श्रीदेवनंदिआचार्यांनी** संवत ९९० सालीं उज्जयनीनगरीमध्ये **दर्शनसार** ह्मणून ग्रंथ लिहिला आहे. ह्या दर्शनसार ग्रंथात तसेच **श्रीवादिचंद्रप्रणीत ज्ञानसूर्योदय** नाटकात असा उल्लेख आहे की, श्रीपार्श्वनाथाच्या आम्यात ( ह्मणजे पार्श्वनाथ होऊन गेल्यावर व महावीरस्वामी होण्यापूर्वी ) पिहितास्त्रवनामक जैन मुनींचा विद्वान व शास्त्रसंपन्न असा बुद्धकीर्ति नावाचा एक सन्याशी शिष्य होता. तो पलासनगरीत राहून तप करीत असे. त्यासंबधाने असे ह्मटले आहे:—

**सिरि पासणाहतित्थे सरउतीरे पलासणयरत्थे । पिहिआसवस्स सीहे महालुद्धो बुद्धकीत्ति मुणी ॥ ६ ॥ तिमि पूरणा-**

**सणेया अहिगयपव्वज्जावओपरमभट्ठे। रत्तंबरंधरित्ता पवट्ठियं तेण एयत्तं ॥७॥ मंसस्स णत्थि जीवो जहा फलेदहियदुद्धसकराए। तह्मा तं हि मुणित्ता भक्खंतो णत्थि पाविट्ठो ॥ ८ ॥ मज्जं णवज्जणिज्जं दव्वदवंजहजलंतहएदं ॥ इति लोए घोसित्ता पव्वतियं संघसावज्जं ॥ ९ ॥ अण्णोकरेदिकम्मं अण्णो तं भुंजदीदि सिद्धंतं ॥ परिकप्पिऊणणूणं वसिकिच्चाणिरयमुववहणो ॥ १० ॥**

**अर्थः**— श्रीपार्श्वनाथ तीर्थी शरयूनदीच्या काठी पलासनामक नगरीत पिहिताश्रवमुनीचा शिष्य बुद्धकीर्तिनामे होऊन गेला. एके वेळी शरयूनदीला पुष्कळ पाणी येऊन पूर आला असताना त्या नदीच्या प्रवाहात बरेचसे मृत झालेले मासे वाहात वाहात काठाला येऊन लागले. त्या मत्स्याना पाहून त्या बुद्धकीर्तीला असे वाटले कीं, स्वतः आपोआप मेलेले मासे खाण्यात काय दोष आहे? व असा विचार करून त्याने अंगिकारलेले प्रवज्जा व्रत सोडून दिले; अर्थात् पहिल्याने अंगिकार केलेल्या धर्मापासून भ्रष्ट झाला व मांस भक्षण केले. व लोकांनाहि पुढे अशा रीतीने उपदेश करू लागला कीं, मांसामध्ये जीव नसतो. ह्याकरिता ते भक्षण केल्याने पाप लागत नाही! फळे, दही, दूध, साखर आदिपदार्थांच्या भक्षणाप्रमाणेच मदिरापानासहि हरकत नाहीं. अशा रीतीने उपदेश करून बौद्धमत प्रचारांत आणिले. शिवाय त्याच्या मनावर जैनधर्माचा थोडा तरी संस्कार झाला असल्यामुळे तो असाहि उपदेश करू लागला की, सर्व पदार्थ क्षणिक आहेत. ह्यामुळे पापपुण्याचा कर्ता एक व त्याची फळे भोगणारा वेगळा आहे. हाहि सिद्धांत त्याने लोकांपुढे मांडिला. अशा रीतीच्या प्रतिपादनानें व मनसोक्त आचरणाने लोकांना नवीन सिद्धान्ताची चटक लावून त्याने बौद्धधर्माची स्थापना केली. व ह्मणून हाच बुद्धधर्माचा संस्थापक होय. बुद्धकीर्ति जैनी होता, पण नंतर त्यानें वरील मतें प्रसरित करून जैनधर्मापासून च्युत होत्साता रक्तांबरधारी बनून बुद्धधर्म प्रचलित केला. स्वामी आत्माराम श्वेताम्बरी साधू यांनीं आपल्या ' अज्ञानतिमिरभास्कर '

ग्रंथामध्यें व इतर ग्रंथांमध्यें व तसेच शीवचन्द्रदिगम्बरी पंडितांनीं आपल्या प्रश्नोत्तर दीपिकेमध्यें बौद्धधर्मासबधाने दर्शनसारग्रथांतील वरील गाथा-प्रमाण ( Authority ) ह्मणून दिली आहे. आणि तत्कालान सर्व पडितहि ह्या गाथेचा आधार ( Authority ) देऊन वरील मताचेच पुष्टीकरण करितात. व ते लेखक असेहि आणखी प्रतिपादन करितात की, बुद्ध हा पहिल्याने वस्तुत· जैनसाधु होता. परतु पुढें ज्ञानभ्रष्ट झाल्याने त्यानें मासाशनाची प्रशसा केली. व रक्तवस्त्रें परिधान करून आपल्या स्वत चा एक नवीन पथ स्थापिला.

ह्यावरून ब्राह्मणांच्या ग्रथामध्ये व्यासमुनीच्या वेळीं देखील जैन ही बौद्धधर्माची शाखा आहे असे लिहिलेले कोठेहि आढळून येत नाहीं. ही गोष्ट सिद्ध होते. आणि ह्याच काळी बुद्ध हा स्वय विद्यमान् होता.

बौद्धांच्या शास्त्रांमध्ये जैन हे बुद्धाचे समकालीन होत असे लिहिले आहे. आणि जैनमत हे नवीन प्रचलित झालेल्या बौद्धधर्मापेक्षा फार प्राचीन आहे असाहि कित्येक ग्रथात उल्लेख केलेला आढळतो. आणि जैनशास्त्रावरून आपणाला असे दिसते की, बुद्ध हा पिहिताश्रवनामक जैनसाधूचा शिष्य होता. वस्तुस्थिति अशी असताना जैनधर्म हे बुद्ध-धर्माचे पितृ असे कसें मानावे? जैनधर्म ही बुद्धधर्माची शाखा आहे असे प्रतिपादन करण्यात वेबर ( Weber ), विलसन ( Wilson ) प्रभृति विद्वानांनी मोठी अक्षम्य अशी चूक केली आहे. असो; त्यानीं

---

१ लो. मा. **बाळ गंगाधर टिळक** यानींहि बौद्धाविषयी आपल्या व्याख्यानात खुलासा केला आहे ते ह्मणतात "बौद्धधर्मापासून जैन धर्माची उत्पत्ति नाही. कारण असे की जैनाचे अतिम चोविसावे तीर्थंकर महावीर याचा बौद्ध हा शिष्य होता."

जैनधर्म हा बौद्धधर्माहून भिन्न, अत्यत प्राचीन व परिणतावस्थेला पोहोचलेला धर्म आहे ही गोष्ट १ कॅपटनलआर्ड, २ हटर, ३ मि. कन्नूलाल, ४ राईडेविड, ५ एडूबाई प्रभति विद्वानानीं आपापल्या ग्रथात कबूल केली आहे.

---

1 Census Report C. P 1901 — 2 Indian Empire. Page 206
3 Theosophist. Dec 04 & Jan 05. — 4 Encyclopedia Bri. Vol. 29
5 Book on Indian Customs. 1817.

काढलेली अनुमानें जरी घाईमुळें चुकीचीं ठरलीं तरी एकंदरींत ते विद्वानच आहेत. व त्यांनीं जें लिहिले आहे ते चुकीचें व निराधार आहे असें समजून आपण ते विसरून जावे. पाश्चात्याच्या घाईनें परतु सद्धेतूने लिहिलेल्या अशा चुकीच्या लेखामुळे अन्यधर्मी लोक जैनधर्म ही बौद्धधर्माची शाखा आहे असें समजू लागले एवढेच. जैनधर्माची प्राचीनता कळण्याकरितां ह्मणून त्यांनीं जैन, बौद्ध अथवा ब्राह्मण ह्या तिघाच्या धर्मग्रथांपैकी एकाच्याहि धर्मग्रथाचे मननपूर्वक व सूक्ष्म अवलोकन केले नाहीं ही गोष्ट मात्र यावरून सिद्ध होते.

## बुद्ध हा महावीरस्वामीचा शिष्य नव्हता.

हटर प्रभृति विद्वानांनी बुद्ध हा महावीर स्वामीचा शिष्य होता असे जे विधान ठोकून दिले आहे ते साफ खोटे व जैनशास्त्राविरुद्ध आहे. जैनलोक बुद्धाला पिहिताश्रवाचा शिष्य समजतात. गौतमबुद्धाखेरीज एक गौतम इद्रभूति ह्मणून होऊन गेला. गौतम इद्रभूति हा महावीरस्वामीचा मुख्य गणधर असून चेला होता. कोलेब्रुक ( Colebrook ) स्टीवन्सन ( Stevenson ) मेजर डिलेमन, ( Major Delamaine ) व डाक्टर हॅमिल्टन ( Dr Hamilton ) यानीं व इतरानीं गौतम बुद्ध व गौतम इद्रभूति हे दोघेहि एकच आहेत अशी आपली चुकीची समजूत करून घेतली आणि त्यामुळे गौतमबुद्ध सुद्धा महावीराचाच शिष्य होता असे आपले मत ठोकून दिले. परतु वरील विधान सर्वस्वी चुकीचे व निराधार आहे.

बुद्ध हा महावीराचा शिष्य होता असे जैनांनी कव्हांहि ह्मटलें नाही. त्यांच्या कोणत्याहि धर्मग्रथांत असें लिहिलेले आढळत नाही. परतु ज्या गृहस्थानी गौतमबुद्ध व गौतमइद्रभूति हे एकच आहेत असे मानिलें त्या गृहस्थांची ही चुकी आहे. वस्तुतः गौतमइद्रभूति हा महावीरस्वामीचा शिष्य होता. ही चुकी जैनांची नव्हे, तर मग ह्या चुकीचें खापर जैनांच्या डोक्यावर आदळण्याचें कारण काय असेल ते असो! जैनशास्त्रामध्ये बुद्ध हा पिहिताश्रवाचाच शिष्य होता असे लिहिलें आहे.

## बुद्ध हा महावीरस्वामीचा समकालीन होता.

जैनशास्त्राचे व बुद्धाच्या धर्मग्रथांचे एका बाबतीत जे सगन-मत झाले आहे ते पाहून मला फार आश्चर्य वाटते. बुद्धाच्या धर्मग्रथांमध्ये महावीर हा बुद्धाच्या विरुद्ध उपदेश करणारे जे सहा उपदेशक होऊन गेले त्यांपैकीं एक होता ह्मणजे महावीर हा बुद्धाचा समकालीन होता असे लिहिले आहे त्याचा मी एकदा वर उल्लेख केलाच आहे. जैनशास्त्रामध्येहि महावीर हा बुद्धाचा समकालीन होता ह्यासबधानें अशीच एक गोष्ट आहे.

बुद्धकीर्ति हा पिहिताश्रवाचा शिष्य होता, व पिहिताश्रव हा पार्श्वनाथ तीर्थामध्ये ( पार्श्वनाथ व महावीर याच्या अभ्यतर काली ) होऊन गेला असा वर एके ठिकाणीं उल्लेख आला आहे. स्वामी आत्मारामजी हे कवलगच्छाच्या पट्टावलीचा पत्ता पार्श्वनाथस्वामीपासून लावितात तो असा.--

१ श्रीपार्श्वनाथ. २ श्रीशुभदत्तगणधर. ३ श्रीहरिदत्तजी.
४ श्रीआर्यसमुद्र. ५ श्रीस्वामीप्रभसूर्य. ६ श्रीकेशीस्वामी.

स्वामी प्रभसूर्याच्या साधू सवापैकी पिहिताश्रव हा एक होता असें ते पुढे लिहितात. उतराध्ययन सूत्रावरून व श्वेताम्बराच्या धार्मिक-ग्रथांवरून आपणाला असे कळते की, केशी हा पार्श्वनाथाच्या पक्षापैकी एक होता. व तो महावीरस्वामीच्या वेळीं विद्यमान होता. बुद्धकीर्ति हा पिहिताश्रवाचा शिष्य असल्यामुळे महावीराचा तत्कालीन असलाच पाहिजे किंबहुना त्यापूर्वीचाहि असावा; कारण पिहिताश्रव हा प्रभास्वामीचा चेला होता. जैनांचे अतिम चोविसावे तीर्थकर महावीर व गौतमबुद्ध याना बहुतेक इतिहासकार एकच समजत होते. परतु शास्त्रान्वेषणावरून व तसेच इतिहाससशोधनावरून ही समजूत त्याची चुकीची व निराधार आहे असेंच ह्मणणे भाग पडते. कारण त्या दोघामध्ये पुढे लिहिल्याप्रमाणे फरक आढळून येतो.--

| महावीर ( चोविसावे तीर्थंकर ) | बुद्ध |
|---|---|
| १. उत्तर हिंदुस्थानात कुंडलपुरामध्ये जन्म. | १. कपिलवस्तूमध्यें जन्म. |
| २. जन्मतिथि इ. सनापूर्वी ५९९ वर्षे. | २. इ. सनापूर्वी ५५७ वर्षे. |
| ३. बापाचें नाव सिद्धार्थ व मातेचे नांव प्रियकारणी अथवा त्रिशला देवी. | ३. बापाचें नाव शुद्धोदन व मातेचे नाव मायादेवी. |
| ४मातोश्री वृद्धापकाळपर्यंत जिवत होती | ४. मातोश्री जन्म होतांच वारली. |
| ५. बालब्रह्मचारी होते. | ५. यशोधरेबरोबर लग्न केलें. |
| ६. सर्वासमोर दीक्षा घेतली होती. | ६. कोणाची परवानगी न घेता चोरून भिक्षुक झाले होते. |
| ७. २९ व्यावर्षी दीक्षा घेतली. | ७. २३ व्या वर्षी दीक्षा घेतली. |
| ८. बारा वर्षेपर्यंत तपश्चरण केले. | ८ चार वर्षामध्येच केवली झाले. |
| ९. पावापुरीमध्ये निर्वाणास गेले. | ९. कुसिनगरीमध्ये निर्वाणाला गेले. |
| १०. इ. सन ५२७ वर्षापूर्वी. | १०. इसवी सन ४८० वर्षापूर्वी. |

ह्यावरूनहि बुद्ध हा महावीराचा **समकालीन** होता हीहि गोष्ट सिद्ध होते. **सर मोनियर वुइलियम्स** साहेब हे कांहीं दिवसापूर्वी रॉयल एशियाटिक सोसायटीच्या सभेमध्ये ह्मणाले.– जैनधर्माचे प्रचारक वर्धमान ( महावीर ) स्वामी व गोतमबुद्ध हे दोघे **समकालीन** होते ही गोष्ट बहुतेक सर्व विद्वानांना मान्य झाली आहे. **जैनधर्म हा एक स्वतंत्र स्याद्वादमतवाल्यांचा धर्म होय.** आणि हा जैनधर्म बौद्ध धर्मापूर्वी प्रचलित होता असेच ह्मणावें लागतें. निर्ग्रंथ अथवा दिगम्बर जैन अर्थात् साधूलोकांचा पथ हा बुद्धाच्या पूर्वी विद्यमान होता ही गोष्ट हरतऱ्हेने सिद्ध होते.

स्वामी **अमितगति आचार्यांनीं** संवत १०७० सालीं **धर्मपरीक्षा** ह्मणून एक ग्रथ लिहिलेला आहे. त्यावरून असे कळते कीं, पार्श्वनाथस्वामीचा शिष्य जो मौडिलायन त्याचे महावीरस्वामीशीं वैर होतें. त्यानें द्वेषबुद्धीने बौद्धमत स्थापिलें. मौडिलायन( Mogglayan ) हा शुद्धोदनाचा पुत्र जो बुद्ध त्यालाच परमात्मा मानूं लागला. हें सर्व कालदोषामुळें घडून आलें.

**रुष्टः श्रीवीरनाथस्य तपस्वी मौडिलायनः।**
**शिष्यः श्रीपार्श्वनाथस्य विदधे बुद्धदर्शनम् ॥ ६८ ॥**
**शुद्धोदनसुतं बुद्धं परमात्मानमब्रवीत्।**
**प्राणिनः कुर्वते किं न कोपवैरिपराजितः ॥ ६९ ॥**

—( **धर्मपरीक्षा अ. १८.** )

**अर्थः**— पार्श्वनाथ भगवानचा शिष्य मौडिलायन हा एक तपस्वी होता. त्याने महावीरस्वामींशी भाडण केलें व बौद्धमताचा प्रसार केला. तो शुद्धोदनराजाचा पुत्र जो बुद्ध त्याला परमात्मा मानू लागला हे योग्यच आहे. कारण कोपरूपी वैऱ्याने जिकल्यावर हा ससारी जीव काय करणार नाही बरे? येथें प्रथम श्लोकामध्ये ' शिष्य ' ह्मणून शब्द आला आहे त्याचा अर्थ शिष्याचा शिष्य ह्मणून समजावा. महावग्गा ( पूर्वेकडील धर्मग्रथमाला भाग १३ पान १४१ ते १५० Sacred Books of the East Vol XIII P P 141-150) मध्ये मौडिलायन व सारीपुत्त हे दोघे ब्राह्मण सजय परिव्राजकाचे ( विहार करणारे तपस्वी ) अनुयायी होते. जरी सजयाने त्याची कानउघाडणी करून त्यापासून पराङ्मुख होण्याबद्दल उपदेश केला तरी त्यांनी त्याच्याकडे दुर्लक्ष केले. व बुद्धाकडे जाऊन त्याचे चेले बनले. धर्मपरीक्षेमध्ये असे लिहिले आहे की, मौडिलायन हा पार्श्वनाथाच्या शिष्याचा शिष्य होता. आणि ह्यामुळे मौडिलायनाचा गुरु जो सजय तो जैनच असला पाहिजे. व तो केशीप्रमाणे पार्श्वनाथाच्या पथातलाच असला पाहिजे. आणि ज्याअर्थी मौडिलायन हा महावीराचा समकालीन होता व महावीराशी त्याचें वैर होते, व तसेच तो स्वतः बुद्धाचा चेला होता त्याअर्थी महावीर व बुद्ध हे तत्कालीनच असले पाहिजेत. तथापि वरील दोन शास्त्रांवरून व श्रेणिक चरित्रावरून आपणांला असे दिसून येतें कीं, महावीरस्वामी ' अर्हत् ' होण्याच्या पूर्वीच बुद्धाने आपल्या नवीन मतांचा उपदेश करण्यास सुरुवात केली होती. ह्याशिवाय मौडिलायन हा बौद्धधर्माचा उत्पादक नव्हता हेहि आपणाला माहि-

तच आहे. तेव्हा धर्मपरीक्षेतील श्लोकाचा अर्थ असा असला पाहिजे की, मौडिलायनानें बुद्धाला बौद्धमताचा प्रसार करण्यामध्यें इतरांपेक्षा फार मदत केली. आणि ज्याअर्थी मौडिलायन व सारिपुत्त हे दोघे बुद्धाचे मुख्य शिष्य होते त्याअर्थी असाच अर्थ करणे योग्य होय. आणि ह्या गोष्टीची सत्यता बौद्ध ग्रंथावरून चांगली पटते. कारण त्यांच्या ग्रंथामध्येंहि असेच वर्णन सांपडते.

## जैनांचें विशेष प्राचीनत्व.

आता आपण जैनांच्या प्राचीनत्वाबद्दल आणखी कांहीं विशेष माहिती मिळते कीं काय हें पाहू. कोलेब्रुक, बुहलर व जेकोबीसारखे विद्वान गृहस्थ ह्मणतात कीं, जैनधर्म हा ब्राह्मण धर्मापासून निघाला आहे व तो पार्श्वनाथस्वामींनी प्रचलित केला. ह्या त्यांच्या विधानांत कितपत खरेपणा आहे याचा निर्णय करू. बुहलर व जेकोबी यानी जो शोध लाविला आहे. त्याबद्दल आह्मी त्याचे ऋणी आहोत. परंतु ' जैनधर्म ' हा ब्राह्मण धर्मापासून निघाला, अथवा जैनधर्माचा संस्थापक पार्श्वनाथ आहे. असे लिहिण्यांत ते आह्मांसंबंधाने मोठा अन्याय करतात असे स्पष्ट ह्मणणे भाग पडते. कारण ह्या त्याच्या कृतीने, आह्माला " आगींतून काढून फुपाट्यांत सोडले " ह्या ह्मणीची आठवण होते. कारण ह्या त्याच्या कृतीनें एका दोषारोपापासून मात्र आह्मी मुक्त होतो, परंतु दुसरा मिथ्या दोषारोप आमच्यावर लादण्यांत येतो. जैनधर्म ही बौद्धधर्माची शाखा आहे असे प्रतिपादन करण्यात लेसन, वेबर, बार्थ व बुइल्सनादि लेखकांनी जशी चूक केली तशीच चूक जेकोबी व बुहलर याच्याकडूनहि या बाबतीत झाली. जैनमतासंबंधाने लेसनादि विद्वान गृहस्थाना फारच थोडी माहिती होती. जैनधर्मामध्ये व बौद्धधर्मामध्ये त्याना कांहींसे साम्य दिसले. आणि ह्मणून त्यांनीं बौद्धधर्माची शाखा जैनधर्म आहे असें लिहिले. त्याप्रमाणेच बुहलर व जेकोबी साहेबाना जैनधर्मांतील व ब्राह्मण धर्मातील सारखेपणा पाहून फार अचंबा वाटला. व त्यांना जैनधर्माची अपुरी माहिती

असल्यामुळे त्यांनीहि जैनधर्म ही ब्राह्मणधर्माची शाखा आहे असे अनुमान काढले. येथें हे सांगितले पाहिजे की, त्यानी असे मत देण्यात फाजील घाई केली. जैन धर्मग्रथांचे चांगल्या रीतीनें परिशीलन करीतोंपर्यंत त्यांनी मत न देणेंच योग्य होते. ह्या विद्वानद्वयाना ' जैनधर्म ही बौद्धधर्माची शाखा नाहीं ' ही गोष्ट मान्य आहे. कारण अशा तऱ्हेचा प्रत्यक्ष पुरावा त्यांना बौद्धधर्मग्रथांतच दिसून आला. ' जैनधर्म हा बौद्धधर्माच्या मागून निघाला, व बुद्धाच्या पूर्वीच विद्यमान असलेले जे निर्ग्रंथ त्याचा हा जैनधर्म आहे ' अशा तऱ्हेची माहिती त्याना बौद्धाच्या धर्मग्रथांत आढळली. आता या विद्वानाना आमचे असे सागणें आहे की, हिदु शास्त्रांचे चांगले परिशीलन करा. व जैनाच्या प्राचीनतेसबधानें हिदु शास्त्रांमध्ये काय काय माहिती सांपडते ती पाहा.

## जैनधर्म हा ब्राह्मण धर्मापासून निघाला नाहीं. परंतु दोन्ही धर्म, पुराण अशा भरतखंडाच्या एका वायुमंडलापासून निघाले आहेत.

जैनधर्म हा ब्राह्मण धर्माची शाखा आहे किंवा दोन्ही धर्म पुराण अशा भरतखडामधील एकाच वायुमडलापासून निघाले आहेत यासबधाने त्यांनी दोघाच्याही धर्मग्रथांचे चागल्या रीतोने परिशीलन करावे एवढेच आमचे त्याना सागणे आहे

## लोकांचे पुराण अशा भरतखंडासंबंधानें फार गैरसमज झाले आहेत.

पुरातन काळच्या भरतखडासबधाने फारच चुकीच्या कल्पना लोकांच्या झाल्या आहेत ही गोष्ट येथे सागणे प्राप्त आहे. ह्यावरून मी एखाद्या दुराग्रही विद्वानाप्रमाणे कांही तरी सांगत आहे असें मात्र आपण समजू नका. मी कांहीं विद्वान नाही अथवा विद्वानांच्या अगीं असणारे गुणहि माझ्या अगी नाहींत. मी एक सामान्य विद्यार्थी आहें. ह्या विषयासबधाने जो मी अभ्यास केला आहे तो फार अपुरता आहे.

कॅप्टन सी. ई. लुआर्ड, ( Captain C. E Luard ) हे मध्यहिंदुस्थानातले खानेसुमारीचे मुख्य अधिकारी ( Superintendent ) आहेत. त्यांनीं काहीं दिवसांपूर्वी माझे पुरस्कर्ते जे, डब्लु. डी. जॉनस्टन एफ्. आर. जी. एस्. ( J M D. Johnston Esqr. F R G S ) ह्यांच्या मार्फत ( हे ग्वाल्हेर स्टेटमधील शिक्षणखात्याचे मुख्याधिकारी आहेत, व खानेसुमारीचेहि मुख्य ऑफिसर आहेत. ) मजकडे कांहीं प्रश्न पाठविले. मीं आपल्या मित्राच्या सहाय्याने त्या प्रश्नाची उत्तरें दिलीं. व त्या वेळींच जैनांच्या प्राचीनतेसबधानें अभ्यास करण्याचीहि मला प्रेरणा झाली. तेव्हापासून आह्मी ह्या विषयासबधानें अभ्यास करीत आलो आहोत. आणि जे जे काही आह्मी आजपर्यंत ग्रथ वाचिले त्यांवरून असे दिसून येते की, पुरातन भरतखडासबधाने फार विचित्र गैरसमज झाले आहेत. लोकांची सर्वसाधारण अशी समजूत झाली आहे कीं, पुरातन भरतवर्षात ब्राह्मणधर्माशिवाय दुसरा कोणता धर्मच प्रचलित नव्हता. परतु ब्राह्मणमत ह्मणजे काय आहे ह्याचा कधींहि कोणी विचार करीत नाही. भरतखडामध्यें प्राचीनकाळी असणारी हरएक वस्तु ह्मणजेच ब्राह्मणधर्म असे जर त्यांचे ह्मणणे असेल तर ते त्याचें ह्मणणे रास्त आहे. परतु ब्राह्मणधर्म ह्मणजे ‘ वैदिकधर्म ’ अथवा ‘ वैदिक यज्ञधर्म ’ असे जर ते ह्मणत असतील तर ते त्यांचे ह्मणणें योग्य नाही. कारण प्राचीन भरतवर्षामध्ये ब्राह्मण धर्माशिवाय दुसरे काहीं एक नव्हते असे अनुमान करण्यांत ते मोठी घोडचूक करितात. प्राचीन हिंदुस्थानामध्ये सर्वत्र ठिकाणीं फक्त वैदिकयज्ञच कांही चालू नव्हते. ही गोष्ट खरी आहे की,--

**‘ अग्नीषोमीयं पशुं हिंस्यात् ’**

**अर्थः–** ज्याचे देव अग्नी व सोम आहेत अशाच पशूचा वध करावा असे प्रतिपादन करणारे कांहीं लोक होते. परंतु त्याच वेळीं त्या विरुद्ध होते:—

" मा हिंस्यात्सर्वभूतानि "

**अर्थः**– कोणत्याहि प्राण्याची हिंसा करू नका. या तत्वानुयायांचीहि संख्या कांहीं थोडी नव्हती. आणि खालीं लिहिल्याप्रमाणें उपदेश करणारीं माणसेहि त्यावेळी होती. हीं मतें चार्वाकलोकांचीं आहेत. हिंदु धर्मात अथवा जैन धर्मात चार्वाक मतांना मुळींच मान नाहीं. खाली दिलेला सुखवाद मनुष्याकरितां नसून चतुष्पादाकरितां आहे. देह हाच आत्मा समजणारे व या देहाची उपासना करणारे जे हे सुखवादी लोक ते सर्वतोपरी त्याज्य आहेत.

' चार्वाकांचीं मतें '

न स्वर्गो नापवर्गो वा नैवात्मा पारलोकिकः ।
नैव वर्णाश्रमादीनां क्रियश्च फलदायिकाः ॥
अग्निहोत्रं त्रयो वेदास्त्रिदण्डं भस्मगुण्ठनम् ।
बुद्धिपौरुषहीनानां जीविका धातृनिर्मिता ॥
पशुश्चेन्निहितः स्वर्गे ज्योतिष्टोमे गमिष्यति ।
स्वपिता यजमानेन तत्र कस्मान्न हिंस्यते ॥
मृतानामपि जन्तूनां श्राद्धं चेत् तृप्तिकारणम् ।
गच्छतामिह जन्तूनां व्यर्थं पाथेयकल्पनम् ॥
स्वर्गस्थिता यदा तृप्तिं गच्छेयुस्तत्र दानतः ।
प्रासादस्योपरिस्थानामन्नं कस्मान्न दीयते ॥
यावज्जीवेत् सुखंजीवेदृणं कृत्वा घृतं पिबेत् ।
भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ॥
यदि गच्छेत् परं लोकं देहादेशविनिर्गतः ।
कस्माद्भूयो न चायाति बन्धुस्नेहसमाकुलः ॥
ततश्च जीवनोपायो ब्राह्मणैर्विहितस्त्विह ।
मृतानामेतकार्याणि नत्वन्यद्विद्यते क्वचित् ॥
त्रयोवेदस्य कर्तारो भांडधूर्तनिशाचराः ।
जर्फरीतुर्फरीत्यादि पंडितानां वचः स्मृतम् ॥

**अश्वस्यात्रहिशिश्नं तु पत्नीग्राह्यं प्रकीर्तितम् ॥**
**भण्डैस्तद्वत्परश्चैव ग्राह्यं जातं प्रकीर्तितम् ॥**
**मांसानां स्वादनं तद्वन्निशाचरसमीरितमित्यादि ॥**

**अर्थः-** स्वर्ग नाही, मोक्ष नाही, अथवा जेथे पुन. जीव जन्मास येतो असा परलोकहि नाहीं. अथवा ज्याच्यापासून खरीखरी फलप्राप्ति होते असे चातुर्वर्ण ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, व शूद्र ) व आश्रम, ( ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ, व संन्यास ) हेहि नाहींत. अग्निहोत्र, तीन वेद ( ऋक्, यजु, और साम ), तीन दड व शरीराला भस्म लावणें इत्यादि ज्या लोकांमध्यें बुद्धिहि नाही व पौरुषेयहि नाही, अशाच्या उपजीविकेकरिता निर्माण केलेले आहेत. ज्या पशूचा ज्योतिष्टोमयज्ञांमध्ये वध केला जातो तो पशू स्वय स्वर्गाला जातो ही गोष्ट जर सत्य मानली तर याज्ञिक ( यज्ञ करणारा माणूस ) आपल्या बापाला का बलि देत नाही? कारण त्या योगाने त्याचा पिताहि स्वर्गाला जाईल. मृत झालेल्या माणसाची तृप्ति श्राद्धाने होते असें जर ग्रहित धरिलें तर इहलोकीहि पाथस्थ प्रवासाला निघाला असतांना त्याची प्रवासामधील भोजनाची तरतूद करणे हेहि अनवश्यकच आहे. श्राद्ध केल्याने स्वर्गातील पितरांची तृप्ति होते असे जर मानले तर माडीवर बसलेल्या माणसाला खाली नच अन्न कां देत नाही? ह्मणून ह्या कुडीमध्ये प्राण आहे तोंपर्यंत खुशाल चैनीने रहा, व ऋण काढूनहि सण करा. एक वेळा शरीर भस्मसात् झाल्यानतर पुनः ते कसें मिळू शकेल? देहापासून निघून जीव परलोकांत जातो ही गोष्ट खरी आहे असे धरले तर तो आपल्या आताच्या प्रेमामुळे व्याकुळ होऊन पुन. इहलोकी परत का येत नाही? ह्यावरून मृत माणसांच्या नांवाने जे हे सर्व विधि करतात ते सर्व फक्त ब्राह्मणांनीं आपल्या उपजीविकेचे साधन ह्मणून सुरुवात केले आहेत. ह्याशिवाय ह्यापासून कोणतीहि फलप्राप्ति नाहीं. ह्यावरून तिन्ही वेदाचे कर्ते हे ठग, दांभिक, व राक्षस होते. व जर्फरी, तुर्फरी, इत्यादि प्रतिष्ठित

पडिताच्या कुलामध्ये होऊन गेले व अश्वमेध यज्ञाच्या वेळीं राज्ञीला जे कांहीं अमगळ व अश्लील विधि करण्यास सांगितले आहेत ते सर्व विधि दांभिक उपाध्यायांनी निरनिराळ्या वेळीं वेगळी वेगळी दक्षिणा मिळावी ह्मणून शोधून काढल्या आहेत. व त्याचप्रमाणें मांसाशन करण्याची परवानगी निशाचरांनीं ( राक्षसानी ) दिली आहे.

( सर्वदर्शन संग्रह पान १०-११.
कॉवेल आणि गौप कलकत्ता आवृति. )

सुखाभिलाषेकरितां वेदाची निर्भत्सना करणारे हे खल चार्वाक होत. चार्वाकलोक कोणत्या मताचे होते हें वरील उताऱ्यावरून वाचकांच्या चांगले ध्यानांत येईल. डॉक्टर **राजेंद्र**लाल मित्र यानी योगसूत्रावर एक पुस्तक लिहिले आहे. त्याच्या प्रस्तावनेत ( पान १० )

---

१ यज्ञाबद्दल हिंदुधर्मशास्त्रात असे लिहिले आहे:—

**यस्तु प्राणिवधं कृत्वा मांसैस्तर्पयते पितॄन् ।**
**स विद्वांश्चन्दनं दग्ध्वा कुर्यादङ्गारविक्रयम् ॥**
**क्षिप्ता कूपे यथा कंचिद्बालआदातुमिच्छति ।**
**पतत्यज्ञानतः सोऽपि मांसेन श्राद्धकृत्तथा ॥**

---- ( बृहत् पराशरस्मृति )

प्राणीवध करून जो मासानी पितर तृप्त करतो तो शहाणा चदन जाळून कोळशाचा व्यापार करण्यास तयार झाला आहे असे समजावे.

कूपामध्ये कांहीं पदार्थ टाकल्यावर तो घेण्याकरिता हात लांब करून डोकावणारा बालक जसा कूपातच पडतो तसाच मासाने श्राद्ध करणारा पातकात पडतो असे समजावें.

**न दद्यादामिषं श्राद्धे न चाद्याद्धर्मतत्त्ववित् ।**
**मुन्यन्नैःस्यात्परा प्रीति र्यथा न पशुहिंसया ॥**

— ( भागवत. )

श्राद्धामध्यें धर्मतत्वज्ञानें मासदान अथवा मास सेवन करू नये. मुनींच्या अन्नांनीं जशी पितरांची उत्कृष्ट तृप्ति होते तशी पशुहिंसेने तृप्ति होत नाहीं.

यावरून बृहत्पराशरस्मृति व भागवतामध्यें जो यज्ञांतील हिंसेचा निषेध केला आहे तो सर्वांनीं ध्यानात ठेवण्यासारखा आहे.

ह्मटलें आहे, ' सामवेदामध्यें एका यतीनें यज्ञाची निंदा केली असून आपली संपत्ति भृगूला देऊन टाकिली. ' ' ऐतरेय ब्राह्मण ' नामक पुस्तकांत असे लिहिलें आहे की, अशा प्रकारच्या काही यतींना कोल्ह्या-पुढें फेंकून देण्याची शिक्षा करीत असत. ऋग्वेदांतील अष्टक ३, अध्याय ३ वर्ग २१ ऋचा १४ मध्ये कीकट अथवा मगधदेशामध्यें राहणाऱ्या व यज्ञ, ज्ञान, इत्यादिकांची निर्भत्सना करणाऱ्या लोकांचें वर्णन केले आहे.

शिवाय पुरातन भरतवर्षांतील आपले सर्व पूर्वज हे बादराय-णांच्या ( व्यास मुनीच्या ) तत्त्वज्ञानाचे अनुयायी काही नव्हते. तसेंच सर्वांची ब्रह्मावरहि श्रद्धा नसे. त्यापैकी पुष्कळसे लोक कपिलाप्रमाणे–

" ईश्वरासिद्धेः "

—( सांख्य दर्शन अ. १ सूत्र ९३. )

**अर्थः**– ईश्वराचें अस्तित्व सिद्ध झाले नाही असेहि ह्मणत असत.

ऋग्वेद मंडल ८ अध्याय १० सूत्र ८९ व ऋचा ३ रीमध्ये भार्गवऋषी असे ह्मणतात की, ' इंद्र ह्मणून कोणी नाही, व त्याला कोणी पाहिलेहि नाही. जर इंद्रच नाही तर आह्मी कोणाची ह्मणून स्तुति करावयाची ? इंद्र ह्मणून कोणी आहे असे जे लोकाचे ह्मणणे आहे ते व्यर्थ आहे. वस्तुत: इंद्र मुळीच नाही. ऋचा ४ थी मध्ये इंद्र हा आपले अस्तित्व सिद्ध करण्याचा प्रयत्न करितो. आणि पुढें असे ह्मणतो कीं, मी आपल्या शत्रूचा नाश करीत आहे.

मण्डल २ अध्याय ९ सूक्त १२ ऋचा ५ वीमध्ये गृत्समद-ऋषी असे लिहितात कीं, इंद्र नाही असे ह्मणणारेहि कांहीं लोक आहेत. परंतु वस्तुत: इंद्र आहे.

प्राचीन भरतखंडामध्यें पुनर्जन्म आहे, ह्यावर जैनाप्रमाणें विश्वास ठेवणारेहि कांहीं लोक होते. परंतु दुसऱ्या काहीजणांचा पुनर्जन्मावर विश्वासहि नसे. ब्राह्मणांच्या ग्रंथांमध्ये खरोखर पुनर्जन्म आहे किंवा

नाहीं याविषयीं कित्येक ठिकाणी चर्चा केली आहे असें बार्थ ( Barth ) साहेबहि लिहितात.---

ऋग्वेद अष्टक ६, अध्याय ६, वर्ग ३२, ऋचा १० वीमध्यें अर्हदशवेकनाट अर्थात् फाजील व्याजाने पैसे उपटणारे लोक यांचे वर्णन केले आहे. त्यांमध्ये त्याच्यासबधाने असे लिहिले आहे कीं, त्याना ह्या जन्मीं सूर्याचे दर्शन होईल. परतु दुसऱ्या जन्मीं घनघोर अधकार आहे अशा लोकी जातील.

आह्मी ज्याअर्थी परलोक पाहिला नाही त्याअर्थी परलोकच नाहीं असे मानणारे लोक खरोखर नास्तिक होत. पाणिनीहि असेच ह्मणतो.

**परलोको नास्तीति मतिर्यस्यास्तीति ‘ नास्तिकः ’**

परतु जैनलोक परलोकाला मानतात. ह्यावरून ते नास्तिक नव्हेत.

## जैनशास्त्रांतील प्राचीन भारतवर्ष.

जैनशास्त्रामध्ये प्राचीन भरतखडाच्या खऱ्या खऱ्या स्थितीचे वर्णन केले आहे जैनशास्त्रामध्ये असे ह्मटलें आहे कीं, ज्यावेळीं दिगबररूपी ऋषभ हे सर्व पृथ्वीवर “ अहिंसा परमोधर्म. ” ह्मणजे कोणत्याहि प्राण्याचा वध करू नये हाच सर्वोत्कृष्ट धर्म आहे ह्मणून उपदेश करीत होते, व तसेच आपल्या निरक्षर वाणीनी मानवजात, देव, व पशु इत्यादिकावर उपकार करीत होते, त्यावेळीं ३६३ पाखडीधर्माचे उपदेशकहि होते. व ते आपापल्या धर्माचा उपदेश करीत होते. व त्यापैकी चार्वाकधर्माचा सस्थापक शुक्र अथवा बृहस्पति हा एक होता. वस्तुत: पुरातन भरतखडाची हीच खरी खरी वस्तुस्थिति असली पाहिजे यात सशय नाही.

प्राचीनकाळी तिसऱ्या युगाच्या शेवटपर्यंत एका मताचा एकच फक्त उपदेशक होता असे नाहीं. परतु असे ३६३ अथवा त्यांपेक्षांहि जास्तच उपदेशक होते. व ते आपापल्या निरनिराळ्या सिद्धांतांचा उपदेश करीत असत; व आपापल्या समजुतीप्रमाणे हे जग व हा जन्म ह्या सबधाचे कोडें उलगडीत असत.

## प्रो. मोक्षमुल्लर साहेबांचें मत.

प्राचीन भरतखंडासंबधानें जे मत वर प्रतिपादन केलें आहे तेच मत प्रो. मोक्षमुल्लर साहेब व प्रायः बहुतेक सर्व विद्वानांचें आहे. सन १८९९ साली ह्मणजे मोक्षमुल्लर साहेबाच्या ७६ व्या वर्षी त्यानीं षट्दर्शन नामक ( Maxmullers six systems of philosophy. ) ग्रंथ लिहिला आहे. हा ग्रंथ लिहित असताना त्याची नेत्र-ज्योति अतिशय मंद झाली होती; व स्मरणशक्तिहि तारुण्यांत जशी तरतरीत असते तशी नव्हती. ते आपल्या ग्रंथांत ह्मणतात:—

" काहीं शब्दांचे मुळापासूनच अनेक अर्थ असतात. उदाहरणार्थ; प्रजापति, ब्रह्म, अथवा आत्मा. हे शब्द बहुर्थी आहेत. ह्या शब्दाचे अनेक अर्थ झाले आहेत किंवा केले आहेत; ह्यामध्ये कालांतराने अर्थाची सारखी प्रगति झाली आहे असे मानणे चुकीचे होईल. ब्राह्मणग्रंथांवरून अथवा उपनिषदांवरून जी काही माहिती आह्माला भरतखंडांमधील विद्या ( बौद्धिक सामर्थ्य ) व विद्वान ह्याच्यासंबंधाने उपलब्ध झाली आहे त्यावरून आह्मांला असे वाटते कीं, ह्या देशामध्ये विचारसाम्राज्याची ( विद्येचीं ) अनेक केंद्रस्थाने पसरलेलीं असावीत. आणि त्या ठिकाणी कोणत्याना कोणत्या मताचे विद्वान असे पुरस्कर्ते आढळून येत असत. "

" षट्दर्शना ( six systems of Philosophy ) मधील जे नियम अथवा जी सूत्रे ( ही सूत्रे एकमेकापासून भिन्न आहेत. ) आहेत त्यावरून असें स्पष्ट व्यक्त होते की, ही सूत्रे हल्ली ज्या स्वरूपात सगतवार व पद्धतशीर दिसतात, ती संगति अथवा ती पद्धत त्यांना एकदम प्राप्त झाली नाहीं; किंवा असें सगतवार स्वरूप देण्याचा यत्न असणेहि शक्य नाही. कारण हीं सूत्रे ह्मणजे, पुष्कळ विद्वान परंपरेच्या गृहस्थांच्या मतांची कालांतरानें जशी जशी प्रगति होत गेली तशी तशी ती तीं सर्व मते संकलित केलेले हे ' अंतिम संग्रह ' होत. "

" उपनिषद् व वेदऋचेचा ( मत्रांचा ) काळ, किंवा बौद्धांचें त्रिपताकामधील सविस्तर वर्णन, अथवा ग्रीकलोकांच्या स्वारीचा पुरावा, अथवा महाभारतामधील वर्णन या काळापासून तों थेट राजा हर्ष व बौद्ध यात्रेकरू याच्या काळापर्यंत ह्मणजे जोपर्यंत भरतखडामधील विचारसाम्राज्याच्या इतिहासाचा पत्ता लागतो तोपर्यंत आह्माला प्रत्येक ठिकाणीं हिंदु समाजाचें एकच अर्थात् सारखें चित्र दिसून येते. अर्थात् ज्या समाजामध्ये आध्यात्मिक ज्ञानाची पूर्ण आस्था, व आधिभौतिक ज्ञानासबधाने अनास्था आढळून येते असाच समाज आमच्या दृष्टोत्पत्तीस येतो. सारांश हा समाज ह्मणजे आत्मानात्म विचारवताची भूमि व तत्ववेत्याचे राष्ट्र होय. "

" भरतखडामधील विचारी विद्वानानीं जरी नाना प्रकारचे तात्विक सिद्धांत प्रतिपादन केले आहेत तरी देखील त्या सर्व सिद्धातामध्यें षट्दर्शनामधील तत्वाचे महत्व कायम आहे. "

" कित्येक ठिकाणी काही सूत्रे घेऊन पूर्वपक्ष व उत्तरपक्ष केला आहे व त्यावरून दुसऱ्या काही सूत्रांचे खण्डन केले आहे असें आढळून येते. या गोष्टीवरूनहि त्या वेळीं सुद्धा ह्मणजे अतिमसग्रह रचण्याच्या पूर्वीहि नानाप्रकारच्या दर्शनाचे साहचर्य एकसमयावच्छेदेंकरून होते ही गोष्टच सिद्ध होते. "

" यद्यपि उपनिषदांमध्ये व ब्राह्मणाच्या इतर ग्रथांमध्ये सर्वत्र ठिकाणीं एकाच विषयाचे एकच प्रकारचे वर्णन आहे तरी देखील त्यांमध्ये भिन्न भिन्न सप्रदायांच्या आचार्यांनी प्रतिपादिलेले असें मतवैचित्र्य, व एकाच क्षुण्ण मार्गानें न जाता निरनिराळ्या दृष्टीने विचार केलेला आढळून येतो. ऋचेमध्येहि स्वतत्र रीतीने विचार केला असल्यामुळे विचारवैचित्र्य दृष्टोत्पत्तीस येतें. या त्यांच्या व्यक्तिविषयक विचार भराऱ्यामध्यें केव्हा केव्हा ते इतके वाहात जातात कीं, हे नास्तिक अथवा शून्यवाद्यांचेच मण्डन करितात की काय असा सशय उत्पन्न होण्यास जागा राहते. भरतखडामधील षट्दर्शनाच्या ऐतिहासिक उत्प-

त्तीची व प्रगतीची खरी खरी कल्पना यावी अशी जर आपली इच्छा असेल तर या सर्व गोष्टी आपण ध्यानांत ठेविल्या पाहिजेत."

"वेदकालीं सुद्धा नास्तिकमताचे बीं होते यासबधाचे काहीं मजेदार मासले मी वेदऋचेवरून काहीं वर्षापूर्वी दाखविलेंच आहेत. अर्थात् त्या काळींहि चार्वाकमतासारखीं कांहीं नास्तिक मतें प्रचलित होती हे आपल्या ध्यानांत आलेच असेल. बृहस्पतीच्या अनुयायाच्या कांही काही मतावरून असे दिसून येते की, त्या मताबरोबरच दुसऱ्याहि काही भिन्न सप्रदायांचीं मते ( तत्वज्ञान–दर्शन ) अस्तित्वांत होतीं."

"बार्हस्पत्य ( बृहस्पती अथवा चार्वाक याचे अनुयायी ) आपापसात ह्मणतात 'ज्याप्रमाणे इतर सप्रदाय आमच्याहून भिन्न आहेत त्याप्रमाणे आह्मीहि तुह्मापासून भिन्न आहोत.' वैदिक ( कौत्स्य ) धर्माच्या विरुद्ध अशा काहीं गोष्टी आपणाला ऋचेमध्ये, ब्राह्मणग्रथांमध्ये किंवा सूत्रांमध्ये आढळतात. आणि त्याकडे दुर्लक्ष केल्याने प्राचीन भरतखडांमधील धार्मिक व तात्विक युद्धांचे व युद्धभूमींचे निव्वळ चुकीचे ज्ञान होईल."

वयाच्या ७६ व्या वर्षीं प्रो. मोक्षमुल्लर साहेबाचे मत अशा तऱ्हेचे होते. स्थलसकोचास्तव या विषयाचे सविस्तर विवेचन येथें करणे शक्य नाहीं. परतु प्राचीन कालच्या भरतखडासबधाने लोकांचे फारच चुकीचे ग्रह झाले होते हे आपणाला मी जे काही थोडेसे मॅक्समुल्लर साहेबांचे उतारे देऊन सांगितलें आहे त्यावरून दिसून येईल. प्राचीन भरतभूमीमध्यें एकच धर्म अथवा एकच तत्वज्ञान ( Philosophy ) प्रचलित नव्हते. परतु अनेक मतें अथवा अनेक प्रकारचे तत्वज्ञान प्रचलित होते ही गोष्ट यावरून स्पष्टपणे सिद्ध होते. त्यांची सख्या जवळ जवळ ३६३ तीनशें त्रेसष्ट अथवा त्यांहूनहि जास्तच होती असे ह्मटले तरी चालेल, बरोबर अशी सख्या कोणालाहि सागता येणे शक्य नाही. तेव्हां अशी स्थिति असताना जैनधर्म ही ब्राह्मणधर्माची

शाखा आहे असे कसें ह्मणतां येईल? अथवा जैनांनीं कपिल, कणाद, पतजलि गौतम, अथवा दुसरे कोणी माहात्मे यांची नक्कल केली असे ह्मणणें कसे वाजवी व सयुक्तिक होईल?

## पुरातन भरतखंडामध्यें नक्कल नव्हती.

पुरातन भरतभूमीमधील एकाच वायुमडलापासून सर्व धर्म निघाले ही गोष्ट अशक्य आहे काय? पुरातनकाळी वेदांती, साख्य, जैन अथवा चार्वाक व असेच दुसरे काही जे पथ होते व जरी ह्या पथांपैकीं पुष्कळसे पथ हल्ली कायमचे नामशेष झाले आहेत तरी प्राचीन काळीं त्या सर्व धर्मांचे पुरस्कर्ते होऊन गेले असावेत ही गोष्ट सभवनीय नाही काय? नक्कल केली असावी ही कल्पना फारच चमत्कारिक आहे. जे गृहस्थ जैनानी इतर धर्मांची नक्कल केली असे ह्मणतात त्यानीं केव्हां कोणाची व कशी नक्कल केली ह्या गोष्टी सिद्ध करून दाखवाव्यात. त्यांनीं नुसतीं चुकीची अनुमाने काढून लोकाचे गैरसमज करू नयेत. पुरातन भरतखडामध्ये नक्कल नव्हती. पुनः ह्याच गोष्टीचे पुष्टीकरण विद्वान प्रोफेसर मोक्षमुल्लर साहेबानी केले आहे. ते ह्मणतातः-

## मोक्षमुल्लर साहेबांचें मत.

प्राचीन भरतखडामध्ये तत्वज्ञानासबधीचे विचाराची सार्वत्रिक, अत्यत उन्नत्तिपर व प्रगतिकारक अशी वाढ झाली होती ह्मणून जे आह्मी लिहिले आहे ते जर खरे असेल तर एकमेकाची एकमेकानीं नक्कल केली ही जी पाश्चात्याची अत्यत स्वाभाविक अशी कल्पना ती सर्वस्वी अनुचित अथवा चुकीचीच असली पाहिजे. सत्यान्वेषणाकरिता अनुमानांचा एक प्रचड समूह वातावरणामध्ये सचार करीत होता. व त्याला रोकणारी अर्थात् वशीभूत करणारी अशी शक्ति अस्तित्वांत नव्हती इतकेंच नव्हे परतु आह्माला जितके माहीत आहे त्यावरून आह्मी असे सांगू शकतो की, त्यामध्ये सुयत्रित अशी व्यवस्था ठेवण्याला अवश्यक असे जे प्रबळ व जोरदार लोकमत त्याचाहि तेव्हां पूर्ण अभाव होता व ह्यामुळेच बुद्धाने कपिलाची नक्कल केली अथवा

कपिलानें बुद्धाची नक्कल केली ह्यासबधाने मत देण्याचा आम्हांला मुळीच अधिकार पोहोंचत नाही. हिंदूनीं जहाजे बाधण्याची कल्पना फिनिशियन ( Phinicians ) लोकांपासून चोरून घेतली, अथवा स्तुपें ( बौद्ध लोकाचें पवित्र असे स्मारक असून ह्यावर एकाद्या प्रसिद्ध ठिकाणाचें वर्णन असतें ) बांधण्याची युक्ति इजिप्शियन ( Egyptions ) अथवा मिश्र देशच्या लोकांपासून ते शिकले असें ह्मणण्यास कोणीहि शहाणा धजणार नाहीं. ग्रीस, रोम, अथवा **अर्वाचीन** यूरोप वगैरे खडामध्ये जसे आपणास अनुभव येतात त्याहून हिंदुस्थान ही एक वेगळी अजब अशी सृष्टी आहे ही गोष्ट आपण हिदुस्थानासबधाने लिहिताना ध्यानांत ठेवावी. अर्थात् तिकडे ज्याप्रमाणें आपण अनु-माने काढतो तशीं इकडे अनुमाने काढणें धाष्टर्याचें आहे. आणि ह्याचमुळें एका धर्माची दुसऱ्या धर्मासारखींच काही तत्वें आहेत, अथवा बौद्धधर्मांतील व कपिलाच्या सांख्य दर्शनामधील मतें बुद्धाशीं जुळतात एवढ्याच वरून पहिल्याने दुसऱ्या धर्माची नक्कल केली, अथवा दुसऱ्या काहीच्या मताप्रमाणें दुसऱ्याने पहिल्याची नक्कल केली असे उतावीळपणाने व अविचाराने एकदम आपले मत देणे हे केव्हाहि अनुचितच होय. ”

“ भरतखडामध्ये प्राचीन काळीं तात्विक विचारसरणीचा एक सर्वसाधारण भला मोठा निधि ( Fund ) असावा ही गोष्ट आह्मी निश्चयाने सांगू शकतों. व ह्या तत्वज्ञानाचा निधि एखाद्या भाषेप्रमाणे कोणा एका विशिष्ट पथाच्या मालकीचा नव्हता. परतु ह्या निधीचा उपयोग हवेप्रमाणें कोणाहि विचारी माणसाला करण्याची सदर परवानगी होती. आणि ह्मणून ह्यासबधाने आह्मी इतकेच सागतो कीं, भरतखडामधील बहुतेक सर्व तत्वज्ञानासबधानें सामान्यपणे अनेक कल्पना आहेत. व ह्या तात्विक कल्पनांचा अगिकार सर्व तत्ववेत्ते लोक करितात. परतु त्या तात्विक कल्पना वस्तुतः कोणाहि एका विशिष्ट दर्शनानुषगीच्या मालकीच्या नव्हत. ” “ दुःखाचा

६

नाश, दुःखाची उत्पत्ति व स्वभाव ह्यासबधाचे अर्तज्ञान झाल्यानेच होतो अशी खात्री झाली तरी देखील ह्याशिवाय दुसरे अनेक विचार आहेत. व हिंदुस्थानातील प्रत्येक विचारी माणसाकरितां विचारसाम्राज्याचा बहुमूल्य निधि जेंथपर्यंत खुला आहे तेथपर्यंत त्यांचा (विचारांचा) पत्ता लाविला पाहिजे. खरोखर ह्या सर्व सामान्य विचारांनीं भिन्न भिन्न सप्रदायामधील तत्वाचा वेष धारण केला आहे. आपण त्यामुळे फसून जाऊ नये. कारण थोडासा विचार केला असतांना आह्मांला ह्याचे प्रधान कारण कळण्यासारखे आहे." "आणि जसजसे मी भिन्न भिन्न दर्शनाचें अधिक अधिक परिशीलन केलें, तसतसे विज्ञानभिक्षु व इतर विद्वानांच्या मताची सत्यता मला अधिक अधिक वाटू लागली. ते ह्मणत असत की, षट्दर्शनांमध्ये भेद होण्याच्या पूर्वकाळीच राष्ट्रीय व लौकिक तत्वज्ञान ज्याला ह्मणतात अशा तत्वज्ञानाचा सार्वजनिक असा एक निधि होता. दूरवर अशा उत्तर दिशेला फार प्राचीन काळी तात्विक विचारनिधीचे व भाषेचे एक टोलेजग मानसरोवर होते. व ह्या सरोवरामधून प्रत्येक विचारी पुरुषाला आपापल्या मता करितां विचाररूपी जल ग्रहण करण्याची सदर परवानगी होती."

प्रोफेसर मोक्षमुल्लर साहेबानी आपल्या वयाच्या शहात्तराव्या वर्षी ह्याप्रमाणे लिहिले आहे. ह्या विद्वान प्रोफेसराला जैनमताचें परिशीलन करण्यास अवसर मिळाला नाही ही मोठी खेदाची गोष्ट होय! त्यांनी आपले सर्व आयुष्य वैदिक व बौद्ध वाङ्मय प्रगट करण्यांतच खर्च केले. व त्यामुळे त्यांना आमच्या जैनधर्माकडे पाहण्याला वेळ मिळाला नाही! निर्ग्रंथ नातपुत्तापासून जैनधर्माची उत्पत्ति झाली असे जें काही त्यानी ह्मटलें आहे त्याचे कारण माझ्या मताप्रमाणे त्यांना तें मत ग्रहण करण्यामध्ये विशेष सुरक्षितता वाटली असावी. जैनधर्माच्या प्राचीनतेचे परिशीलन करून त्यांचे ते मत झाले नसलें पाहिजे. असो. आपण आतां आपल्या मुख्य विषयाकडे वळू या.

प्राचीन भरतखंडामध्यें कोणत्याहि प्रकारची नक्कल नव्हती एवढेंच मला येथे दाखवावयाचें होते. अनेक ऋषींनीं जीवासंबधीं निरनिराळीं मते प्रतिपादन केलीं होतीं. आणि आतां जीं आपणांला दर्शनें ( Philosophies ) दिसत आहेत त्यांमध्ये त्या ऋषींच्या मतांचा संग्रह केलेला आढळून येतो. हिंदुधर्म व ब्राह्मणधर्म हीं नांवे मिथ्या अर्थात् अननुरूप आहेत

हिंदुधर्म व ब्राह्मणधर्म ह्या शब्दांचा व्यवहारांत सर्वसाधारण वैदिकधर्म ह्या अर्थाने उपयोग केला जातो. तो अर्थ चुकीचा आहे असे मला वाटते. हिंदुधर्म ह्मणजे काय? हिंदूचा जो धर्म तो हिंदुधर्म. परतु हिंदू तरी कोणाला ह्मणावे? सिंधू नदीच्या काठी जे आर्यलोक राहत होते ते हिंदू होत असे ह्मणतात. परतु हे सर्व आर्य वैदिकधर्माचेच अनुयायी होते काय? हे सर्व आर्य यज्ञ करणाऱ्यांपैकींच होते काय? त्या आर्यांमध्ये यज्ञाचा निषेध करणाऱ्यापैकी कोणी नव्हते असें आपले ह्मणणे आहे काय? त्या आर्यांमध्ये जैन, चार्वाक व असे दुसरे अनेक संप्रदाय आहेत कीं, ज्याचा हल्ली मागमूसहि नाहीं अशाचे पूर्वज नव्हते काय? आणि या दृष्टीनें पाहता आह्मी सर्व हिंदू नव्हेत काय? तर मग फक्त वैदिक धर्मानुयायाना अथव यज्ञ करणाऱ्यानाच हिंदू ह्मणणे योग्य नाहीं. पुनः ब्राह्मणधर्म ह्मणजे काय? ब्राह्मणाचा जो धर्म तो ब्राह्मणधर्म. पण ब्राह्मणांचा धर्म ह्मणजे तरी काय? ब्राह्मणांनीं स्थापिलेला धर्म अथवा त्यानीं चालविलेला जो धर्म तो ब्राह्मणधर्म. पहिला अर्थ घेतला असता ब्राह्मणानीं स्थापिलेला असा धर्मच नाहीं. क्षत्रियहि मोठे उपदेशक होते ही गोष्ट सर्वश्रुत आहे. इतकेच नव्हे, पण काही बाबतींमध्ये ब्राह्मणाहूनहि हे श्रेष्ठ होते. आणि ज्याला फक्त ब्राह्मणधर्म ह्मणतात त्या धर्माची संस्थापना करण्यामध्यें क्षत्रियांनीं कोणती कोणती कामगिरी केली ह्या संबधानें तरी कोणाला सांगतां येण्यासारखें आहे? श्रीकृष्णाच्या उपदेशावरून व रामचद्राच्या उदाहरणावरून ससारांतील प्रत्येक मनुष्याला

आपल्या जीवनक्रमामध्यें बरेचसे समाधान मानून घेतां येण्यासारखे आहे. तेव्हा रामचंद्र व श्रीकृष्ण यांच्या सारख्या क्षत्रियानीं प्राचीन भरतखंडात ज्याला हल्लीं फक्त ब्राह्मणधर्म ह्मणतात तो धर्म स्थापण्यामध्ये काय काय भाग घेतला हे तरी सांगणें शक्य आहे काय? ब्राह्मणानीं चालविलेला तो ' ब्राह्मणधर्म ' असे जर तुह्मी ह्मणत असाल तर त्याअर्थी तुह्माला ' वैदिकधर्म ' असें ह्मणतां येणार नाहीं. कारण वैदिकधर्म ह्मणजे फक्त ब्राह्मणाचाच धर्म नव्हे; तर तो द्विजांचा— ह्मणजे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्यांचा होय. ब्रह्म जाणतो तो ' ब्राह्मणधर्म ' असा जर आपण अर्थ घेतला तर आपणाला हिंदू दर्शनाचे जे दुसरे अनेक संप्रदाय आहेत उदाहरणार्थ, सांख्य व पूर्वमीमांसा ( हे ब्रह्म जाणत नाहींत. ) त्यांना ही संज्ञा आपणाला कशी देता येईल? ह्मणून मला असे वाटतें की, ' वैदिकधर्म ' ' याज्ञिकाचा धर्म ' व ' हिंदूदर्शन ' ह्याअर्थी ' ब्राह्मणधर्म ' व ' हिंदुधर्म ' असे शब्द योजीत असाल तर तें निव्वळ चुकीचें होईल. प्राचीन काळीं ब्राह्मणधर्म अथवा हिंदुधर्म हे नव्हते. परंतु खरोखर वैदिकधर्म मात्र प्रचलित होता. आणि त्या वैदिक धर्मापासून जैनधर्माची उत्पत्ति खास झाली नाहीं.

**" जैनधर्माचे संस्थापक पार्श्वनाथ नव्हेत तर ऋषभदेव हे होत "**

आता आपण जैनधर्माचे उत्पादक पार्श्वनाथ होते कीं काय याचाहि पण निर्णय करू. बौद्ध, जैन व हिंदू यांच्या धर्मग्रंथामध्ये जैनधर्माचे संस्थापक पार्श्वनाथ होत असें कोठे लिहिलेले आहे कीं काय हें आपण पाहू.

## बौद्धग्रंथ.

बौद्धग्रंथांमध्ये या विषयासंबधाने कांही कोठे उल्लेख केलेला नाहीं. आणि ज्याअर्थी बौद्धधर्म हा शेवटचे चोविसावे तीर्थंकर जे महावीरस्वामी यांच्या वेळी अस्तित्वात आला त्याअर्थी त्या ग्रंथानी मुग्धता स्वीकारली हें योग्यच आहे. निर्ग्रंथांचे अग्रणी महावीरस्वामी होते इतकेंच बौद्धग्रंथामध्यें लिहिलेले आढळून येते. त्या ग्रंथामध्ये महावीर हे निर्ग्रंथ-

मताचे संस्थापक ह्मणून लिहिलेले आढळून येत नाहीं. **आर्यविद्या-सुधाकर** ग्रंथात त्याच्याविषयीचा उल्लेख आहे. त्यात देखील महावीरा-विषयीं ' **प्राचारयद्धर्मं** ' ह्मणजे त्याने जैनधर्माचा प्रसार केला असेच ह्मटले आहे. शिवाय डॉ. जेकोबी( Dr Jacobi ) साहेबांनी जी कांहीं माहिती मिळविली आहे त्यावरून असे स्पष्ट दिसते की, बौद्धग्रंथांमध्यें महावीरस्वामी निर्ग्रंथमताचे मुख्य प्रचारक होते एवढेंच लिहिलेले आढळतें.

## जैनशास्त्र.

जैनांच्या धर्मग्रंथांमध्ये असे लिहिलें आहे कीं, जेव्हां ऋषभ-देवानीं संसाराचा त्याग करून दीक्षा घेतली तेव्हा इतर चार हजार राजे त्यांचे अनुयायी बनून दिगम्बर झाले. परंतु त्यांना तें असिधाराव्रतासारखे कठीण चारित्र पाळणें जड वाटू लागले. ह्मणून त्यापैकीं तीनशे त्रेसष्टानीं पाखंडी ( खोटे ) धर्म स्थापिले ह्यापैकीं शुक्र अथवा बृहस्पति हे एक होत. हे तिसऱ्या काळाच्या शेवटी घडले. ह्मणून जैनशास्त्रानुसार **ऋषभदेव** हे जैनधर्माचे पहिले उपदेशक ( संस्थापक ) होत. तीनशेत्रेसष्ट राजे आपल्या चारित्र्यापासून भ्रष्ट झाले व त्यानी तीनशेंत्रेसष्ट असे पाखण्डीधर्म स्थापिले ही गोष्ट वर सागण्यांत आलेंच आहे. ह्या गोष्टीवरून फार प्राचीन काळी पुरातन भरतवर्षामधील ज्ञान कोणत्या अवस्थेमध्ये होते ह्याची चागली कल्पना येईल. त्यावेळी भरतभूमीमध्ये चोहीकडे ज्ञानाचा प्रचार चागला झाला होता ही गोष्ट निर्विवाद आहे. व सर्व देशभर बौद्धिक व अध्यात्मिक विचाराची अगणित केंद्रस्थानें पसरलेलीं होतीं हेंहि आपणाला वरील गोष्टीवरून स्पष्टपणे दिसून येते.

## हिंदुशास्त्र.

आता ब्राह्मणांच्या धर्मग्रंथांमध्ये वरील गोष्टींचे कोठे पुष्टीकरण केलें आहे की काय ते पाहू. भागवतांतील पांचवा स्कंध अध्याय २ ते ६ मध्ये ऋषभदेवांसंबधाने लिहिलें आहे. त्या पवित्र ग्रंथामध्ये असे ह्मटले

---

१ परिशिष्ट नंबर ८ पहा.

आहे कीं, चौदा मनूपैकी स्वयभू मनु हा पहिला होता. पण जेव्हां ब्रह्मदेवास लोकसख्या आहे तितकीच आहे, वाढली नाहीं असे दिसून आले तेव्हां त्याने स्वयभू मनू व त्याची पत्नी सत्यरूपा यांना निर्माण केले. स्वयभू मुनीला प्रियव्रत नावाचा मुलगा झाला. व प्रियव्रताचा पुत्र अग्नीध्र होय. अग्नीध्राच्या पोटी **नाभीचा** जन्म झाला. **नाभिरायानें मरुदेवीशीं** लग्न केले व त्यापासून **ऋषभदेव** जन्मास आले. व **भागवतामध्यें ह्याच ऋषभाला दिगम्बर व जैनधर्माचा संस्थापक ह्मटलें आहे.**

आतां ऋषभ केव्हा जन्मास आले हे पाहू. सृष्टीच्या प्रारंभीं ब्रह्मदेवाने स्वयभू मनू व सत्यरूपा ह्या दोघांना उत्पन्न केलें. व त्यानतर त्याच्या पाचव्या पिढीमध्ये ऋषभदेवाचा जन्म झाला. ते पहिल्या कृतयुगाच्या ( सत्ययुगाच्या ) शेवटी होऊन गेले. आणि ह्या मन्वतरांत अशी अठ्ठावीस कृतयुगे व्हावयाचीं आहेत. आणि ह्याच ऋषभाने जैनमताचा पहिल्याने उपदेश केला.

भागवतकार हे सहाव्या अध्यायातील श्लोक ९ ते ११ मध्ये अर्हताचे वर्णन असे करितात की, " कोंक, वेंक, व कुटक ( नट ) ह्या देशाचा राजा अर्हत् हा आपल्या प्रजेच्या तोंडून ऋषभाचे चारित्र ऐकून कलियुगामध्ये जैनधर्माची स्थापना करील. ह्या धर्माचे अनुयायी ब्राह्मणाचा द्वेष करतील व नरकामध्ये जातील.

**" यस्य किलानुचरितमाश्रमातीतमुपाकरर्यि ( कर्ण्य ) कोंकवेंककुटकानां राजार्हन्नामोपशिक्ष्यकलावधर्म उत्कृष्यमाणे भवितव्येन विमोहितः स्वधर्मपथमकुतोभयमपहाय कुपथपाखंडसमंजसं निजमनीषया मन्दः संप्रवर्तयिष्यते ॥ ९ ॥ येन हवावकलौ मनुजाप सदादेवमायामोहिताः स्वविधिनियोगशौचचारित्रविहीना देवहेलनान्यपव्रतानिनिजनिजेच्छया गृण्हाना अस्नानां च मनाशौचकेशोलुञ्चनादतिकलिनाऽधर्मबहुले नोपहताधियो ब्रह्मब्राह्मणयज्ञपुरुषलोकविदूषकाः प्रायेण भवि-**

**ष्यंति ॥ १० ॥ ते च ह्ययवक्तिनया निजलोकयात्रयान्धपरंपरयाश्वस्तास्तमस्यन्धे स्वयमेव प्रयतिष्यन्ति ॥ ११ ॥**

**—( पंचमस्कंध अ. ६ )**

**अर्थः—** ऋषभाच्या चारित्राचे वर्णन ऐकून कोंक, वेंक, व कुटकदेशाच्या श्रीअर्हत् नामक राजाने त्याच्यापासून दीक्षा घेतली. व पूर्वकर्मानुसार कलियुगामध्ये जेव्हा पुष्कळ अधर्म माजेल तेव्हा तो ( अर्हत् ) आपल्या धर्माला सोडून स्वबुद्ध्यनुसार सर्वांच्या विरुद्ध अशा पाखंडमताचा उपदेश करील ॥ ९ ॥

कलियुगामध्ये ह्याचा सर्वसाधारण परिणाम असा होईल कीं, बहुतेक निकृष्ट असे पुरुष निपजतील. आणि हे लोक देवमायेमुळे मोहित होऊन कुत्सित व्रतें अर्थात् स्नान, आचमन, शौच न करणे, तसेच केशलुंचन इत्यादि-क्रिया स्वेच्छेनुसार करितील. ह्मणजे ज्याच्या योगाने अधिक अधर्म माजेल अशा गोष्टी ते लोक करूं लागतील. तसेच हे लोक वेद, ब्राह्मण, विष्णु, व संसार इत्यादिकांची निंदा करतील ॥ १० ॥

देहाला प्रमाण न मानणारे हे लोक आपल्या इच्छेनुसार वर्तन केल्यानें व अंधपरंपरेनें विश्वास ठेविल्याने घोर अशा अंधकारात पडतील ॥ ११ ॥

श्रीअर्हत् नांवाचा कोणी राजा झालेला प्रसिद्ध नाही. आणि आह्मी जितकी माहिती मिळविली तींत व तसेच ब्राह्मणाच्या इतर दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथांमध्यें जेथें जेथे ह्मणून ' अर्हत् ' हा शब्द आला आहे, तेथें अर्हत् हा कोंक, वेंक, व कुटकदेशाचा राजा होता असे लिहिलेलें कोठेंहि आढळून येत नाहीं. जर ' अर्हत् ' हा शब्द अर्ह् ह्मणजे स्तुति करणे ह्या धातूपासून बनला असेल तर ह्याचा अर्थ प्रशंसनीय अथवा स्तुत्य असा आहे. व जर अर्हन्त ( अरिहन्त ) असा शब्द असेल तर त्याचा अर्थ शत्रुघ्न ह्मणजे शत्रूंचा संहार करणारा असा होतो. अरिहन्त हा शब्द शिवपुराणामध्यें आला आहे.

**अरिहन्निति तन्नामधेयं पापप्रणाशनम् ।**
**भवद्भिश्चैव कर्तव्यं कार्यं लोकसुखावहम् ॥ २१ ॥**

**अर्थ:**— पापाचा नाश करणारा अरिहन् हे त्याचें नामाभिधान होय. आपणहि असें काम करावे कीं, ज्याच्या योगानें लोकास सुख होईल. अर्हत् नावाचा कोणी राजा होऊन गेला नाहीं. ऋषभ हे स्वतः अर्हत् अथवा अरिहत् होत. कारण ते स्तुतीस पात्र आहेत. व कर्मरूपी शत्रूचा त्यांनीं नाश केला आहे. अर्हत् राजाने कलियुगामध्यें जैनधर्मांचा उपदेश केला असे ग्रहित धरिलें तर वाचस्पतिकोशामध्ये ऋषभदेवाला जिनदेव, व तसेच शब्दार्थचितामणीमध्यें ऋषभाला आदिजिनदेव असे कसे ह्मटले असते? उदाहरणार्थः—

**ऋषभ भगवदवतार भेदे आदिजिने.**

—( **शब्दार्थ चिन्तामणि ४४२ पहा.** )

काहीं उपनिषदांमध्यें ऋषभदेवाला ' अर्हत् ' ह्मटले आहे असें आह्मी काही शास्त्र्यांकडून ऐकिलें आहे. अर्हत् नांवाचा कोणी राजा नव्हता. ऋषभ हे स्वतः अर्हत् होते. परस्परामधील द्वेषामुळेच भागवतकर्त्यांनी अर्हत् हे कलियुगामध्ये ऋषभाच्या चारित्राचे अनुकरण करून जैनधर्मांचा उपदेश करितील असें लिहिले असावे. कदाचित् भागवतकारांना जैनधर्म अतिशय प्राचीन आहे असे ह्मणणे आवडले नसेल. परतु अर्हताने ऋषभाच्या चारित्राचे अनुकरण केले हे त्यांचे ह्मणणें जरी घटकाभर खरे मानले तरीहि जैनधर्मांचा पाया त्याच्याच चारित्रावर उभारला आहे. ह्या अर्थीहि ऋषभानें जैनधर्माची सस्थापना केली हीं गोष्ट सिद्ध होते. ह्याचे पुष्टीकरण करण्याकरिता महाभारताचे सुप्रसिद्ध टीकाकार जे नीलकठ त्यांचाहि पुरावा आमच्याजवळ आहे. महाभारतांतील शातिपर्व, मोक्षधर्म, अध्याय २६३ मधील विसाव्या श्लोकावरील टीकेंत नीलकठ लिहितात कीं, " ऋषभाच्या सच्चारित्राला पाहून अर्हत् अथवा जैन हे मोहित झाले. "

**" ऋषभादीनां महायोगिनामाचारं दृष्ट्वा आर्हतादयो मोहिता पाखंड मार्गमनुगताः "**

हा अध्याय वाचनीय आहे. ह्यामध्ये तुळाधार व जाजली या दोघांचा सवाद आहे. तुळाधाराने अहिंसेचा पक्ष घेतला आहे. व वैदिक यज्ञाच्या हेतूचें वैयर्थ्य दाखवून खण्डन केले आहे. व जाजली यानें यज्ञामध्ये जी जीवहिंसा होते तिचे मण्डन केले आहे.

ह्यावरून ब्राह्मणाच्या व जैनाच्या ग्रथानुसार ऋषभ हे जैन-धर्माचे सस्थापक होते हीच गोष्ट सिद्ध होते. व त्यानींच पहिल्याने जैनधर्माच्या सिद्धांताचा उपदेश केला. व तेच सिद्धात व तीच तत्वे हीं जैनधर्माची आधारस्तभ झाली आहेत. जी काहीं मी माहिती मिळ-विली आहे त्यावरून हिंदूच्या कोणत्याहि धर्मशास्त्रामध्ये पार्श्वनाथाला जैनधर्माचे उत्पादक असे ह्मटले नाही. ह्या विषयावर मला बऱ्याच विद्वान शास्त्र्याबरोबर बोलण्याचा प्रसग आला होता. व त्या शास्त्र्यानी ऋषभ हेच जैनधर्माचे सस्थापक होत असेच मला सागितले.

ऋषभ हेच जैनधर्माचे सस्थापक होत ही गोष्ट जैनाच्या व हिंदूच्या धर्मग्रथावरूनहि सिद्ध होते. तर्‍हां कोलब्रुक, बुहलर व जेकोबी-सारख्या लेखकांनीं आपल्या मनाला वाटतील तशी मते ठोकून देऊन पार्श्वनाथ हेच जैनधर्माचे सस्थापक होत असे लिहिण्याचे धाष्टर्य करावे हे खरोखर आश्चर्य होय. धार्मिक बाबतीमध्ये त्यानीं स्वत.ची अनुमाने न काढतां आमच्या धर्मग्रथावर, व शास्त्रावर श्रद्धान ठेवावे. कारण धर्म ह्मणजे धर्मच होय. तो प्राणिमात्राला आपल्या जीविताहूनहि अतिशय प्रिय असतो. आणि मला असे वाटते की, विद्वानांनी कोणच्याहि धर्माची अवहेलना करून तुच्छ समजू नये. विद्वानांचा शब्द ह्मणजे कायदा. त्यांचीं मते ह्मणजे प्रमाण. अशी *स्थिती असल्यामुळें त्यांनीं धार्मिक विषयावरील आपलीं मतें उतावळे-*पणाने एकदम प्रतिपादन करू नयेत. त्यांनीं दुसऱ्यांच्या धर्मग्रथांचे

व शास्त्राचें चागले मनन करावे व तसेच दुसऱ्यांच्या मनोवृत्ति विनाकारण दुखविल्या जाणार नाहीत ह्याबद्दल खबरदारी बाळगावी.

## मथुरेमधील शिलालेख.

येथे हीहि गोष्ट आपण ध्यानात ठेवावी की, ‘ ऋषभ हे जैनधर्मांचे सस्थापक होत. ’ असे जें आह्मी ह्मणतो त्याला फक्त जैन व हिंदु शास्त्राचाच आधार आहे असे नाही तर ह्याहिपेक्षां एक मोठा महत्वाचा जबरदस्त पुरावा आहे. व तो पुरावा ह्मणजे डॉक्टर फुहरर ( Dr Fuhrer ) साहेबानी मथुरेला लाविलेला शोध होय. आमच्यावरील मुद्याचे पुष्टीकरण त्यानी शोध लाविलेल्या शिलालेखावरून चागले होते. हा शिलालेख जवळ जवळ दोन हजार वर्षांचा जुना आहे. प्रोफेसर बुहलर यानीं ‘ एपिग्रेफिया इडिया ’ ( Epigraphia India ) ह्या नावाचे एक पुस्तक प्रसिद्ध केले आहे. व ह्या पुस्तकामधील पहिल्या व दुसऱ्या प्रकरणामध्यें जैनांचें पुष्कळसे शिलालेख प्रसिद्ध केले आहेत. हे लेख दोन हजार वर्षांचे प्राचीन आहेत, व त्यांवर इडो-सिथियन ( Indo-Scythian ) राजे कनिष्क, हुवष्क, व वसुदेव ह्यांचे सवत आहेत. ह्या शिलालेखांवरून असें कळतें कीं, गृहस्थी जैनी हे ऋषभाच्या मूर्ति बनवीत असत. उदाहरणार्थ, खालील शिलालेख पाहा —

### नंबर ८

**( अ A ) सिद्धम् म ( हा ) रा ( ज ) स्य र**

**( ा जा ) तिराजस्य देवपुत्रस्य हुवष्कस्य स ४० ( ६०? ) हेमंतमासे ४ दि १० एतस्यां पूर्व्वायां कोदिये गणे स्थानिकीये कुल अटय ( वेरि ) याण शाखायावाचकस्यार्य्यवृद्धहस्ति (स्य)**

**( ब B ) शिष्यस्य गणिस्य आर्य्यख ( र्ण ) स्य पुण्यम् ( न ) ( स्य ( व ) तकस्य ।**

**( क ) सकस्यकुटुम्बिनीयेदत्ताये—नधर्मो महाभोगताय-मीयताम्भगवानृषभश्रीः ।**

**अर्थः**– जय! महान् प्रसिद्ध राजा व महाराजाधिराज देवपुत्र हुवष्कच्या सवत ४० ( ६१ ? ) मध्ये हेमतऋतूमधील ( शीतकाल ) चतुर्थ महिन्याच्या दशमीच्या दिवशीं–ह्या उपरिनिर्दिष्ट तिथीच्या दिवशीं-- हे उत्कृष्ट दान वतनिवासी येथील का पासकची भार्या दत्ता इने पूज्य वृद्धहस्ति आचार्य ( हे कोत्तियगण, शानिकीयकुल, आर्यवैरि ( आर्यवज्राचे अनुयायी ) यांच्या वशामध्ये होऊन गेले ) यांचे शिष्य माननीयस्वररत्न गणिन यान्या विनतीवरून दिले आहे. भगवान् तेजस्वी **ऋषभ** प्रसन्न होवो!

—( पृष्ठ ३८६ भाग १ )

**नंबर १४.**

( अ A ) **१ सिद्धम् ॥ कोट्टियातो गणातो ब्रह्मदासिकात ( ो ) कुलातो २ उ ( च्चे ) नागरितो शाखातो–रिनातोसं ( भ ) ो ( गातो ) अ ( र्य—**

( ब B ) **१ जेष्ट हस्तित ( स्य ) शि ( ष्या ) अर्य महलो- अर्य जेष्ट ( हस्तिम ) ( शिशो ) अर्य्य ( गा ) ढक ( ा ) (त) स्य शिशिनि ( अर्य्य ) २ शामयेनिवर्तना ड ( स )– प्रतिमावर्मयेधीतु ( गुल्हा ) ये जय दासस्य कुटुंबिनिये दानं ।**

**अर्थः**– जय! सन्मान्य जेष्टहस्ति ( जेष्टहस्तिन् ) ( हे कोत्तियगण, ब्रह्मदासिककुल, उच्च नागरीशाखा व आरिनसभोगमध्ये होते ) याचे शिष्य पूज्य महल होते. सन्मान्य जेष्टहस्ति याचे शिष्य पूज्य गाधक होते. ह्याची शिर्ष्याण विदुषी सामा इच्या विनतीवरून वर्माची पुत्री व जयदासाची पत्नी गुलहानें–उषभा ( ऋषभा ) च्या मूर्तीची प्रतिष्ठा करविली.

—( पृष्ठ ३८९ भाग पहिला. )

**नंबर २८**

( अ A ) **भगवतो उसभस वारणेगणें नाडिके कुले सा ( यं )**

( ब B ) **ढुकसवायकससिसिनिएसादिताएनि—**

**अर्थः**– भगवान ऋषभदेवका जय! सादिताच्या (ही धुक याची शिष्यीण होती.) विनतीवरून ही प्रतिष्ठा केली व धुक हे वारणगण, नादिकुल व साख्य याचे उपदेशक होत.

—( **पान २०६--२०७ भाग दुसरा** )

जवळ जवळ दोन हजार वर्षापूर्वी ऋषभाला जैनाचे पहिले तीर्थंकर मानीत असत. आणि महावीर व पार्श्वनाथ हे केव्हा होऊन गेले? महावीरस्वामी इसवी सनापूर्वी ५२६ पाचशेसवीस वर्षे मोक्षास गेले. आज मित्तीला वीरसवत १४३६ आहे. ह्मणजे हे विक्रम सवताच्यापूर्वी चारशेंसत्तर ४७० वर्षे मोक्षाला गेले. व पार्श्वनाथ हे त्यापूर्वी २५० अडीचशे वर्षे अगोदर निर्वाणाला गेले. तेव्हा वरील शिलालेखावरून ऋषभ हे जैनांचे तीर्थकर होत ही गोष्ट सिद्ध होते. कारण हे शिलालेख पार्श्वनाथ, व महावीर निर्वाणाला गेल्यानतर कित्येक शतके लोटल्यावर लिहिले गेले आहेत. जर महावीर व पार्श्वनाथ हे जैनधर्माचे सस्थापक असते तर दोन हजार वर्षापूर्वीच्या माणसानी ऋषभाच्या मूर्तीची प्रतिष्ठा करणे कसें शक्य होते? असो.

याचप्रमाणे कित्येक लेखक हा धर्म सहाव्या शतकात निघाला असे समजतात. कित्येक बौद्धधर्माची शाखा आहे असे लिहितात. व कित्येकांनी चार्वाकधर्माशी याचा मिलाफ केला आहे. कित्येक महावीराला ह्या धर्माचे सस्थापक समजतात. तर काही पार्श्वनाथाकडे त्याचे उत्पादकत्व देतात. विद्वान गृहस्थाकडून अशा तऱ्हेने धर्माची अवहेलना होणें योग्य नाही सर्व प्राणीमात्राबद्दल दया दाखविणाऱ्या या आमच्या **दयामय** धर्माची विटबना विद्वानाकडून होईल असे आमच्या कधी स्वप्नीहि आले नव्हते. परतु ह्या दुष्ट ससारामध्ये सद्गुण हा बहुधा विपत्तीमध्ये आढळतो! पूर्वार्धातील हा भाग सपविण्यापूर्वी मी आणखी एकदा प्राचीन हिंदुस्थानाकडे वळतो. मला आणखी एक वेळा आपली अशी खात्री करू द्या कीं, ह्या श्रेष्ठ भरतभूमींमध्यें प्राचीन काळीं––

" स्वर्गकामो यजेत् "

अर्थः–' जो मनुष्य स्वर्गाला जाऊ इच्छितो त्यानें यज्ञ करावा एवढेच ह्मणणारी माणसे नव्हतीं परंतु जे यज्ञाला मुळीच महत्व देत नसत, व जे सर्वस्वी त्याचा निषेध करीत असत असेहि अनेक संप्रदाय तेव्हां अस्तित्वांत होते. ते सर्व संप्रदाय अथवा पंथ आजमित्तीस अस्तित्वांत राहिले नाहींत, किंबहुना त्यांपैकीं, बरेचसे कायमचेच नामशेष झाले आहेत. ही मोठी शोचनीय गोष्ट झाली. परंतु अद्यापि देखील कांही धर्म अस्तित्वात आहेत व त्यांचें तत्वज्ञान ( Philosophy ) सध्याहि प्रचलित आहे. आणि प्राचीनकाळी भरतभूमीमध्ये स्वर्ग व मोक्ष मिळण्याला वैदिकयज्ञ, व यज्ञामध्ये प्राण्यांची हिंसा करणे एवढेच उपाय नव्हते ही गोष्ट सिद्ध करण्याला सध्यांचे हे संप्रदाय पुरेसे आहेत. किंबहुना लोक स्वर्ग व मोक्ष मिळविण्याकरिता ह्या विरुद्ध उपायाचाहि अवलंब करीत असत. व जेव्हां एक पक्ष असे ह्मणत असे कीं, आह्मी संसारार्णवामधून हिंसेच्या योगाने तरून जाऊ, तेव्हां दुसरा पक्ष ह्मणत असे की, मोक्ष मिळण्याला अहिंसाच फक्त कारण आहे. खुद्द हिंदूच्या भागवत व बृहत्पराशरस्मृति वगैरे ग्रंथांतून यज्ञाचा निषेध केलेला आढळून येतो.

—(पान ४१ पहा. )

## योगदर्शन.

आतां आपण पहिल्याने पूर्वकालीन योग्यांच्या तत्वज्ञानाकडे वळू. ह्याचा योगसूत्रांमध्ये पतंजलि ऋषींनीं आमच्याकरितां व्यवस्थेशीर रीतीनें क्रमशः संग्रह केला आहे. आमचे देखील हेमचंद्र जैनाचार्यांनी बनविलेले योगसूत्र आहे. हे प्रसिद्ध हेमचंद्रकोषाचे कर्ते आहेत. परंतु ज्याअर्थी पतंजली यांचीं योगसूत्रे प्रामुख्याने प्रचारात आहेत त्याअर्थी आपण त्या सूत्राचे परीक्षण करून त्यामध्ये शाश्वत सुख मिळण्याला वैदिकयज्ञाची कांहीं जरूरी दाखविली आहे की काय हें आपण पाहू.

पतंजलींच्या योगसूत्रांमध्ये वैदिकयज्ञाच्या अवश्यकतेबद्दल अथवा उपयुक्ततेबद्दल कोठेहि उल्लेख केलेला आढळून येत नाही. परतु उलट पाद २ सूत्र ३० त्यामध्यें 'यमा' चे वर्णन आहे व त्यामध्यें अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, व अपरिग्रह यांचा मात्र समावेश केला आहे:—

**अहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः ॥ ३० ॥**

**टीकाः— तत्र प्राणवियोगप्रयोजनव्यापारो हिंसा सा च सर्वानर्थहेतुः। तदभावः अहिंसा। हिंसायाः सर्वकालमेव परिहार्यत्वात् प्रथमं तदभावरूपाया अहिंसाया निर्देशः। सत्यं वाङ्मनसोर्यथार्थत्वम्। स्तेयं परस्वापहरणं तदभावः 'अस्तेयं'। ब्रह्मचर्यं उपस्थसंयमः। अपरिग्रहः भोगसाधनानामस्वीकारणं। त एते अहिंसादय पंचयमशब्दवाच्या योगांगत्वेन निर्दिष्टाः ॥ ३० ॥**

—( इति राजमार्तंडः )

**अर्थः—** अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, व अपरिग्रह ह्मणजे 'यम' अर्थात बंधन होय. ज्या कामामध्ये कोणत्याही प्राण्याचा वध होतो ती हिंसा होय. हिंसा ही सर्व पापाचे मूळ होय. व ती न होणे ह्मणजे 'अहिंसा' होय. ह्मणून हिंसेचा सर्वकाळी त्याग केला पाहिजे. व ह्याकरिता हिंसेच्या अभावरूप 'अहिंसेचे' पहिल्याने वर्णन केले आहे. यथार्थ गोष्टी बोलणे, व मनामध्ये वागविणे याला 'सत्य' ह्मणतात. दुसऱ्याच्या धनाचा अपहार करणे याला 'स्तेय' ह्मणजे चोरी ह्मणतात व त्याचा अभाव 'अस्तेय' होय. व 'ब्रह्मचर्य' ह्मणजे स्त्रीच्या उपभोगाच्या इच्छेला रोकणे. व 'अपरिग्रह' ह्मणजे विषयोपभोगाला आवश्यक अशा वस्तु न ठेवणे. ही पांच ( अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व परिग्रह ) ह्मणजेच 'यम' होय. अर्थात यम शब्दाने वरील पांच अर्थ होतात.

योग साधण्याला यमाची अत्यत आवश्यकता आहे. एकतिसाव्या सूत्रामध्ये ह्या पाच बंधनांला 'यम' असें ह्मटले आहे. मनाच्या सर्व अवस्थेमध्ये याचे पालन केले तरच महाव्रत होतें.

**एते जाति देशकालसमयानवच्छिनाः सार्वभौममहाव्रतम् ॥३१॥**

**टीकाः—'जाति' ब्राह्मणत्वादि । देशः तीर्थादिः । 'काल' चतुर्दश्यादिः । 'समय'ब्राह्मणप्रयोजनादिः । एतैश्चतुर्भिः'अनवच्छिनाः' पूर्वोक्ता अहिंसादयो यमाः सर्वासु क्षित्यादिषु चित्तभूमीषु भवाः 'महाव्रतं' इत्युचते । तद्यथा ब्राह्मणं न हनिष्यामि, तीर्थे कंचन न हनिष्यामि, चतुर्दश्यां न हनिष्यामि, देवब्राह्मणाद्यर्थव्यतिरेकेण हनिष्यामीत्येवं चतुर्विधावच्छेदव्यतिरेकेण कंचित् क्वचित् कदाचित् कस्मिश्चिदप्यर्थे न हनिष्यामीत्यवच्छिनाः एवं सत्यादिषु यथायोगं योज्यं । इत्थमनियतीभूताः सामान्ये नैव प्रवृत्ताः महाव्रतमित्युच्यते न पुनः परिच्छिनावधारणम् ॥ ३१ ॥**

—(इति राजमार्तण्डः)

**अर्थः—** हे यम सर्व लोकाकरिता, जाति, देश, काल, व समय याची अपेक्षा न करितां महान तप आहेत. अर्थात् जात्यादि वगैरे जे काहीं चार प्रकार सांगितले आहेत त्यांचा विचार न करितां भेदरहित वृत्तीनें मनाच्या सर्व स्थितीमध्ये व कोणत्याही अवस्थेमध्ये हे यम आवश्यक आहेत. ह्मणजे याचा अर्थ असा समजू नये की मी ब्राह्मणाचा वध करणार नाही, तर याचा अर्थ असा आहे कीं मी कोणत्याही कारणानें कोणत्याहि ठिकाणी, कोणत्याही वेळीं, कोणत्याहि जीवाचा वध करणार नाही अशाच रीतीने इतर यमाचाहि अर्थ केला पाहिजे. आणि अशा रीतीने हे आचार जेव्हां कोणत्याहि प्रकारची मर्यादा न घालता सर्वव्यापक होतात तेव्हां त्याला महान् तप अथवा 'महाव्रत' ही सज्ञा प्राप्त होते. आणि ते आचार पाळताना जेव्हा कसला तरी निर्बंध असतो, तेव्हा मात्र त्याला महाव्रत ह्मणता येत नाही"

**(योगसूत्राचें भाषांतर,**
**डॉक्टर रजेन्द्रलाल मित्र पान ९३)**

ज्याप्रमाणे योग्याला मी कोणत्याही स्थळीं कोणत्याहि समयाला कोणत्याहि उद्देशानें कोणत्याहि प्राण्याचा वध करणार नाहीं, अशी

शपथ घ्यावी लागते त्याप्रमाणें सत्य, अस्तेयादिसबधानें समजावे. अशा प्रकारच्या त्याच्या प्रतिज्ञेला ' महाव्रत, असें ह्मणतात. ३५ व्या सूत्रामध्ये असें ह्मटले आहे, कीं:—

**अहिंसाप्रतिष्ठायां तत्सन्निधौ वैरत्यागः ॥ ३५ ॥**

**टीकाः— तस्याहिंसां भावयतः 'सन्निधौ' सहजविरोधिनामप्यहितकुलादीनां 'वैरत्यागः' निर्मत्सरतयावस्थानं भवति हिंसारता हिंस्रत्वं परित्यजन्तीत्यर्थः ॥**

**अर्थः**—ज्यांची अहिंसेवर पूरी पूरी श्रद्धा आहे त्याच्याजवळ वैरभाव नांवालाहि राहत नाही. अर्थात् स्वभावतःच क्रूर असे सर्प मुगुसादि प्राणी निरुपद्रवी होतात. तात्पर्य हे आहे कीं ज्या प्राण्याचा स्वभावच हिसा करण्याचा आहे ते सुद्धा आपला हिंस्र स्वभाव सोडून देतात. ह्यावरून योगदर्शनामध्ये अहिंसेची केवढी मोठी महती वर्णन केली आहे हे आपल्या सहज ध्यानात येईल. योग्यानें आपले अंतिम ध्येय प्राप्त करून घेण्याकरितां सर्वदा, सर्व ठिकाणीं, सर्व प्रकारच्या हिंसेचा मग ती हिंसा कोणत्याहि हेतूने का असेना अवश्य त्याग केलाच पाहिजे. योग्याच्या अशा शुद्धाचरणामुळें तो इतका प्रभाशाली होतो कीं ज्या प्राण्याचे परस्पर हाडवैर असते ते प्राणी सुद्धा त्या योगी पुरुषाजवळ आल्याबरोबर एकदम आपला वैरभाव विसरून जातात. सबध योगसूत्रामध्ये यज्ञाने योगाला सहाय्य होते असा उल्लेख केलेला कोठेंहि आढळून येत नाही. उलट अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह, यांच्याच योगानें त्याला मदत होते असे मात्र लिहिले आहे. ३६ व्या सूत्रामध्यें असे ह्मटलें आहे—

**सत्यप्रतिष्ठायां क्रियाः फलाश्रयत्वम् ॥ ३६ ॥**

**टीकाः— क्रिया मारणादि 'क्रियाः' योगादिकाः 'फलं' स्वर्गादिकं प्रयच्छंति । तस्य तु सत्याभासवतो योगिनः तथा सत्यं प्रकृष्यते यथा अकृतायामपि क्रियायां योगी फलमाप्नोति । तद्वचनात् यस्य कस्यचित् क्रियामकुर्वतोऽपि क्रियाफलं भवतीत्यर्थः ॥**

**अर्थः**— सत्यावर ज्याचा पूर्ण भरवसा आहे तो कर्मांच्या फलाचा आश्रयस्थान होय. अर्थात त्याची कर्मे हीच फले होत. क्रिया हे यज्ञ होत. व हे जर केले तर स्वर्गादि फलाची प्राप्ति होते. जो योगी सत्यव्रत धारण करितो तो इतक्या महत्वाला चढतो की त्याला यज्ञ न करिता ते फल प्राप्त होते व त्याच्या आज्ञेप्रमाणे कोणत्याहि माणसाला त्या क्रिया केल्याशिवाय ते फळ मिळू शकते. वेदांमध्ये याज्ञिकविधि जसे पुण्यदायक आहेत ह्मणून वर्णन केले आहे तसेच सत्य हेंही तितकेच पुण्यावह आहे असे येथे दाखविले आहे. ह्मणजे मनुष्याला यज्ञ केल्यापासून जे फल प्राप्त होते तेच फल सत्यावर अढळ श्रद्धा ठेवून ते व्रत पाळल्याने प्राप्त होते व याशिवाय यज्ञामध्यें कराव्या लागणाऱ्या निर्दयतेमुळे जे पातक लागते त्यापासूनहि सत्य बोलणाऱ्या माणसाचा बचाव होतो. हे सूत्र फार अर्थबोधक आहे. योगानुयायी हे वैदिक यज्ञाला महत्व देणारे नव्हते ही गोष्ट यावरून उघडपणे सिद्ध होते. व जे लोक वैदिक यज्ञामधील हिंसेचे मण्डण करितात त्यानाहि पण हे एक सणसणीत प्रत्युत्तर आहे.

**सत्यप्रतिष्ठायां क्रियाफलाश्रयत्वम् ॥**

**अर्थः**— ज्याची सत्यावर अचल श्रद्धा आहे तो कर्मांच्या फलाचा आश्रयस्थान आहे. "आपण यज्ञ करू नयेत. कारण ते निर्दयतेमुळे दूषित झाले आहेत. आपण त्याऐवजी सत्यव्रत घ्यावे. यज्ञापासून जे काहीं पुण्य लागतें असे ह्मणतात ते सर्व पुण्य आह्माला खरे बोलण्यापासून लागेल, एवढेच नव्हे परतु जर आह्मी सत्यव्रत धारण केले तर आह्मी इतके पुण्यशाली होऊ की यज्ञापासून जें कांहीं कल्पित फल प्राप्त होते अशी भावना आहे ते सर्व फल आमच्या आज्ञेप्रमाणें कोणालाहि मिळू शकेल" असेंहि योगी ह्मणतो.

ह्या सूत्रामध्यें वैदिक यज्ञापासून मिळणाऱ्या फलाचे खडन केले नाहीं अशी कदाचित आपणाला शका येण्याचा सभव आहे त्यास उत्तर हेंच कीं ज्या अर्थी योगदर्शनामध्यें जीवहिंसेचा सर्वस्वी निषेध

केला आहे. अर्थात् मनाच्या कोणत्याहि अवस्थेमध्ये, कोणत्याहि ठिकाणीं व कोणत्याहि काळीं हिंसा करू नये असे लिहिले आहे त्याअर्थी योगदर्शनानें अहिंसेचेच मण्डन केले आहे असेच ह्मणावे लागते. यज्ञ हे फलोत्पादक असते तर ते योगाचे सहायक ह्मणून त्याची गणना केली असती. परंतु वस्तुस्थिति तशी नाही हे मोठे आश्चर्य होय. अर्थात यज्ञाला योगाचे सहायक ह्मणून ते मानीत नाहीत. प्राचीनकाळीं योगाभ्यास करणाऱ्याचा संप्रदाय हा खरोखर वैदिक यज्ञाच्या व जीवहिंसेच्या—मग ती कोणत्याही हेतूने का असेना—विरुद्ध असला पाहिजे ह्या गोष्टीची सत्यता आपणाला योग्याच्या एका संप्रदायामध्ये अर्थात जैनामध्ये तरी निदान स्पष्टपणे दिसून येते. जैनलोक हे मोठे योगी होते ही गोष्ट आपण अवश्य ध्यानात ठेविली पाहिजे. जैनाचे सर्व तीर्थंकर योगीश्वर होते. सर्व जैनसाधुहि मोठे योगी होते. योगाभ्यास केल्याविना कोणत्याहि जैनाला मोक्ष मिळू शकत नाही. कर्मांचा नाश करण्याकरिता व मोक्ष मिळविण्याकरितां ही एक अवश्यक गोष्ट आहे. आपण आमच्या मंदिरातील मूर्ति पहा त्या मूर्ति योगाभ्यास करीत आहेत असेच आपणाला दिसून येते. दिगंबर मूर्तींच्या आसनाकडे व ध्यानाकडे दृष्टि फेकली ह्मणजे आपणास त्या समाधीमध्ये ( आत्मध्यानामध्ये ) तल्लीन झाल्या आहेत असे दिसून येईल. आणि जैन मूर्तीमधील विशिष्टत्व हेच आहे. आपण योगाभ्यास करणारी कोणती मूर्ति पाहिली असेल तर ती अवश्य जैनाचीच असली पाहिजे. हिंदूच्या मूर्ति अशा प्रकारच्या नसतात. पुष्कळ लोकाना जैनधर्माचे खरे स्वरूप कळले नाही ही मोठी शोचनीय गोष्ट आहे. नग्न मूर्तींची पूजा करितात ह्मणून कांहीं लोक जैनाना दूषण देतात. परंतु ते त्या मूर्तीच्या आसनाकडे व ध्यानाकडे पाहत नाहीत. ऋषींची ध्यानामध्ये तन्मयता झाल्यामुळें वस्त्र परिधान करण्याचा विचार त्याना मुळीं शिवतच नाहीं. अलीकडे बऱ्याच विद्वान गृहस्थाना ' साधूनी दिगंबर असणें हें अवश्यक आहे ' असे वाटू लागले ही मोठी समा-

धानाची गोष्ट होय. उदाहरणार्थ.— ता. २१ ते २७ जून इ. स. १९१० साली हिंदू साधु के. नारायणस्वामी ऐयर बी. ए. एल्. एल्. बी. जॉइंट जनरल सेक्रेटरी थियोसफिकल सोसायटी यांची मुंबई मुक्कामी सात व्याख्याने हिंदु धर्मावर झाली, ते एका व्याख्यानांत ह्मणाले:—

" Digambara is the higher stage of a saint Be as naked as Akasha to reach higher condition "

ह्मणजे साधुत्वाची सर्वोत्कृष्ट खूण '**दिगंबर**' होणे ही होय. अर्थात त्याने सर्व वस्त्राचा त्याग केला पाहिजे व आकाशासारखे नग्न झाले पाहिजे. आमचे श्वेतांबर बंधु वस्त्रसहित साधूला अथवा गृहस्थाला केवळज्ञान होते असे समजून सर्वोत्कृष्ट अशा दिगबर अवस्थेचा अप-मान करितात. त्यांनी इकडे अवश्य लक्ष द्यावे अशी प्रार्थना आहे. त्याचप्रमाणे हिंदूनीहि त्याचे मनन केल्यास सध्याच्या काळी आपाप-सातील दुर्हास बराच आळा पडेल अशी आशा आहे. जैनऋषी हे मोठे योगी होते. व "**अहिंसा परमो धर्मः**" हाच त्याचा धर्म होय. योग्याला पचमहाव्रते करावी लागतात; व जैनाचीहि हीच पच-महाव्रते आहेत हे मात्र मोठे आश्चर्य होय.

ही पचमहाव्रते महावीरस्वामींनी सांगितली ही गोष्ट आप-णाला माहितच आहे. महावीरस्वामींच्यापूर्वी पार्श्वनाथांनी फक्त चार महा-व्रते सांगितली होती. ती.—अहिंसा, सत्य, अस्तेय, व अपरिग्रह; आणि अपरिग्रह व्रतामध्येच ब्रह्मचर्याचाहि समावेश तेव्हां होत असे. महा-वीराचे समकालीन मुनी हे बुद्धीने थोडेसे कमी असल्यामुळे त्यांनी ब्रह्मचर्य हे वेगळे पांचवें व्रत सांगितले. ह्याप्रमाणे पार्श्वनाथांनीं चार महाव्रते सांगितली, व वर्धमानस्वामींनी पुढे पांचवे ब्रह्मचर्य सांगितले.

—( **उत्तराध्ययन व्याख्यान २३.** )

बौद्धाच्या समानफलसुत्त ग्रंथामध्ये ही चार महाव्रते पार्श्वनाथाच्या ऐवजीं महावीराच्या तोंडी चुकून घातली असे डॉ. जेकोबी याचे ह्मणणे

आहे, तेव्हां पतजली यानें ही व्रते महावीरापासून घेतलीं काय? हीं चार महाव्रतें व तसेच पाचवेहि ब्रह्मचर्यव्रत प्राचीन काळीं भरतखडांतील सर्व योगी पाळीत असले पाहिजेत.

## सांख्यदर्शन.

आता आपण कपिलमुनीच्या साख्यदर्शनाकडे वळू. सहाव्या सूत्रामध्ये असें ह्मटले आहे:—

**" अविशेषश्चोभयोः "** –( अ. १ सूत्र ६ )

—( **टीपः-- परिशिष्ट लेख नं. ९ पहा.** )

**भाष्यः–उभयोरेव दृष्टादृष्टयोरत्यन्तदुःखनिवृत्यसाधकत्वे यथोक्ते तद्धेतुत्वे चाविशेष एव मन्तव्य इत्यर्थः ॥**

**अर्थः**— दृष्ट व तसेच अदृष्ट ह्या दोन्ही साधनामध्ये दु ख नाहीसे करण्याचे सामर्थ्य नसल्याने व दोन्हीमध्येहि तेच ( अविशुद्धि इत्यादि ) हेतु असल्यामुळे दोघामध्येहि काही विशेष नाही असे समजावें. "दोन्हींमध्ये काही एक फरक नाही," ह्मणजे दुःखापहार करण्याचे प्रत्यक्ष ( दृश्य ) उपाय व वैदिक उपाय ह्यांमध्ये मुळीच फरक नाही. दोन्हीहि सारखे आहेत. कारण, वैदिक यज्ञामध्ये निर्दयतेचे पातक लागते. यज्ञामध्ये जी जीवहिसा होते तिचे फल वाईटच असले पाहिजे. व मनुष्याला त्यामुळे होणार दुःख सोसलेच पाहिजे वस्तुतः कपिल मुनीच्या अनुयायाची

**" मा हिंस्यात् सर्वाभूतानि "**

**अर्थः**—कोणत्याहि प्राण्याची हिसा करू नये, या श्रुतीवर पूर्ण श्रद्धा होती.

**" अग्नीषोमीयं पशुमालभेत् "**

**अर्थः**—ज्यांची देवता अग्नी व सोम आहे अशा पशूचा वध करावा ही श्रुति त्यांना मुळीच मान्य नव्हती व त्याचप्रमाणे ही श्रुति 'मा हिस्यात् सर्वभूतानि' ह्या श्रुतीचा अपवाद आहे हेही त्यास मान्य नव्हते. यज्ञामधील हिसा सोडून इतरत्र ठिकाणी हिसा केली ह्मणजे हिसा

होते, ह्या स्वार्थी तत्वावर त्याची श्रद्धा नव्हती. उलट सर्व प्रकारची हिंसा हिंसा होते हे तत्व मानणाऱ्यापैकी तो होता आणि ज्याअर्थी वैदिक यज्ञांमध्ये हिंसा होते, त्याअर्थी त्याबद्दल भोगावे लागणारे दु:ख माणसाला झालेच पाहिजे. कपिल मुनींच्या अनुयायाचे ह्मणणे असे आहे की, 'जर वेदविहित हिंसा हिंसा ह्मणून समजली जात नाही' तर युधिष्ठिराला युद्धामध्ये कराव्या लागणाऱ्या हिंसेबद्दल प्रायश्चित घेण्याचे प्रयोजन नव्हते. कारण वेदामध्ये ह्याला क्षत्रियाचा धर्म ह्मणून सांगितले आहे.

**युधिष्ठिरादीनांस्वधर्मेपियुद्धादौज्ञातिवधादिप्रत्यवायपरिहारायप्रायश्चितश्रवणाच्च ॥**

**सांख्यसूत्र ६ अ. १ ल्या मधील विज्ञानभिक्षुकृत भाष्य.**

**अर्थः**— युधिष्ठिरादि राजाना आपल्या धर्मरूपी युद्धामध्ये जे जातिवधाचें पाप लागले ते धुवून टाकण्याकरिता ह्मणून प्रायश्चित करावे लागले असे ऐकिवांत आहे. पुन: साख्यकारिका दुसरीमध्ये असें लिहिले आहे;—

**दृष्टवदानुश्रविकः सह्यविशुद्धिक्षयातिशययुक्तः ॥**

**सांख्यतत्वकौमुदीः— गुरुपाठादनुश्रूयतइत्यनुश्रवोवेदः । एतदुक्तं भवति । श्रूयत एव परं केनापिक्रियतइत्यनुश्रवोवेदः तत्रभव आनुश्रविकः । तत्रप्राप्तोज्ञातइतियावत् । आनुश्राविकोपि कर्मकलापोदृष्टे न तुल्योवर्तत इति ऐकांतिकात्यन्तिकदुःखप्रतिकारानुपायत्वस्योभयत्रापि तुल्यत्वात्—अस्यां प्रतिज्ञायां हेतुमाहसह्यविशुद्धक्षयातिशययुक्तः । अविशुद्धिः सोमादियागस्यपशुबीजादिवधसाधनता क्षयातिशयौच फलगतावप्युपायेउपचरितौ क्षायेत्वं च स्वर्गादिः सत्वेसनिकार्यत्वादनुमितम् । ज्योतिष्टोमादयः स्वर्गमात्रसाधनं वाजपेयादयस्तु स्वाराज्यसाधनमित्यतिशययुक्तत्वं । परसम्पदुत्कर्षोहिहीनसंपदं पुरुषंदुःखाकरोति ।**

**अर्थः**—अनुश्रविक ह्मणजे दुःखापहार करणे हे दृश्य उपायासारखे आहे. कारण तें शास्त्रनिषिद्ध अशा 'अविशुद्धि' अथवा 'हिंसा' यासारख्या दोषांनी युक्त आहे.

**'अग्निषोमीयं पशुमालभेत्'**

ही श्रुति 'मा हिंस्यात् सर्व भूतानि' ह्या श्रुतीला अपवाद आहे हे मत कपिलमुनींच्या अनुयायांना मान्य नव्हतें हे स्पष्टपणे येथेहि दिसून येते.

गौडपाद यानेहि आपल्या सांख्यकारिकेच्या भाष्यामध्ये महाभारतातील आधार देऊन कपिलाच्याच मताचे पुष्टिकरण केलें आहे. तो पितापुत्रांच्या संवादामधील एक श्लोक देतो त्यांत पुत्र ह्मणतोः—

**तातैतद्बहुशोभ्यस्तं जन्मजन्मान्तरेष्वपि ।**
**त्रयीधर्ममधर्माढ्यं न सम्यक् प्रतिभाति मे ॥**

**अर्थः**—बाबा, मी जन्मोजन्मी वैदिक धर्माचा फार अभ्यास केला आहे. मला हा अधर्माने भरलेला वैदिकधर्म मुळीच मान्य नाही. कपिलसूत्रावरील भाष्यामध्ये विज्ञानभिक्षु ह्यानेंहि ह्याच विषयावर ह्याच अर्थाचा मार्कण्डेय पुराणातील आधार दिला आहे.

**तस्माद्यास्याम्यहं तात दृष्ट्वेमं दुःखसन्निधम् ।**
**त्रयीधर्ममधर्माढ्यं किंपाकफलसन्निभम् ॥**

**अर्थः**— अहो बाबा, वैदिकधर्मामध्ये महादुःख आहे हें पाहूनहि, ह्या अधर्माने युक्त अशा वैदिकधर्माप्रमाणे मीं का वागावें? हा वैदिकधर्म किंपाक (कडू इंद्रावन) फळाप्रमाणे आहे. हे फळ वरून पाहिले असता फार सुंदर दिसते, परंतु आंतून मात्र सर्व काळकूट विषाने पूर्णपणे भरलेलें असते.[1]

कपिलमुनींनी वेदाबरोबर (स्यूमरश्मीशीं) वादविवाद केला होता ही सुप्रसिद्ध गोष्ट[2] आपणाला माहित असेलच. एक विद्यार्थी आपला

---

१ परिशिष्ट लेख नं. १० पहा.

२ महाभारतामधील शांतिपर्वामध्ये कपिलाचा संवाद पहा.

वेदाभ्यास पुरा झाल्यावर आपल्या घरीं परत गेला. त्यावेळीं अशी चाल होती कीं, कोणी विद्यार्थी वेदाध्ययन सपवून आपल्या घरी परत आला ह्मणजे त्याच्या आदरसत्कारार्थ एका गाईचे बलिदान करावे लागत असे. कपिलाने ह्या गोष्टीला अडथळा केला. नतर वेद ( स्यूमरश्मि ) हे गायीच्या पोटांत शिरले व त्यानीं कपिलऋषीबेरोबर वादविवाद केला. प्राचीनकाळीं जे ऋषी यज्ञामध्ये होणाऱ्या जीवहिंसेचा निषेध करीत असत, व जे ऋषी धर्माचें मुख्य तत्व अहिंसा हेच आहे ह्मणून प्रतिपादन करीत असत त्या प्राचीन ऋषींपैकी कपिल हे एक होते ही गोष्ट सिद्ध करण्याला ही दंतकथा फार महत्वाची आहे. साख्यकारिकेमध्ये यज्ञांमध्ये होणाऱ्या जीवहिंसेचाच फक्त निषेध केला आहे असे नाही तर अग्नींमध्ये बीज टाकतात त्याचाहि प्रतिबंध केला आहे.

**सत्वविशुद्धिक्षयातिशययुक्तः ॥** —( साख्यकारिका २ )

**टीकाः— अविशुद्धि सोमादियागस्य पशुबीजादिवधसाधनता ॥**

**अर्थः**—सोम आदि यज्ञ पशु व बीजादिकाची हिंसा केल्याने सिद्ध होतात, व ह्याच कारणामुळें ते अशुद्ध आहेत. ह्यावरून असे दिसून येते की जैनांप्रमाणे साख्यमतानुयायीहि यज्ञांत बीजाचा नाश करण्याचा निषेध करणाऱ्यांपैकींच § होते.

---

§ आधुनिक महर्षि डॉक्टर **रामकृष्ण गोपाळ भांडारकर** एम्. ए. यानींहि आपल्या एका व्याख्यानात यज्ञामध्ये होणाऱ्या हिंसेचा निषेधच केला आहे " यज्ञयाग वर्षानुवर्षे करून दररोज शेकडों बोकडे मारून सोमरस काढून त्या दोहोंचा काहीं अश निरनिराळ्या देवतास ह्मणजे अग्नीस, इंद्रास, सवित्यास, मरुतास, वरुणास आणि दुसऱ्या अनेक देवतास देऊन लोक आपण खात व पीत असत त्या वेळेस धर्म शुद्ध होता काय?" असा त्यांनीं प्रश्न विचारला आहे अर्थात नाहीं असेच उत्तर द्यावे लागतें. तसेंच " कालिदेवि आदिला हिंदूनीं बकऱ्या वगैरेचा भोग द्यावा की नाही ?" या प्रश्नाचें उत्तर देताना सेंट्रल हिंदुकॉलेजच्या सपादिका मिसेस ॲनिबिझेंटबाई ह्मणतात. " कलियुगात पचमकालात दानाचेच महत्व मोठे आहे यास्तव त्याच्याच योगानें देवी बकऱ्याच्या भोगापेक्षा जास्त प्रसन्न होतात. " हे एका पाश्चात्य

## महाभारत.

प्राचीन ऋषी 'अहिंसाधर्म' हाच खरा धर्म आहे ह्या मताचे होते असे लिहिलेले महाभारतामध्येहि बऱ्याच ठिकाणीं आढळून येतें. ह्या पवित्र ग्रंथामधील अहिंसा धर्माबद्दलचा एक अतिशय हृदयंगम व करुणात्मक असा भाग ह्मटला ह्मणजे शांतिपर्वामधील मोक्षधर्मांतला तुलाधारनामक एक वणिक्पुत्र व जाजलि नावाचा एक ब्राह्मण या दोघा-

---

( मागील पानावरून पुढे चालू. )

विदुषींचे उद्गार यज्ञामध्ये हिंसेचे मण्डन करणाऱ्यानीं मनन करण्याजोगे आहेत. ता. ९।९।०५ रोजीं शनिवारांतील गोडबोले यांच्या गणपतीपुढील व्याख्यान-प्रसंगीं रा. रा. कृ. प्र. खाडीलकर यांच्या 'पशुयज्ञ' या व्याख्यानानंतर अध्यक्ष या नात्यानें **लो. मा. बाळ गंगाधर टिळक** ह्मणाले:—

"देवानीं पुरुषयज्ञ करूनच सृष्टि निर्माण केली 'यज्ञेनयज्ञमजयत' असा पूर्वीचा उल्लेख आहे. आपल्यास जी प्रियवस्तु असते ती कोणत्या तरी मोठ्या उद्देशाकरिता द्यावी लागते हे यज्ञांतील रहस्य आहे. खिस्ताचा बळी हा सुद्धां अशाच तत्वावरच यज्ञ आहे. ईश्वरानें प्रत्यक्ष आपल्या पुत्रास बळी दिले. खिस्ती लोकांत मनुष्याचा बळी देण्याची चाल पूर्वी होती, व त्याच चालीचा आरोप त्यांनी देवावरहि केला. पशू देणे, द्रव्य देणे, अशी यज्ञाची ( Evolution ) उत्क्रांति होता होता इंद्रियांचा इंद्रियांचे ठिकाणी संयम करणे ह्मणजे यज्ञ करणे वगैरे भगवद्गीतेंत सांगितलेले यज्ञ सुरू झाले; व आपल्यांतील अज्ञान व तम यांचा ज्ञानाचे ठिकाणीं यज्ञ करावा अशा प्रकारच्या उच्च कल्पनेचा प्रादुर्भाव होऊन यज्ञाचा विस्तृत व उदात्त अर्थ झाला. उच्च प्रकारचा हेतु साधण्यास आपणास प्रिय असलेली वस्तु बळी दिली पाहिजे हे त्यांतील तत्व आहे. यज्ञ ह्मणजे ( Sacrifice ) तुह्मी ( Selfsacrifice ) ह्मणजे स्वयज्ञ केला पाहिजे स्वची व्याख्या स्वतः पुरती करू नका; व्यापक करा स्वमध्ये स्वराष्ट्राचा अंतर्भाव करा. 'सहस्रशीर्षः पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात्' असे पूर्वीचे वर्णन आहे. हल्ली सुद्धां सहस्र डोकीं, सहस्र डोळे, सहस्र पाद, इत्यादि एकवटून संघशक्तीने कामे केलीं तर राष्ट्रोन्नतीचे कार्य होईल." यावरून अर्वाचीन जैनेतर विद्वानानाहि यज्ञामध्यें हिंसा करणे ही गोष्ट निंद्य व त्याज्य वाटतें हे सिद्ध होतें.

मधील संवाद होय. जाजलीनें पुष्कळ वर्षेपर्यंत तप केले होते. आणि त्यामुळे तो गर्वाने फार फुगून गेला होता. "तुलाधार जो तुझ्यापेक्षा महान् तपस्वी आहे तो सुद्धां इतका गर्विष्ठ नाही" असे राक्षसांनीं आणि पिशाचानी जाजलीला सांगितले. आणि ह्मणून जाजलि तुलाधाराशी वादविवाद करण्याकरिता ह्मणून काशीला गेला. तुलाधाराने त्याला सांगितले, "हे जाजलि, तू पुष्कळ काळपर्यंत तप केले आहेस, तरी देखील तुला खरा धर्म ह्मणजे काय हे माहित नाही" नंतर त्याने त्याला 'अहिंसा' हाच खरा धर्म आहे असे दाखविले व त्याला सांगितले, "जर तुला ह्याबद्दल संशय वाटत असेल तर तू आपल्या जटेमधील पक्षांना सत्य काय आहे ह्मणून विचार" जाजलीने हा प्रश्न केल्याबरोबर एकदम सर्व पक्षी एक स्वराने ह्मणाले "अहिंसा हें सत्यधर्माचे सार आहे, व अहिंसेपासूनच इहलोकी व परलोकीं चांगले शुभ फळ मिळते. हिंसा करणाऱ्या मनुष्यावरचा सर्व विश्वास उडून जातो व त्याचा लौकरच नाश होतो. जो माणूस कोणत्याहि प्राण्याला त्रास देत नाही तो सर्व प्राण्यापासून निर्भय असतो. परंतु जो माणूस गृहामधील सर्पाप्रमाणे भय दाखवितो त्याला इहलोकीं 'धर्म' मिळत नाही व परलोकीहि नाहीं." पुनः तुलाधाराने सांगितले की, "राजा नहुषाने एका वृषभाचा वध केला होता. पण त्याचा परिणाम असा झाला की त्याच्या राज्यामधील सर्व ऋषींना दुःख सोसावें लागले. हिंसेमुळे त्या ऋषींवर एकशे एक अरिष्टे गुदरलीं होतीं; तीं या ऋषींनी दूर करून ह्या जगामध्यें त्याचा रोगरूपाने फैलाव केला. जीवहिंसेचा परिणाम खरोखर फारच भयानक होतो!"

ह्या संवादावर टीका करिताना नीलकंठ असे लिहितो, 'वामदेव हा संकटकाळीं कुत्र्याचे मांस भक्षण करण्यास हरकत नाही असे प्रतिपादन करीत असे. त्या वामदेवाच्या विरुद्ध ज्या ऋषभदेवाने दया-

मय जैनधर्माचा उपदेश केला त्या ऋषभदेवाच्या सच्चारित्राने आर्हत् अर्थात् जैनीलोक मोहून गेले.

**आवर्त्याशुनआन्त्राणि पेचे यः पूजयितुं पितृदेवमनुष्यान् ये च आन्त्राणि शुनः इति श्रुतिस्मृतिभ्यां वामदेवस्य श्रेष्ठतमस्यापि बीभत्स आचार आपदिश्वमांसभक्षणरूपः प्रदर्शितः ॥**

**पुराणे वा—ऋषभादीनां महायोगीनामाचारं दृष्ट्वा आर्हतादयो मोहिताः पाखण्डमार्गमनुगता इत्युक्तम् ॥**

**अर्थः**— कुत्र्याचें मास शिजविले. अर्थात् वामदेवानें मनुष्याच्या क्षुधाशमनार्थ कुत्र्याचीं आतडीं शिजवून तयार केली. श्रुति-स्मृतीमधून अति श्रेष्ठ अशा वामदेवऋषींच्या हातून आपत्तीच्या वेळी कुत्र्याचे मासभक्षण करण्याचे अतीशय निंद्य असे आचरण झाले हे दाखविले आहे. अथवा पुराणांमध्ये, " ऋषभादिक महायोग्यांचें आचरण पाहून आर्हतादि ( जैनादि ) लोक मोहित झाले व पाखडमताचा स्वीकार केला " असेहि लिहिले आहे. येथेच नीलकंठ एका स्मृतीचा आधार दाखवून ह्मणतो--

**महोक्षं वा महाजं वा श्रोत्रियायोपकल्पयेत् ॥**

**अर्थ**·— आपण वैदिक ब्राह्मणाच्या सन्मानाप्रीत्यर्थ ह्मणून एका मोठ्या बैलाचा अथवा बोकडाचा बलि द्यावा. आणखी एका श्रुतीचा आधार देऊन ह्मणतो.

**मागामनागामदितिंवधिष्टाः ।**

**अर्थः**— निरपराधी धेनूची हिंसा करू नका. येथे नीलकंठ ह्मणतो कीं, स्मृतीपेक्षा श्रुति बलवान् आहे, कारण श्रुतीमध्यें "निरपराधी" शब्द आला आहे. असो. हिंदुधर्मशास्त्रात अहिंसेचे मण्डन केलेलेच ठिकठिकाणी आढळून येते उदाहरणार्थ·—एकदा अर्जुनाने श्रीकृष्णाला 'ज्ञान ह्मणजे काय' ह्मणून प्रश्न विचारला. श्रीकृष्ण ह्मणाले·—अमानित्व, अदंभित्व, **अहिंसा**, क्षांति व आर्जव ( सरळपणा ), यातच

ज्ञान समाविष्ट होते. यात 'अहिंसा' हाहि शब्द आहे. यावरून हिंदु-धर्मशास्त्रातहि अहिंसेला कमी महत्व दिलें नाही ही गोष्ट सिद्ध होतें.

## चार्वाकदर्शन.

चार्वाकहि जीवहिंसेच्या विरुद्ध होते. कारण ते असा उपदेश करीत असत की,

**पशुश्चेन्निहतः स्वर्गे ज्योतिष्टोमे गमिष्यति ॥**
**स्वपिता यजमानेन तत्र कस्मान्नहिंस्यते ॥ १ ॥**

**अर्थः**—ज्योतिष्टोमयज्ञामध्ये वध केलेला पशू जर स्वत स्वर्गाला जातो तर यजमान ( यज्ञ करणारा ) आपल्या बापाचा बलि का देत नाही? पुन. तो असे ह्मणतो,

**मांसानां स्वादनं तद्वन्निशाचरसमीरिणम् ।**

**अर्थ**—आणि अशाच रीतीने मास भक्षण करण्याची आज्ञा निशाचरांनी दिली होती.

प्राचीन भरतखंडातील वैदिक धर्माचा इतिहास मोठमोठ्या विद्वानानी लिहिला आहे. परतु त्यापैकी एकानेंहि वैदिक धर्माशिवाय इतर धर्माच्या–विशेषत. जे धर्म,

**" मा हिंस्यात् सर्वभूतानि । "**

'ह्मणजे कोणत्याहि प्राण्याचा वध करू नका' ह्मणून उपदेश करीत असत–अशा धर्माच्या इतिहासाची सामुग्री आजपर्यंत गोळा केली नाही ही मोठी शोचनीय गोष्ट होय! वैदिकधर्माचे व इतर धर्माचे किती सप्रदाय आहेत, तसेच प्रत्येक सप्रदायाच्या अनुयायांची सख्या किती आहे याबद्दलचा इतिहास लिहिण्याकरिता विश्वसनीय अशी माहिती आजपर्यंत कोणीहि मिळविली नाही. पुरातन भरतखंडामध्ये फक्त वैदिक धर्मच प्रचलित होता असे ह्मणणे निवळ असमंजसपणाचें व थोताड आहे. अशा तऱ्हेची अनुमाने काढणे हे सर्वस्वी चुकीचे आहे वैदिकधर्म व वेदविरुद्ध धर्म या दोहोंचाहि समान प्रचार असण्याचा देखील सभव आहे. अथवा वैदिक धर्माच्या

अनुयायांपेक्षां अन्य धर्माच्या अनुयायांची संख्या जास्त नसेल असें तरी कोणी ह्मणावें? चांगला पुरावा मिळाल्याशिवाय अशा तऱ्हेचीं अनुमानें काढण्याचा आपणाला अधिकार पोहोचत नाहीं. हिंदुस्थानामध्ये सध्यां बौद्धधर्माचा प्राय. लोप झाला आहे ही गोष्ट आपणाला माहितच आहे. परंतु एवढ्यावरून भरतखंडामध्ये बौद्धधर्म प्रचलित नव्हता असें अनुमान काढणे योग्य आहे काय? अथवा बौद्धधर्माचा प्रचार हिंदुस्थानच्या एका टोकापासून तो दुसऱ्या टोकापर्यंत कधीहि झाला नाही असे आपणाला ह्मणता येईल काय? खरोखर सध्याच्या काळी भरतखंडामध्ये एकाद्या धर्माचा लोप झाला एवढ्यावरूनच प्राचीनकाळीं सुद्धा तो धर्म प्रचलित नव्हता असे अनुमान काढणें हे अगदीं चुकीचे आहे. बार्हस्पत्याला लोकायत ह्मणतात हे प्रसिद्धच आहे. त्याचा धर्म जरी सध्या बहुतेक नामशेष झाला आहे तरी तो चांगला आहे असे वाटल्यावरून प्राचीन भरतखंडातील बहुजनसमाजानें त्याचा स्वीकार केला असावा असेंहि असण्याचा संभव आहे. प्राचीन भरतखंडांतील वाङ्मय हे स्मृतिसहायभूत होते, ही गोष्ट सर्वश्रुत आहे. त्या वाङ्मयापैकी बरेचसे वाङ्मय नामशेष झाले आहे. बार्हस्पत्यसूत्र एकवेळीं विद्यमान होते तेंहि नष्ट झाले. तसेच दुसऱ्या बऱ्याच संप्रदायाच्या तत्वज्ञानाची ( दर्शनाची ) सूत्रें नाहींशी झालीं आहेत व ह्मणूनच आह्माला त्या संप्रदायाविषयीची काहींएक माहिती नाहीं. पुरातन भरतखंडामधील बरेचशा वैदिकवाङ्मयाचे मात्र हुशार व दक्ष अशा ब्राह्मणानी रक्षण केले आहे. परंतु ज्याअर्थी अन्य संप्रदायाचे वाङ्मय आपणांजवळ आज उपलब्ध नाही व ब्राह्मणाच्या धर्मग्रंथांमध्ये मधून मधून अन्य संप्रदायाविषयी केलेल्या उल्लेखाशिवाय आपणाला त्या संप्रदायाविषयीची कांहींएक माहिती नाही त्याअर्थी प्राचीनकाळी त्या संप्रदायाचा कितपत प्रचार झाला होता ह्यासंबधानें आपण आपली मते उतावीळपणाने एकदम प्रतिपादन करणे चुकीचे होईल. आह्माला आमच्या स्वतःच्याच उदाहरणावरून ही गोष्ट माहित आहे कीं

जैनशास्त्रें ही अशोकराजा होऊन गेल्यानतर लिहिलीं गेलीं आहेत. परतु आमचें तोंडी वाङ्मय (जे कठगत केले होते) हे फार प्राचीन-काळापासून अस्तित्वात होते ह्यात मुळीच सन्देह नाहीं. जैनानीं आपल्या प्राचीन वाङ्मयाचे रक्षण करण्यांत ब्राह्मणाइतकी दक्षता दाखविली नाहीं. व ह्यामुळेच जैनाचे प्राचीन वाङ्मय बरेचसे नष्ट झाले आहे. अथवा ज्या शास्त्रांच्या योगाने आह्मांला आमच्या प्राचीन इतिहासाचे ज्ञान होईल अशा शास्त्राचा आह्मी अद्याप शोध लाविला नाहीं हीहि गोष्ट आमचे वाङ्मय अज्ञातावस्थेत राहण्याचे कारण आहे. पूर्वीपासून आपल्या इकडे इतिहास लिहून ठेवण्याची बहिवाट व हौस नसल्यामुळे आजपर्यंतच्या अनतकाळाचा इतिहास व वाङ्मय, गेलेल्या काळाबरोबरच विलयाला जाऊन त्या काळचे ज्ञान मात्र कायते नाममात्रावशेष राहिले आहे, ही स्थिती पाहून इतिहासप्रिय व प्राचीन ज्ञानलालसजन फार दु:खी होतात. असो त्यास आता इलाज नाही. शिवाय आमच्या लोकासहि ग्रथ प्रसिद्धीचा अथवा पुरातन इतिहासवाचनाचा व शोधनाचा फारसा छद नाही होहे आमचा प्राचीन ज्ञानभाडार अज्ञानावस्थेत राहण्याचे कारण आहे. परतु आमची शास्त्रें अशोक होऊन गेल्यानतर लिहिली एवढ्याच कारणावरून ज्या वाङ्मयाच्या सहाय्यानें जैनशास्त्रे लिहिली ते वाङ्मयच जैनाना नव्हते, अथवा जैनाचा इतिहास नाही असें अनुमान काढता येत नाहीं. चतुर्थकालामध्ये—हा काळ महावीरस्वामीच्या मोक्षाच्या समयीं सपला— (इसवीसानापूर्वी ५२६ वर्षे महावीर मोक्षास गेले) ह्मणजे जवळ जवळ २५०० वर्षापूर्वी जैनधर्म हा सध्या ज्या अवस्थेमध्ये आहे त्याहीपेक्षा फारच जोरांत व भरभराटीत होता असें जैनशास्त्रावरून कळते. व ही गोष्ट इतिहासवरूनहि खरी ठरते.

**पूर्वार्ध समाप्त.**

श्रीपरमात्मने नमः

# जैनधर्मादर्श.

## उत्तरार्ध.

## " जैनसिद्धांत "

**मोक्षमार्गस्य नेतारं भेत्तारं कर्मभूभृताम् ॥**
**ज्ञातारं विश्वतत्वानां वंदे तद्गुणलब्धये ॥**

**अर्थ.**— मोक्षमार्गास नेणाऱ्या, कर्मरूपी पर्वताचे भेदन करणाऱ्या, त्रैलोक्यांतील संपूर्ण तत्वांना जाणणाऱ्या, अशा श्रीसिद्धपरमेष्ठीस त्यांचे गुण प्राप्त व्हावेत एतदर्थ मी नमस्कार करून जैनांचे **सिद्धांत** व **तत्वज्ञान** यांचे थोडेसे विवेचन करितो.

### जगत्कर्तृत्वमीमांसा.

जैनलोक ह्मणतात की, हे जग अनादि कालापासून आहे. व ह्याचा कोणी कर्ता नाही. अनंत आकाशाच्या बरोबर मध्यभागी ज्याप्रमाणे एका सबंध मृदंगावर, अर्धा मृदंग ठेविला असतां जो आकार दिसतो त्या आकाराचें हे जग ( लोक ) आहे. हे स्वयंसिद्ध आहे. ह्याला कोणी निर्माणहि केले नाही व ह्याचा कोणी अंत अथवा लय करणाराहि नाही. अनादि कालापासून असेंच आहे व असेंच राहिलहि. जीव वगैरे पदार्थांस आश्रय देणें हा त्याचा स्वभाव आहे असे समजावे. ईश्वराला जैनलोक सृष्टीचा कर्ता मानीत नाहीत. तरीहि पण ईश्वर कथंचित् सृष्टीचा कर्ता आहे, सर्वथा नाही असे जैनलोक मानतात. परमेश्वरानें मनुष्याला हिताहित काय आहे हे दाखविले आहे. त्याच्या उपजीविकेचे मार्ग शेतकी, व्यापार, कलाकौशल्य, राजधर्म हे कसें चालवावे हे दाखवून दिले आहे. चांगले करणाऱ्यास चांगले फळ मिळेल, वाईट करणाऱ्यास वाईट फळ मिळेल हे समजावून दिले. चांगले व वाईट असे दोन मार्ग दाखविले आहेत. पहिल्या मार्गाने जाल तर मोक्ष मिळेल व दुसऱ्या मार्गाने जाल तर रौरव नरकांत

जाल असें ह्मटले आहे. अशा प्रकारचे सृष्टीचें कर्तृत्व परमेश्वराकडे आहे, व अशा प्रकारे तो सृष्टीचा कर्ता आहे असे जैनधर्मात आहे. परंतु मनुष्य जे काही चागले वाईट करितो ते परमेश्वराच्या इच्छेनेच करतो, चागल्या वाईट गोष्टीचा कर्ता परमेश्वर आहे असे मात्र मानलें नाहीं. कारण असे मानण्याला मोठा विरोध येत आहे. मनुष्याने चोरी केली ती ईश्वराच्या इच्छेमुळे केली अथवा ईश्वरानें त्याला तशी वाईट बुद्धि दिली ह्मणून त्याने केली, व त्यानें चोरी केली ह्मणून त्याला ईश्वराने शिक्षा केली, तेव्हा चोरी करण्याची बुद्धिहि आपणच द्यावी व त्याबद्दल शिक्षाहि आपणच करावी हें केवढे विसगत दिसते? आणि असले विसगत कां? हा परस्पर विरोधीपणा का? ह्मणून प्रश्न केल्यास ईश्वराची लीला अगाध आहे असे ह्मणून कसें तरी समाधान करून घ्यावे लागते. ह्मणून मोठमोठ्या तत्ववेत्त्यानी सर्व कर्तृत्व ईश्वराकडे टाकिले नाहीं. या बाबतींत शास्त्रज्ञात अद्यापपर्यंत एक मत झालें नाही. किंचित् विचार करून पहाल तर आपणाला असे दिसून येईल की, जैनधर्माने जसे ईश्वराचे लक्षण सागितले आहे तशाच प्रकारचे ते असले पाहिजे. हिंदुधर्मातील सर्वश्रेष्ठ अशा भगवद्गीतेमध्येहि असेंच ह्मटले आहे:—

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ॥**
**न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १ ॥**
**नादत्ते कस्यचित्पापं न कस्य सुकृतं विभुः ॥**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जंतवः ॥ १५ ॥**

—( अध्याय ५ श्लोक १५ )

**अर्थः**— परमेश्वर जनाचे कर्तव्य व कर्मे ही उत्पन्न करीत नाही. व त्याच्या फळाची योजनाहि तो करित नाहीं. पण स्वभाव ह्मणून जो आहे तो प्रवृत्त होतो. परमेश्वर कोणाचे पाप घेत नाहीं. व कोणाचे पुण्यहि घेत नाहीं. ज्ञानावर अज्ञानाचे आवरण ( झाकण ) पडले आहे त्यामुळे प्राणी मोहित होतात. पाऊस आणणे, आईच्या

स्तनात दूध उत्पन्न करणे, अग्नीला उष्ण ठेवणे, सूर्याला प्रकाशमान करणे, इत्यादि गोष्टी ईश्वरकृतीच्या नसून वस्तुस्वभावाच्याच आहेत. कारण ह्या वस्तु ईश्वरकृतीच्या मानल्या तर दुष्काळ पाडणे, प्लेग आणणे, जलप्रळय करणे, धरणीकंप करणे ही वाईट कार्येहि ईश्वरकृतीचीच मानावी लागतील. व त्यामुळे ईश्वराच्या ठायीं मोठे दूषण लावल्यासारखे होईल. हिंदूच्या वेदांतविषयांत चांगल्या गोष्टीला कारण सत्वगुण व वाईट गोष्टीला कारण तमोगुण सांगितला आहे. तसेंच मुसलमान व ख्रिश्चन वाईट गोष्टीचा कर्ता सैतान आहे असे ह्मणतात, आणि चांगल्या गोष्टी मात्र ईश्वर करतो असे ह्मणतात. ईश्वराला सर्व अनंतगुणी ह्मणून ह्मणतात. परंतु अनंतदोषी कोणी ह्मणत नाही. प्रसिद्ध तत्ववेत्ता **प्लेटो** यानेहि ह्मटले आहे:—

It is impossible that evils should Proceed from the gods,

( प्लेटोचे रिपब्लीक पान १७६ ) एकंदरीत सर्व कर्तृत्व ईश्वराच्या ठिकाणी कोणीच देत नाहीत. तसेच जैनहि देत नाहीत. पापपुण्याचे फळ सांगणें व दाखवून देणे इतके काम ईश्वराच्या हातानें स्वभावतः होतें. परंतु ते फळ तो स्वतः देतो असे मात्र मानले नाहीं. जैनधर्माचे तीर्थंकर हे पापपुण्याची फळे अशी अशी आहेत असे सांगतात, उपदेश करितात, परंतु स्वतः देत नाहीत. ग्रीस देशातील प्रख्यात तत्ववेत्ता अरिस्टॉटल हाहि सृष्टीचे कर्तृत्व ईश्वराकडे नाही असेच ह्मणतो.——

Not taking cognizance of, & not regarding the affairs of the world, which owed not its existence to Him, & to which His presence & influence do not extend

**अर्थः**— सृष्टीच्या अस्तित्वाकडे ईश्वराचा संबंध नसल्यामुळे तो सृष्टीतील घडामोडीमध्यें लक्ष घालीत नाही आणि त्याची चौकशीहि करीत नाही. आणि सृष्टींतील कारभारांत तो आपली हजरी व शक्तिही वापरीत नाही.

प्लेटोअरिस्टॉटलादि तत्ववेत्त्याचे अभिप्रायाप्रमाणे पाहिले तर ईश्वराकडे सृष्टीचे कर्तृत्व जाते किंवा नाही ह्यासंबंधाचे जैनाचे ह्मणणेच सयुक्तिक व योग्य आहे असें दिसून येईल. **महापुराणां**तील ४ थ्या पर्वात ह्मटले आहे.

**निर्माणकर्म निर्मातृकौशलापादितोदयम् ।**
**अंगोपांगादि वैचित्र्यमंगिनां संगिरामहे ॥ ३५ ॥**
**तदेत्कर्मवैचित्र्याद्भवन्नानात्मकं जगत् ।**
**विश्वकर्माणमात्मानं साधयेत्कर्म सारथिम् ॥ ३६ ॥**

**अर्थः**—कर्मरूपी निर्माणकर्त्यांच्या शहाणपणाने सृष्टि निर्माण करण्याची क्रिया उत्पन्न होते. तेणेकरून प्राण्याची शरीरे लहान-मोठी व अनेक प्रकारच्या आकृतींची होतात असे आह्मी ह्मणतो. कर्माच्या विचित्रपणामुळे जग हे अनेक प्रकारच्या स्वरूपाचे आहे, आणि 'कर्माचा कर्ता आत्मा आहे,' व आत्मा विश्वकर्मा ( जगाचा कर्ता ) होय असे सिद्ध होते. याप्रमाणे जैनागमात जी जगकर्तृत्वमीमांसा केली आहे त्याचे संक्षेपत वर्णन केले. आता या सृष्टीचे **लोक** व **अलोक** असे दोन भेद आहेत. उर्ध्वलोक अथवा स्वर्ग, मध्यलोक अथवा पृथ्वी, पाताललोक अथवा नरक असे लोकाचे तीन भेद आहेत. ह्या लोकामध्ये **जीव** व **अजीव** अशी दोन द्रव्ये आहेत

**अवस्थान्तरं द्रवतीति ( गच्छतीति ) 'द्रव्यम्'**

**अर्थः**— रूपातराला प्राप्त होते ते द्रव्य. अनंत गुणांच्या समुदायाला 'द्रव्य' अशी संज्ञा आहे. अर्थात प्रत्येक द्रव्यामध्ये अनंत गुण असतात.

**सत् द्रव्यलक्षणम् । उत्पादव्ययध्रौव्ययुक्तं सत् ॥**

उत्पाद, व्यय व ध्रौव्यगुण यानी जे युक्त ते **द्रव्य** होय. ज्याचा कधीहि नाश होत नाही त्याला **ध्रौव्य** ह्मणावे. प्रत्येक द्रव्य हानि व वृद्धीसहित आहे. तेव्हां हानीला **व्यय** व वृद्धीला **उत्पाद** ह्मणतात. आता 'जीव' द्रव्याचे वर्णन करितो.

## जीवतत्व.

**चेतनालक्षणो जीवः स च ज्ञानादिभेदात् अनेकधा भिद्यते**

'जे चैतन्य स्वभाव आहे ते जीवद्रव्य होय' असे जीवतत्वाचे लक्षण दिले आहे. ह्मणजे ज्या चैतन्यगुणाचे ज्ञान, दर्शन वगैरे अनेक भेद करिता येतात असा चैतन्यगुण ज्या पदार्थामध्ये आहे तो जीवपदार्थ होय. जीवद्रव्यात ज्ञान, दर्शन, सुख, वीर्य हे चार विशेष गुण आहेत; याच चार गुणाला सामान्येकरून चैतन्य ह्मणतात. **द्रव्यसंग्रहामध्यें** जीवद्रव्यासबधाने असे सागितले आहे—

**जीवो उवओगमओ अमुत्ति कत्ता सदेह परिमाणो ॥**
**भुत्ता संसारत्थो सिद्धो सो विस्ससोढ्ढगई ॥ २ ॥**

**अर्थः**— (१) ज्याला चेतना आहे तो जीव. तो, (२) उपयोगमय, (३) अमूर्ति[१], (४) कर्माचा कर्ता, (५) सदेहपरिमाण (ज्या ज्या जन्मांत जितक्या प्रमाणाचा देह प्राप्त होतो त्याच प्रमाणाने मोठा व लहान असणारा) (६) कर्माची शुभाशुभ फळे भोगणारा, (७) ससारी ह्मणजे त्रस व स्थावर इत्यादि पर्याय धारण करून ससारात फिरणारा, (८) सगळ्या कर्माचा समूळ नाश झाल्यावर सिद्ध होणारा, (९) आणि सिद्ध झाल्यावर स्वभावानेच ऊर्ध्व ह्मणजे त्रैलोक्य शिखरापर्यंत गमन करणारा असा आहे. अशी जीवाची मुख्यत्वेकरून नऊ विशेषणे आहेत. ह्मणजे जीवद्रव्य हे बाह्याभ्यतरप्राणानी जगणारे ज्ञानदर्शनउपयोगस्वरूप, वर्ण, रस, गध, स्पर्श हे गुण नसल्यामुळे अमूर्त, आपण केलेली कर्माची फळे अनुभविणारे, कर्मोदयाच्या योगाने चतुर्गति भ्रमणरूप ससारावस्थेत असणारे, रत्नत्रयाच्या उत्कर्षाने कर्माचा विप्रमोक्ष (नाश) होऊन उत्पन्न झालेल्या सिद्धावस्थेत असलेले, स्वभावत च उर्ध्वगमन करणारे अशा लक्षणाचे आहे. जीव हा ज्ञानदर्शनगुणांनी युक्त आहे असे सागण्याने जीव निर्गुण आहे ह्मणून सांगणाऱ्या साख्य व नैय्यायिक मताचे खडण

१ पुद्गलाचे असे काही मूर्त (Material figure) स्वरूप नाहीं.

झाले. पृथ्वी, जल, वायु ह्या चार भूतांचा संयोग होऊन झालेला जो शरीररूप परिणाम हेच चैतन्य असे प्रतिपादन करणाऱ्या भूतवाद्याच्या मताचें खडण करण्याकरिता जीव हा अमूर्त ह्मणजे शरीररहित आहे, असे सांगितले आहे. जीव हा कर्ता नव्हे ह्मणून सांख्य मताचे ह्मणणे आहे ती भ्राति दूर होण्याकरिता जीव हा शुभाशुभ भावाचा कर्ता आहे असे सागितले आहे. जीव हा सर्वव्यापी आहे ह्मणून साख्य, नैय्यायिक, वेदातो याचे ह्मणणे आहे, तें चुकीचे आहे असे दाखविण्याकरितां जीव प्राप्त झालेल्या देहाच्या परिमाणाचा आहे असे ह्मटले आहे. जीव हा आपण केलेल्या शुभाशुभ कर्माची फळे भोगीत नाही असे बौद्धांचे ह्मणणे आहे. त्याच्या खडणाकरितां जीव हा भोक्ता आहे असे सागितले आहे. तसेच ईश्वर क्रोधायमान झाला ह्मणणे आपणास नरक प्राप्त होतो आणि सतुष्ट झाला ह्मणणें स्वर्गादिसुखे प्राप्त होतात असे वैशेषिकाचे ह्मणणे आहे. त्याच्या खडणाकरिता भोक्ता ह्मणून सागितले आहे. जीव सदा परिशुद्ध आहे असे सदाशिवमताचे ह्मणणें आहे; ते खोटे ठरविण्याकरिता जीव ससारस्थ ह्मणून सांगितले आहे जीवाला केव्हाहि मुक्ति नाही असे मीमासकाचें ह्मणणे आहे आणि आत्मा क्षणिक आहे असे बौद्धाचे मत आहे; त्या दोघांच्या खडणाकरिता आत्मा कर्मक्षयाने मुक्त होतो असे सागितले आहे. "**यत्रैव मुक्तस्तत्रैव तिष्ठति**" ह्मणजे जेथे मुक्त झाला तेथेच राहतो, असें मडलिकाचे ह्मणणे आहे; त्याच्या निरसनार्थ आत्मा उर्ध्वगमन स्वभावाचा आहे असे सांगितले आहे. पुढे प्राणाच्या अपेक्षेने जीवाचें लक्षण सागितले आहे.

**तिक्काले बदुपाणा इंद्रिय बलमाऊ आणपाणा य ॥**
**ववहारा सो जीवो णिच्चयणयदो दु चेदणा जस्स ॥**

**अर्थः**—व्यवहारनयाच्या अपेक्षेने ज्याला इंद्रिय, बळ, आयुष्य आणि श्वासोच्छ्वास हे चार प्राण आहेत तो जीव होय. व निश्चयनयाच्या अपेक्षेने ज्याला चेतना ( स्वस्वरूप आणि परस्वरूप यांचे

ज्ञान ) आहे तो जीव होय. ह्याचें सविस्तर वर्णन द्रव्यसंग्रहामधून पहावें. पुढें जीव हा अनादि कालापासून आहे. कधी ह्याचा नाश होत नाहीं. असें जैनागमांत सांगितले आहे. यासंबंधाने एक कवी ह्मणतो.—

**चौपाई.**

**बालक मुख मैथुन को लेय । दावे अंचे दूध पिवेय ॥**
**जो अनादि को जीव न होय । सीखबिना क्यो जाने सोय ॥**
**मरके भूत होत जे जीव । पिछली बातें कहें सदीव ॥**
**सिरचढि बोलनिज घर आय । ताते हंस अमर ठहराय ॥**

**अर्थः**— लहान मुलें जन्मतांच आपल्या आईला ओळखून स्तनपान करूं लागतात, शरीराला दुःख झाल्याबरोबर रडण्यास सुरवात करितात, व दुसरे काही जीव मरून भूतादिक नीच देव होतात व कोणाच्या डोक्यावर चढून मागील गोष्टी सांगू लागतात, इत्यादि गोष्टीवरून ही गोष्ट सिद्ध होते की, जीव हा अनादि, अनन्त, अविनाशी, पुद्गलाहून भिन्न अशी एक अमूर्तिक वस्तु आहे. मूर्तिकपुद्गलाचा व जीवाचा वस्तुतः काहीएक संबंध नाहीं. ह्या जीवाचे लक्षण जाणणे व पहाणे आहे. परंतु संसारी जीवाला ज्ञान दर्शन इत्यादि स्वभावाचे स्वरूप फार कमी कळते. व ह्मणूनच संसारी जीवाला जाणण्याची शक्ति, पांच इंद्रिये व मन ह्यांच्या सहाय्याने येते. जसे एकाद्या व्यक्तीची दृष्टि कमी ( Short sight ) असली ह्मणजे चष्मा लावण्याची आवश्यकता असते तसेच जोपर्यंत जाणण्याचा स्वभाव निर्मल नाही तोपर्यंत जाणण्याकरिता ह्मणून सहाय्यतेची जरूरी आहे. येथे कदाचित् अशी शंका येईल कीं, जीव ह्मणजे वस्तूचे स्वरूप जाणणे असे आहे तर सहाय्यतेची काय आवश्यकता आहे ? त्याचे असे उत्तर आहे की, संसारीजीवाचा स्वभाव अनादिकालापासून काही प्रकारच्या मलानी ( आवरणानी ) आच्छादित आहे; व त्यामुळे त्याचीं स्वाभाविककार्ये होण्यात अडथळा येतो अथवा तो मल ( आवरण ) अनादि कालापासून आपल्या आत्मज्योतीला प्रगट होऊं देत नाही. असो.

जीवाचे दोन भेद आहेत. मुक्त व ससारी. दोनहि प्रकारचे जीव चेतन असून उपयोगवान् आहेत. जे जीव कर्मबंधनाला तोडून त्रैलोक्याच्या अग्रभागीं शाश्वत, अविनाशी सुखाचा अनुभव घेतात त्याला 'मुक्त' अथवा 'सिद्ध' ह्मणतात. **अशरीरा अनन्तचतुष्टयान्विता निवृत्ताः सिद्धाः** ह्मणजे शरीररहित, अनतदर्शनज्ञानवीर्यसुखानी युक्त व जन्म जरामरणरहित असे जे ते **सिद्ध** होत. व जे जीव दु:खरूपी ससारामध्ये मिथ्यात्वाच्या योगाने परिभ्रमण करितात त्याला ससारी (बद्ध) ह्मणतात. ससारी जीव देहधारण करून ससार करणारे आहेत. ससारी जीवांना **अशुद्धजीव** व मुक्त जीवाना **शुद्धजीव** असेहि ह्मणतात. जे मुक्त जीव आहेत त्यांना आठ मूलगुणांची प्राप्ति झाली असल्याने त्यांनीं आठ प्रकारच्या कर्माचा नाश केलेला असतो, आणि त्याना त्रैलोक्याचें ज्ञान होत असून ते ह्या त्रैलोक्याच्या अग्रभागीं रहात असतात. ससारी जीवाचे दोन भेद आहेत. त्रस व स्थावर. त्यामध्ये शख वगैरे द्वीद्रिय–जीव, मुगी, ढेकूण, वगैरे त्रीद्रियजीव, भ्रमर वगैरे चतुरिंद्रिय जीव; आणि मनुष्य वगैरे पचेद्रिय जीव हे सगळे त्रस ससारी जीव होत. ज्याला कमीतकमी ४ प्राण व जास्तीत जास्त १० प्राण असतात त्याला जीव ह्मणतात. एक इद्रिय असणाऱ्या जीवाला चार प्राण असतात– स्पर्शेंद्रिय, शरीराचे बल, आयु व श्वासोच्छ्वास हे होत. द्वींद्रियजीवाला सहा प्राण असतात– वर सागितलेले चार प्राण व रसना इद्रिय आणि वचनबल हें जास्त असते. त्रीद्रिय जीवाला सात प्राण असतात–एक घ्राणेद्रिय जास्त असते. चतुरिंद्रीय जीवाला आठ प्राण असतात– एक चक्षुरिंद्रिय जास्त असते. पचेद्रिय जीवाचे **समनस्क** (सज्ञी अथवा मनसाहित) व **अमनस्क** (असज्ञी अथवा मनरहित) असे दोन भेद आहेत. यालाच सैनी व असैनी असेंहि अनुक्रमाने ह्मणतात. व समनस्क जीवाचे देव, मनुष्य, तिर्यच व नारकी असे चार भेद आहेत. त्यामध्ये देवाचे भवनवासी, व्यतर, ज्योतिषी, व कल्पवासी असे चार भेद आहेत. मनुष्यामध्ये आर्य व म्लेंछ असे दोन

भेद आहेत. नारकी जीवाचे सात भेद आहेत आणि तिर्यंचाचे जलचर, थलचर व नभचर असे तीन भेद आहेत. बादर व सूक्ष्म असे एकेंद्रिय, द्वींद्रिय, त्रींद्रिय, आणि चतुरींद्रिय हे सगळे जीव अमनस्क ( असज्ञी ) होत. मनरहित पचेंद्रिय जीवाला ९ प्राण असतात. ह्मणजे वरचे आठ प्राण असून एक कर्णेद्रिय जास्त असते. मनसहित पचेंद्रिय जीवाला १० प्राण असतात. आणि फक्त एक मनोबल जास्त असते. एकेंद्रिय जीवाला स्थावर म्हणतात. पृथ्वीकाय, अप्काय, तेजस्काय, वायुकाय आणि वनस्पतिकाय वगैरे अनेक प्रकारचे जे एकेंद्रिय जीव ते स्थावर ससारी जीव होत. जीवविपाकी स्थावरनामकर्माच्या उदयानें स्थावरजीव होतात. याना एक स्पर्शेद्रियच असते. व दहा प्राणापैकी फक्त याना, इंद्रियप्राण, कायबलप्राण, श्वासोच्छ्वासप्राण, आणि आयुप्राण असे चार प्राण असतात.

उपयोगहि एक जीवाचे लक्षण आहे. **जीवाचें लक्षणरूप जें चैतन्य त्याचें अनुमान ज्या ( क्रियेनें ) परिणामानें होऊं शकतें त्यास ' उपयोग '** असे ह्मणतात. जीव हा जाणणे आणि पहाणे ह्या क्रिया करतो. तो सर्व प्रकारच्या सुखाची इच्छा करतो. दुःखापासून भय पावतो. आपले हित किंवा अहित करितो. आणि त्याची फलेहि भोगतो. जीवाचा जो जाणण्याचा स्वभाव ज्ञान आहे त्याचे पाच भेद आहेत. ते मतिज्ञान, श्रुतिज्ञान, अवधिज्ञान, मन:पर्यय ज्ञान व केवलज्ञान. जे पाच इंद्रिये आणि मन यांचेयोगाने पदार्थाला जाणते त्यास **मतिज्ञान** ह्मणतात. मतिज्ञानाने जाणलेल्या पदार्थाच्या सहाय्याने त्याच पदार्थाचे भेद अथवा अन्य पदार्थाना जाणणारे जे त्यास **श्रुतज्ञान** ह्मणतात. मतिज्ञान व श्रुतज्ञान हें एकेंद्रिय जीवापासून मनसहित पचेंद्रिय जीवापर्यंत सर्व जीवांला कमीजास्त प्रमाणाने होतें. द्रव्य, क्षेत्र, काल व भाव याच्या कांही विशिष्ट मर्यादेत रूपी पदार्थाला प्रत्यक्ष जाणणारे जे ज्ञान त्यास **अवधिज्ञान** ह्मणतात. अवधिज्ञान जन्मत:च देव, नारकी व तीर्थंकर याना होतें. परतु इत-

रांना ते प्राप्त करून घेण्याकरिता आत्मध्यान करावे लागते. द्रव्य, क्षेत्र, काल, भाव याना अनुसरून दुसऱ्याच्या मनामध्ये असणाऱ्या रूपी पदार्थाला प्रत्यक्ष जाणणारे जे त्यांस **मनःपर्ययज्ञान** ह्मणतात. व सपूर्ण द्रव्य कालक्षेत्रभावाला, व भूत, भविष्य, व वर्तमान या तिन्ही कालांत होणाऱ्या द्रव्याच्या सपूर्ण पर्यायाला एकाच वेळीं प्रत्यक्ष जे जाणणें त्यास **केवलज्ञान** ह्मणतात. ह्मणजे केवलज्ञान ज्यावेळीं जीवाला होते त्यावेळी जीव स्वतः दुसऱ्या कशाचीहि मदत न घेतां सपूर्ण पर्यायाला एकाच वेळी प्रत्यक्ष जाणतो. अवधिज्ञान व मनः-पर्यय होणाऱ्या जीवाला जाणण्याच्या शक्तीमध्यें थोडीशी मदत व वस्तु याची अवश्यकता आहे. मनःपर्ययज्ञान व केवलज्ञान हीं आत्म-ध्यान केल्यानेंच जीवाला साध्य होतात. एका जीवाला कमीत कमी एक व जास्तींत जास्त चार ज्ञाने होऊ शकतात. एका जीवाला एक ज्ञान प्राप्त झाले तर तें केवलज्ञानच, दोन झालीं तर मतिज्ञान व श्रुतज्ञान, तीन झालीं तर मति, श्रुति, अवधि किंवा मनःपर्यय व चार झाली तर मति, श्रुति, अवधि व मनःपर्यय, अशीं होतात. येथपर्य-त जीवाचा स्वभाव जे ज्ञान याचे सक्षेपतः वर्णन झाले. सर्व जीवांमध्ये मनुष्य हाच सर्वात महत्वाचा प्राणी आहे. **अमितगति** आचार्य आ-पल्या **श्रावकाचारांत** ह्मणतात— **'भवेषु मानुष्यभवः प्रधानम्'** सर्व भवामध्ये मनुष्यभव श्रेष्ठ आहे. कारण त्यालाच फक्त निर्वाण ( मोक्ष ) मिळू शकतो. देवालाहि मोक्ष मिळत नाहीं कारण त्याला स्वर्गा-तील सर्वश्रेष्ठ 'जिन' अथवा अर्हत यांसारखे होऊन मोक्ष मिळण्या-करितां मनुष्य कोटीमध्येच जन्म घ्यावा लागतो. ह्मणून प्रत्येकनें या नरदेहाचें सार्थक्य करण्याचा प्रयत्न करावा. येथपर्यंत जीवतत्वाचें वर्णन केलें. आतां 'अजीव' तत्वाचें वर्णन करितो—

## अजीवतत्व.

**सुखदुःखज्ञानं वा हितपरिकर्म चाहितभीरुत्वम् ।**
**यस्य न विद्यते नित्यं तं श्रमणा विन्दन्त्यजीवम् ॥**

**अर्थः**— सुखदुःखांचे ज्ञान किंवा हिताविषयीं प्रवृत्ति आणि अहितापासून भीति हीं लक्षणे ज्याला कधींच असत नाहींत तें अजीवद्रव्य होय असें गणधरमुनि मानतात. जो चेतनागुणविशिष्ट असेल त्यास जीव ह्मणतात. आणि जो चैतन्यगुणरहित अर्थात् अचेतन असेल त्यास अजीव ह्मणतात. जो जीव नाही—ह्मणजे जीवाच्या लक्षणाच्या विपरीत ( भिन्न ) ज्याचे लक्षण आहे—तो अजीव. अर्थात् ज्या वस्तूमध्ये स्वयचैतन्य ह्मणजे पाहण्याची व समजण्याची शक्ति नाही ते अजीवद्रव्य. ह्या अचेतनलक्षणविशिष्ट अजीवाचे पुद्गल, धर्म, अधर्म, आकाश, व काल असे पाच भेद केले आहेत. ह्यामध्यें जीवद्रव्य मिळविले ह्मणजे सहा द्रव्ये होतात. हा लोक सर्वत्र सहा द्रव्यानीं भरलेला आहे. तीं सहा द्रव्ये ह्मणजे वर सांगितलेली पाच अजीव व एक जीवद्रव्य. ह्या पाच द्रव्यांमध्यें धर्म, अधर्म, आकाश व काल हे चार पदार्थ अमूर्तिक निष्क्रिय व नित्य आहेत. फक्त पुद्गल तेवढे रूपी अर्थात् मूर्तिक व सक्रिय अथवा क्रियायुक्त आहे. धर्म, अधर्म, आकाश, काल आणि पुद्गल हे पाच पदार्थ उपयोगरहित ( ज्ञानदर्शनशून्य ) असल्याने अजीवपदार्थ आहेत. पुद्गल ह्मणजे जड परमाणु व परमाणूचे स्कध.

**स्पर्शरसगन्धवर्णवन्तः पुद्गलाः ॥** —( तत्वार्थसूत्र )

स्पर्श, रस, गंध, वर्ण ज्याला असतें ते पुद्गलद्रव्य जाणावें. व त्या चार गुणाला सामान्यतः मूर्तत्व ह्मणतात. आकाश, काल, पुद्गल, धर्म व अधर्म ह्या द्रव्यांच्या ठिकाणीं जीवद्रव्याचे गुण नाहीत. कारण आकाशादि द्रव्ये अचेतन आहेत. व जीवद्रव्ये चेतन आहेत. ह्मणून हीं अजीवद्रव्ये समजावीत. पुद्गल हे अणु आणि स्कध असे दोन प्रकारचें असून, जीवाच्या ठिकाणीं जीवित, मरणें, सुख व दुःख हे विकार उत्पन्न करणारे आहे. जीवपदार्थ जोपर्यंत अजीवाशीं ह्मणजे शरीरादिकें जड पदार्थांशी एकत्रपणे राहतो, तोंपर्यंत त्याला मोक्ष प्राप्त होत नाहीं. संसारांत जोपर्यंत जीव भ्रमण करीत आहे तो-

पर्यंत तो अजीव ह्मणजे जड पदार्थाशी सहवर्तमान वागत असतो. तरी तो त्याच्याशीं मिसळून एकवट होत नाहीं. जसे, सोने अन्य धातूशी मिसळले तरी त्याचा सोनेपणा नेहमी वेगळाच असतो. तसेच जीव व अजीव एके ठिकाणीं असले तरी ते आपापल्या वेगवेगळ्या गुणपर्यायांनी वेगळेच असतात. आता धर्मद्रव्याचे स्वरूप काय आहे हे पाहू.

### धर्मद्रव्य.

धर्म व अधर्म द्रव्याचें निरूपण करण्याचे पूर्वी येथें हें सागणे अवश्यक आहे कीं, जगात धर्म आणि अधर्म या शब्दावरून सामान्यत: पुण्य व पाप असा अर्थ समजण्याची रूढि आहे, परतु या ठिकाणीं तो अर्थ नाही. येथे धर्म व अधर्म हे शब्द द्रव्यवाचक आहेत, गुणवाचक नाहीत. पुण्य आणि पाप हे आत्म्याचे विशेष परिणाम आहेत. अथवा ' जो जीवाला ससारातील दु खापासून सोडवून मोक्षसुख प्राप्त करून देतो तो धर्म व याहून उलट तो अधर्म ' असाहि अर्थ समजू नये. कारण हेहि जीवाचे परिणाम विशेष आहेत. येथे धर्म व अधर्म हे शब्द दोन अचेतन द्रव्याचे वाचक आहेत. व हे दोन्ही तिळातील तेलाप्रमाणे सर्व लोकात व्यापून आहेत. धर्मद्रव्याचे स्वरूप **श्रीमत्कुंदकुंदाचार्य**स्वामींनी याप्रमाणे केले आहे —

### गाथा.

**धम्मत्थिकायमरसं अवण्णगंधं असद्दमप्फासं ।**
**लोगोगाढं पुट्ठं पिदुलमसंखादि य पदेसं ॥ १ ॥**
**अगुरुगलघुगेहिं सया तेहिं अणंतेहि परिणदं णिच्चं ।**
**गदि किरियाजुत्ताणं कारणभूदं सयमकज्जम् ॥ २ ॥**
**उदयं जह मच्छाणं गमणाणुग्गहयरं हवदि लोए ।**
**तह जीवपुग्गलाणं धम्मं दव्वं वियाणेहि ॥ ३ ॥**

**अर्थ:**—धर्मास्तिकाय स्पर्शरसगधवर्णरहित आहे. अतएव अमूर्त आहे. सकल लोकाकाशात व्यापून आहे. अखड, विस्तृत, आणि

असंख्यातप्रदेशी असे आहे. षट्स्थानपतितवृद्धिहानिद्वारा अगुरुलघु-गुणाच्या अविभागप्रतिच्छेदाच्या हीनाधिकतेनें उत्पादव्ययस्वरूप आहे. आपल्या स्वरूपापासून च्युत न होण्याने नित्य आहे. गतिक्रियापरिणत जीवपुद्गलाला उदासीनपणे सहाय असण्यानें कारणभूत आहे. स्वत. कोणापासूनहि उत्पन्न झाले नाहीं ह्मणून अकार्य आहे धर्मद्रव्य गति-सहकारी आहे. चन्द्रप्रभकाव्यामध्यें धर्मद्रव्याचे असे वर्णन केले आहे:-

**जलवन्मत्स्ययानस्य तत्र यो गतिकारणम् ।**
**जीवादीनां पदार्थानां स धर्मः परिवर्णितः ॥**

**—( चन्द्रप्रभकाव्यम् )**

**अर्थः**—गतिपरिणत ( गमन करण्यास उद्युक्त झालेला ) जीव आणि पुद्गल यास गमन करण्यास साह्य होते तें **धर्मद्रव्य.** जसे माशाला सचार करण्यास पाणी साह्य करिते तसे. जरी पाणी माशाला सचार करण्याबद्दल प्रेरणा करित नाही तरी पाण्याशिवाय पोहणे शक्य नाहीं. तसेच धर्मद्रव्य प्रेरणा करून जीव व पुद्गल यांला चालवीत नाहीं परतु गमनाला सहायक होते. पाण्यांतील मत्स्यांस गमन करण्याची इच्छा झाली तरच जल सहाय करितें आपण होऊन गमनाविषयीं जबरदस्ती करीत नाहीं त्याप्रमाणे जीवपुद्गलास गमनाची इच्छा होईल तेव्हा धर्मद्रव्य सहायक होते कारण येथे पाणी हे उदासीन कारण आहे. प्रेरक कारण नाहीं. धर्मद्रव्यात गतिहेतुत्व, अधर्मद्रव्यात स्थितिहेतुत्व, आकाशद्रव्यात अवगाहहेतुत्व, आणि काल-द्रव्यात वर्तनाहेतुत्व असें विशेष गुण आहेत.

## अधर्मद्रव्य.

**छायेवघर्मतप्तानामश्वादीनामिव क्षितिः ।**
**द्रव्याणां पुद्गलादीनां अधर्मः स्थितिकारणम् ॥**

**—( धर्मशर्माभ्युदय )**

**अर्थः**— जे जीव पुद्गलांस थाबविण्यास साहाय्यक होते, त्यास **अधर्मद्रव्य** ह्मणतात. जसें, थकलेल्या पाथस्थास व अश्वादिकास मध्य-

तरीं थोडेसें राहवेसे वाटल्यास सावली जशी मदत करिते, त्याप्रमाणे गमन करणाऱ्या जीवपुद्गलांस मध्येंच राहवेसे वाटल्यास सहाय्य करणारे जें ते अधर्मद्रव्य. सावली जशी पथिकांच्या गमनक्रियेस प्रतिबंधक नसून विश्रांतीस मात्र कारण होते, त्याप्रमाणें अधर्मद्रव्य जीवपुद्गलाच्या गमनक्रियेस प्रतिबधक नसून स्थितीस मात्र कारण होते. येथे भूमि हे उदासीन कारण आहे. प्रेरक कारण नाहीं.

## आकाशद्रव्य.

**अवगासदाणजोग्गं जीवादीणं वियाण आयासम् ।**
**जेण्हं लोगागासं अल्लोगागासमिदि दुविहं ॥ १९ ॥**

—( द्रव्यसंग्रह श्लोक १९ )

जीव आणि अजीवद्रव्यास अवकाश देण्यास जे योग्य ह्मणजे समर्थ आहे ते आकाशद्रव्य होय. हे सर्वव्यापी असून अखडित असे एक द्रव्य आहे. यद्यपि सर्वच सूक्ष्म द्रव्ये परस्पर एक दुसऱ्याला अवकाश देत असतात तरी एकाच वेळी ( युगपत ) आकाशद्रव्य सर्वाला अवकाश देणारे आहे. ह्मणूनच आकाशाचा अवकाशदातृत्वधर्म ( ह्मणजे राहण्यास जागा देण्याचा धर्म ) सागितला आहे. आकाश हे सपूर्ण लोकालोकांना व्यापून राहिलेले असून अनतप्रदेशी आहे. जैनमतात लोकाकाश आणि अलोकाकाश अशा भेदांनी तो दोन प्रकारचा सागितला आहे. धर्म, अधर्म, काल, पुद्गल, आणि जीव हीं पांच द्रव्ये जितक्या आकाशात राहतात त्यास लोकाकाश ह्मणतात. त्याच्या पलीकडे अलोकाकाश सांगितला आहे. तो अनत आहे. धर्म आणि अधर्म ही दोन्ही भिन्न भिन्न आणि अखड अशी एकेक द्रव्ये आहेत. हीं दोन्ही तिळामध्ये ज्याप्रमाणे सर्वत्र तेल व्यापून असते त्याप्रमाणे या लोकांत सर्वत्र व्यापून आहेत. जीवद्रव्य अनतानत असून ते सर्व लोकाकाशांत भरलेले आहे. ज्याप्रमाणे एका दिव्याचा उजेड लहान मोठ्या घरामध्यें त्या त्या प्रमाणाचा असतो त्याप्रमाणे हा जीवहि लहान मोठ्या शरीररूपी आधाराच्या निमित्ताने लहान मोठा होऊन राहतो. जीवामध्यें

सकोचविस्ताररूप एक शक्ति आहे. त्या शक्तीचे कर्माच्या निमित्ताने परिणमन होत असतें व त्यामुळेच कर्माचा विप्रमोक्ष ( अत्यत नाश ) झाल्यानतर अर्थात् त्याचा अभाव झाल्यानतर मुक्तजीवामध्यें सकोचविस्तार होत नाही. अतएव मुक्तजीवाचा आकार अतिम शरीराच्या ( जे शरीर सोडून मोक्षास जातात त्याच्या ) समान आहे. प्रत्येक जीव जर पूर्णपणे विस्तार पावेल तर सर्व लोकाकाशाला व्यापून टाकील. अनतानत आकाशाच्या मध्यभागी असणाऱ्या व ज्या ठिकाणी जीवादिक पांच द्रव्यें राहतात अशा भागाला लोकाकाश ह्मणतात. आता कालद्रव्याच्या स्वरूपाचे वर्णन करितो.

### कालद्रव्य.

**दव्वपरिवट्टरूवो जो सो कालो इवेह ववहारो ॥**
**परिणामादीलक्खो वट्टणलक्खोय परमट्ठो ॥ २१ ॥**

—( **द्रव्यसंग्रह** )

जे जीवादिकद्रव्याचे परिणमन करविण्यास सहायभूत असते त्यास **कालद्रव्य** ह्मणावें. जसे, कुभाराच्या चाकाची लोखडाची अणी ( अध शिला अथवा खालील शकू ) ही चाक फिरू लागलें तरच त्यास फिरविण्यास ज्याप्रमाणें सहाय करिते परतु स्थिर असलेल्या चाकास फिरविण्याचे तीत सामर्थ्य नाही त्याप्रमाणे काल हा खिळ्याप्रमाणे उदासीन कारण समजावा. द्रव्याचे पर्याय पालटण्यास कारणीभूत जो समय, घटिका, दिन वगैरे रूपाचा काल तो **व्यवहारकाल** होय. तो व्यवहारकाल परिणाम वगैरेंनी लक्षिला जातो. ह्मणजे परिणाम वगैरे त्याची लक्षणे आहेत गुण व पर्याय यास परिणाम ह्मणतात. किंवा परिणाम ह्मणजे द्रव्याची जीर्ण अवस्था. अथवा वयाने अमक्यापेक्षा अमुक लहान किंवा थोर हा जो परापरत्व भेद यालाहि परिणाम ह्मणतात. वर्तनालक्षण जो काल तो **परमार्थ (निश्चय)** काल होय. **वर्तना लक्षणो कालः** वर्तना ह्मणजे क्रिया. तत्वार्थसूत्रात **वर्तना** शब्दाची व्याख्या दिली आहे. ती अशी " द्रव्याचा प्रत्येक परिणाम होत असताना कालाच्या एका अशाचा सग्रह करून

त्या पर्यायाला आपल्या अस्तित्वाचा ' ह्या वेळीं मी आहें ' असा जो अनुभव त्याला **वर्तना** ह्मणतात. " अर्थात् क्रियेला जो आधार तो परमार्थकाल होय. यालाच मुख्य काल ह्मणतात. सारांश, काल ह्मणजे वस्तूला पालटविणारें व नव्याचे जुने करणारे **द्रव्य.** कालास आदि व अंतहि नाहीं. तो तिन्ही लोकांत व्यापलेला असून अत्यंत सूक्ष्म अशा परमाणूंनी युक्त आहे. असो. **उत्सर्पिणी** व **अवसर्पिणी** असे कालाचे दोन भेद आहेत. उत्सर्पिणीकालांत मनुष्यांचें बळ, देह, आणि आकार हे वाढत्या प्रमाणाने असतात, आणि अवसर्पिणीकालांत दिवसेंदिवस कमी होत जातात. हल्ली या आमच्या भरतक्षेत्रांत अवसर्पिणीचा पंचम काल चालू आहे. ह्याप्रमाणे अजीवाचे जे पांच भेद आहेत त्यांचे वर्णन केले; येथें एक जीव व बाकीचीं पांच अजीव मिळून सहा प्रकारचीं द्रव्यें सांगितलीं. या सहापैकीं कालद्रव्य सोडून बाकीच्या पांच द्रव्यांस ' अस्तिकाय ' म्हणतात. तीं पांच द्रव्ये ' नित्य-सन्ति ' ह्मणजे निरंतर आहेत ह्मणून त्याला अस्ति असें ह्मटले आहे. ज्यामुळें शरीराप्रमाणे त्या पांचहि द्रव्यांचे प्रदेश पुष्कळ आहेत, त्या कारणावरून त्यांना ' काय ' ह्मटले आहे. मिळून ' अस्तिकाय ' ही संज्ञा काळ सोडून बाकीच्या पांच द्रव्यांस दिली आहे. प्राण्यांमध्ये आत्म्याचा व पुद्गलाचा संयोग झाला आहे. आत्म्याचा अशा रीतीनें पुद्गलांशी झालेला संयोग अनादि आहे. कर्म देखील पुद्गल आहे. कर्मांच्या बंधनांनीं जखडल्यामुळे आत्मा हा जन्माच्या फेऱ्यामध्यें सांपडला आहे. ह्मणून आतां शुभाशुभ कर्मबंध होण्याचीं जीं द्वारें ज्याला ' आस्रव ' ह्मणतात त्या आस्रवतत्वाचे वर्णन करितो.

---

१ जीव, धर्म, आणि अधर्म या तीन द्रव्यांचे प्रदेश असंख्य आहेत. आकाशाचे प्रदेश अनंत आहेत. मूर्त ह्मणजे पुद्गलाचे प्रदेश संख्यात, असंख्यात व अनंत असे तीन प्रकारचे आहेत. आणि कालाचा एकच प्रदेश आहे. ( कारण कालाचे परमाणु रत्नांच्या राशीप्रमाणे आहेत. ) त्यामुळे कालास ' काय ' अशी संज्ञा मिळाली नाहीं.

## आस्रवतत्व.

**कायवाङ्मनःकर्मयोगः स आस्रवः ।**

—( तत्वार्थसूत्र अ. ६ )

शरीर, वचन, आणि मन याची जी क्रिया तिला योग असें ह्मणतात. अर्थात् योग तीन प्रकारचे आहेत. काययोग, वचनयोग, आणि मनोयोग. व तो योगच कर्माचे येण्याचें द्वार होय. ह्मणजे यांच्या द्वारे जी कर्में येतात तींच आस्रव होत. अर्थात्:—

**शुभाशुभकर्मद्वाररूप आस्रवः ।**

ह्मणजे शुभ व अशुभ कर्मबंध होण्याची जी द्वारे त्याला आस्रव ह्मणतात. कर्म[1] येण्याला जो रस्ता आहे त्याला ' आस्रव ' ह्मणावे. जसे, पाण्यात पोहणाऱ्या नौकेला छिद्रे असली ह्मणजे त्या छिद्रावाटे पाणी नौकेंत भरतें, तसे हा जीव आपल्या ज्ञानदर्शनगुणानीं ज्या ज्या पदार्थाला पाहतो अथवा जाणतो त्या त्या पदार्थाकडे रागद्वेषानें संयुक्त झाला ह्मणजे त्याने कर्मबंधाची द्वारे उघडली असे होते. अथवा आत्म्यामध्येहि मनोवचनकाययोगाच्या द्वारे शुभाशुभ कर्मे येत असतात. तीं कर्मे येण्यास योगच कारण आहेत. कारणामध्ये कार्याची कल्पना करून या ठिकाणी योगालाच आस्रव ह्मटले आहे. येथें आस्रव शब्दाचा, " कर्मपुद्गलाच्या आगमनाला अनुकूल अशी **जीवाची क्रिया** " असा अर्थ आहे. आतां ज्या वेळीं ह्याची वृत्ति शुभरागद्वेषाने संयुक्त असते त्या वेळी ह्याला शुभ आस्रव आणि अशुभ रागद्वेषानें संयुक्त असते त्या वेळीं ह्याला अशुभ आस्रव होतात.

**शुभः पुण्यस्याशुभः पापस्य ।**

जीवाची वृत्ति तीन प्रकारची असते. शुभ, अशुभ, आणि शुद्ध. शुभपरिणामापासून उत्पन्न झालेला योग पुण्यप्रकृतीचे आस्रवाला उत्पन्न करितो. व अशुभ परिणामापासून उत्पन्न झालेला योग, पापरूपी कर्माचा

---

१ कर्मः— जे जीवास मोक्षास जाऊं देत नाही व संसारातच भ्रमण करविते ते कर्म होय.

आस्रव उत्पन्न करितो. जीवाचा घात करणें खोटें बोलणे, परधन हरण करणे. इत्यादिकाना अशुभयोग ह्मणतात. व ह्यापासून पापरूपी-कर्माचें आगमन ( आस्रव ) होते. आणि जीवाचे रक्षण करणे, उपकार करणें, सत्य बोलणे, पचपरमेष्ठीची भक्ति करणें इत्यादिक शुभ योग आहेत, यांपासून पुण्यकर्माचे आस्रव होतात. अशुभापेक्षां शुभ-वृत्ति बरी. तथापि त्यातहि रागद्वेष असल्यामुळे ती मोक्षपदाला पोंहचवीत नाही. फार झालें तर स्वर्गसुखाला व इहलोकीचे चक्रवर्ती आदिक उच्च पदाला पोहचविते. आणि अशुभ तर नरकयातना, पशु-योनि, आणि मनुष्य जन्मांतील दारिद्र्य, व्याधि, वियोग, कुरूप, इत्यादि स्थितीत दु ख भोगावयास लाविते. ह्या दोहोशिवाय शुद्धवृत्ति जी आहे तीच खरी कल्याणकारक आहे व तीच मोक्षपदाची प्राप्ति करून देणारी आहे. शुद्धवृत्तीमध्ये रागद्वेष अगदी नसतात. कषायसहित व कषायरहित जीवाना क्रमानें सापरायिक आस्रव व ईर्यापथआस्रव होतात. कषायसहित जीवाना सापरायिक आस्रव व कषायरहित जीवांना ईर्यापथ आस्रव होतात. जे **आत्म्याच्या गुणाचा घात करितात त्यांना ' कषाय '** असे ह्मणावे. **' कषन्तीति कषायाः '** आत्म्याला क्लेशित करणारे ह्मणून त्यास कषाय ह्मणतात हे कषाय चार प्रकारचे आहेत. क्रोध, मान, माया व लोभ. जेव्हा आपल्या परिणामामध्ये राग-द्वेषादि कषाय असतात तेव्हा **सांपरायिक आस्रव** होतात. ससार उत्पन्न होण्यास कारणीभूत जे आस्रव त्यास सापरायिक आस्रव ह्मणतात. आणि जेव्हा त्या कषायांचा आपल्या परिणामामध्ये अभाव असतो व वचन व काय यामुळेच ज्या कर्माचे आगमन—( जसे केवलज्ञानीना ) होतें याला **ईर्यापथ** ह्मणतात. ह्मणजे स्थितिरहित कर्माचे आस्रव होणे याला ईर्यापथ ह्मणतात. बध, उदय, व निर्जरा हीं ज्याची एके काळींच होतात त्यास **स्थितिरहित कर्म** ह्मणतात.

मिथ्यात्व, अविरति ( हिसा, असत्य, चोरी इत्यादि ), प्रमाद ( आलस्य ), कषाय ( क्रोध, मान, माया, लोभ ) इत्यादिकांचे भाव

अथवा दानादि शुभ कर्म करण्याचे भाव त्यास **भावास्रव** ह्मणतात. व या योगाने शुभाशुभ कर्माचा योग होतो. आणि त्या कर्मरूपाने परिणत झालेल्या पुद्गलद्रव्यास **द्रव्यास्रव** ह्मणतात. भावास्रव व द्रव्यास्रव यांचे लक्षण द्रव्यसंग्रहात असे सांगितले आहे.

**आसवदि जेण कम्मं परिणामेणप्पणो स विण्णेओ ।**
**भावासवो जिणुत्तो कम्मासवणं परो होदि ॥ २९ ॥**

आत्म्याच्या ज्या शुभाशुभ परिणामाने पुद्गलद्रव्ये कर्मरूपाचीं होतात, त्या परिणामास भावास्रव ह्मणतात अर्थात् द्रव्यास्रवास जे कारण तो भावास्रव जाणावा. आणि त्या कर्मरूपाने परिणत झालेल्या पुद्गलद्रव्यास द्रव्यास्रव ह्मणतात. पुढे ५ मिथ्यात्व, ५ अविरति, १५ प्रमाद, ३ योग, ४ कषाय, हे सगळे भावास्रवाचे भेद सांगितले आहेत. ज्ञानावरण वगैरे आठ कर्मास योग्य असे जे पुद्गलद्रव्य प्राप्त होते तो द्रव्यास्रव होय. कर्मांच्या मूळ प्रकृति ( भेद ) आठ आहेत. त्याचें सविस्तर वर्णन पुढे करू. आता चौथे तत्व जे बंध त्याचें स्वरूप काय आहे हे पाहू.

## बंधतत्व.

**आत्मकर्मणोरन्योन्यप्रदेशानुप्रवेशात्मको बन्धः ।**

आत्म्याचे व कर्मांचे प्रदेश एकमेकात बांधले जाणे ह्याला बंध ह्मणतात. तत्वार्थसूत्रामध्ये बंधाचे स्वरूप असे सांगितले आहे कीं:—

**सकषायत्वाज्जीवः कर्मणोयोग्यान् पुद्गलानादत्ते स बंध ॥**

**अर्थः**—जीव कषायसहित ( युक्त ) झाल्याने कर्म उत्पन्न होण्यायोग्य पुद्गलाला ग्रहण करितो त्याला बंध ह्मणावे. संपूर्ण लोक पुद्गल परमाणूनीं भरलेला आहे. त्यांतच कार्माणवर्गणेचे परमाणूहि ठिकठिकाणीं आहेत. ज्यावेळीं हा आत्मा मन, वचन, कायरूपी योगद्वारे चंचल होतो व कषाययुक्त होतो त्यावेळी त्या सभोंवती असलेली कर्मवर्गणा ही कर्मस्वरूपाची होऊन आत्म्याशीं चिकटून जाते. जसें, लोखंडाचा तप्त झालेला गोळा पाण्यांत सोडला ह्मणजे तो ते पाणी

चोहोंकडून आकर्षण करून घेतो त्याप्रमाणे आत्मा कषाययुक्त झाला ह्मणजे कर्मपरमाणूला ग्रहण करतो, व यासच **कर्मबंध** ह्मणतात. अथवा आत्म्याचे पाहणें किंवा जाणणे हे स्वगुण आहेत. त्या स्वगुणाने तो ज्या ज्या पदार्थाला पाहतो अथवा जाणतो त्या त्या पदार्थावर कर्मोदयामुळे रागद्वेष करू लागतो. हे त्याचें रागद्वेषरूप परिणमन होणे तेच **कर्मबंधन** होय. चेतन जो आत्मा त्याला अनादि कालापासून कर्मबधन असल्यामुळेच तो ससारात भ्रमण करीत आहे. **जीवाचा व कर्माचा संबंध** अनादि कालापासून बीज व वृक्ष अथवा तीळ व तेल यांच्या सबधाप्रमाणे चालत आलेला आहे. ह्मणजे जसे वृक्षापासून बीज उत्पन्न होते व बीजापासून वृक्ष उत्पन्न होतो तसेच आत्मा व कर्म याचा निरतर अनादि सतानरूप क्रम आहे. वृक्षाशिवाय बीज उत्पन्न झाले, अथवा बीजाशिवाय वृक्ष उत्पन्न झाला अशी वेळ आपणाला केव्हांहि आढळणार नाहीं. त्याचप्रमाणे कर्माच्या निमित्ताने आत्म्याचे रागद्वेषादि भाव उत्पन्न होतात, व रागद्वेषादि भावाचे कारण कर्मबध होते. अर्थात् रागद्वेष उत्पन्न होण्याला पुरातन कर्मबध कारणीभूत होतात. व नवीन कर्मबध होण्यामध्ये रागद्वेष हेतु आहे. रागद्वेषाच्या अभावीं कर्मबध झाला, अथवा पूर्व कर्मबंधाशिवाय ( बध नसताना रागद्वेष उत्पन्न झाले असे केव्हाहि होणे शक्य नाहीं. साराश हा ससारी जीव अनादि कालापासून कर्मबधसहित आहे. अर्थात् प्रारंभापासून त्यावर कर्मावरण पडले आहे. हें कर्मावरण आत्म्याच्या स्वभावामध्ये अनेक प्रकारचे विकार उत्पन्न करिते. त्याचा परिणाम असा होतो कीं, तो नानाप्रकारचें सुख दुःख भोगतो. व ससाराविषयीं मिथ्या व भ्रामक कल्पना झाल्यामुळे जें अचिन्त्य, अनुपम, अनन्त व शाश्वत सुख आहे त्यापासून वचित होतो. अर्थात् त्याला आचवतो. ह्याचप्रमाणे कर्माची मीमांसा हिंदुधर्मशास्त्रामध्येहि केलेली आहे. कर्म हेच सर्वापेक्षा बलवत्तर आहे असेच तेथेहि प्रतिपादन केले आहे. याबद्दलची एक अत्यत बोधप्रद अशी गोष्ट **महाभारतांतील**

अनुशासन पर्वामध्ये सांगितली आहे. ती अशी —गौतमी नांवाच्या एका वृद्ध बाईचा एकुलता एक मुलगा साप चावून मेला, तेव्हा अर्जुनका नावाच्या व्याधाने त्या सापास जीवत धरून आणून यास कोणती शिक्षा करू ह्मणून गौतमीस विचारिलें. त्यावर तिने सापासच ती गोष्ट विचारण्यास सांगितले. सापास विचारल्यावरून त्याने उत्तर दिलें कीं, यात माझा कांहीं एक अपराध नाहीं, मी मरणाचा दास आहे, मरणाने सांगितलेले काम मी बजावितों एवढेच. त्यावरून व्याधानें मरणास जीवत पकडून आणून हें दुष्कृत्य तू का केलस ह्मणून त्याला विचारलें. मरणानें उत्तर दिले, बाबा, मी सापासारखा काळाचा नौकर आहें. त्याच्याच आज्ञेवरून मी पडशाकडे, तापाकडे, खोकल्याकडे वगैरे अनेक रोगाकडे जाऊन मनुष्याना घेऊन येतो. पुढे व्याधाने त्या काळासहि पकडून आणिले, तेव्हा काळाने पुढीलप्रमाणे उत्तर दिले -

> **कर्मदायादवाँल्लोकः कर्मसंबंधलक्षणः ।**
> **कर्माणि चोदयन्तीह यथान्योन्यं तथा वयम् ॥**
> **यथा मृत्पिंडतः कर्ता कुरुते यद्यदिच्छति ।**
> **एवमात्मकृतं कर्म मानवः प्रतिपद्यते ॥**
> **यथाच्छायातपौनित्यं सुसंबद्धौ निरंतरं ।**
> **तथा कर्म कर्ता च संबंद्धावात्मकर्मभिः ॥**
> **एवं नाहं न वैर्मृत्युर्नसर्पो न यथा भवान् ।**
> **न चेयं ब्राह्मणी वृद्धा शिशुरेवात्र कारणम् ॥**

**अर्थः**— मी काहीं एक करीत नसतों. जे काही घडतें ते ज्याच्या त्याच्या कर्मामुळे घडत असतें. कर्मसंबंधहीन अशी कोणतीच वस्तु नाहीं. सर्व भाव मात्र कर्मसबध लक्षण आहे. एका कर्मामुळे दुसरें कर्म उद्भवते. अशी ही मालिका सारखी चालू आहे. आह्मी सर्वजण छकड्याला जुपलेले बैल आहोत. कर्म व कर्ता यांचा अन्योन्य सबध आहे. कर्ता अगोदर की कर्म अगोदर हे एक मोठे कोडे आहे. बीजांकुरन्यायाप्रमाणे कर्ता कर्माचा बाप, किंवा कर्म कर्त्याचा बाप

हें कांहीं सांगतां येत नाहीं. कर्त्याच्या इच्छेच्या बीजाभोंवतीं कर्माची जमीन, कर्माचें खत, कर्माचे पाणी, व कर्माची हवा असते; त्यातून जो अंकुर येतो त्याचा भाग कर्माकडे किती व कर्त्याकडे किती हें कोणी सांगावे? कुंभार ज्याप्रमाणें आपल्या इच्छेनुरूप मडके बनवितो, त्याप्रमाणे मनुष्य स्वेच्छेने कर्म करीत असतो व कर्महि मनुष्येच्छेला आपल्यापरी वळवीत असते. ज्याप्रमाणें ऊन व सावली एकमेकांवर अवलंबून असतात त्याप्रमाणे कर्म व कर्ता एकमेकांवर अवलंबून आहेत. परस्पराची परस्परांवर सूक्ष्म क्रिया,प्रतिक्रिया(Interaction) होत असते. व्याध, साप, मरण, काळ, किंवा गौतमी यापैकीं कोणीहि जबाबदार नाही तर त्या मुलाचेच जें कर्म त्याने त्यास नेलें आहे, कर्मच सर्वांत श्रेष्ठ आहे. असो. एकाद्या मनुष्याचा मुलगा मेला तेव्हां जर त्या मनुष्याच्या आत्म्याला शोक झाला व त्यावेळीं त्याचे भाव ( परिणाम ) जितके तीव्र अथवा मंद असतील त्याप्रमाणेच तो कार्माण परमाणूंनी बांधिला जाईल. ( त्याला कर्मबंध होईल. ) परंतु जर त्याने शोक केला नाही, व हा संसार असाच क्षणभंगुर, असार व नाशवंत आहे असे आपले समपरिणाम ठेविले, अर्थात् पुत्रशोकामुळे त्यानें आपल्या परिणामांमध्ये कोणत्याहि प्रकारची चलबिचल होऊं दिली नाही तर त्याला कर्मबंधन होणार नाहीं. व त्यामुळें त्याला खरें सुख मिळेल. यावरून हे स्पष्टपणे दिसून येते की, आत्म्याला जसा कर्मबंध होतो त्याप्रकारचे त्याला कर्मोदय झाल्यावर फळ मिळते. अशी अनेक उदाहरणे आपणाला जैनशास्त्रांमध्ये आढळून येतात. श्रीरामचंद्राचे बंधु भरत यांच्या पूर्वभवाच्या चरित्रामध्यें एका मुनीची कथा सांगितली आहे. चारण ऋद्धिधारी आचार्य यांनीं ज्या उद्यानामध्ये चातुर्मास केला होता अशा एका उद्यानामध्यें हे मुनि गेले. परंतु हे जाऊन पोहोचण्याचे पूर्वीच ते आचार्य तेथून दुसरीकडे विहारास गेले होते. त्या उद्यानाच्या सान्निध्यांतील नगरचे लोक त्या दिवशीं त्या आचार्यांचे दर्शन करण्याकरितां ह्मणून आले. व

हेच मुनी आचार्य आहेत असें समजून यांना **नमस्कार** केला. व धर्माचे श्रवण केले. त्यावेळी ज्या आचार्याचे आपण नांव घेता व स्तुति करता तो आचार्य मी नव्हे, असे ह्या मुनीनें सांगितले नाहीं. इतका मोह ठेवल्यामुळे त्या मुनीला तिर्यचगतीमध्यें तिलोकमण्डण हत्तीच्या पर्यायामध्ये जन्म घ्यावा लागला. ह्या जगामध्यें आपणाला माणसाचीं वेगळी वेगळी चरित्रे दिसतात त्याचे कारणहि हेच आहे की, पूर्वी झालेल्या कर्मबंधनाचा उदय होतो. **कार्तिकेयस्वामींनीं** असे ह्मटले आहे:—

**गाथा.**

**ण य को वि देहि लच्छीण को वि जीवस्स कुणइ उवयारं।**
**उवयारं अवयारं कम्मं पि सुहासुहं कुणदि ॥ ३१९ ॥**
**भत्तीए पुज्जमाणो विंतरदेवो वि देदि जदि लच्छी ।**
**तो किं धम्मं कीरदि एवं चिंतेहि सद्दिट्ठी ॥ ३२० ॥**

**अर्थः**—ह्या जीवाला कोणी लक्ष्मी देत नाहीं; व कोणी जीवावर उपकारहि करीत नाही; व अपकारहि करीत नाही. ह्या जगामध्यें उपकार अथवा अपकार केल्यासारखे जे दिसते तें आपले **शुभाशुभ कर्मच** होय. कारण भक्तिभावाने पूजिलेल्या व्यंतरदेवाने लक्ष्मी दिली असे मानले तर दान, पूजा, शील, संयम, ध्यान, तप, व सर्व धर्म तरी कशाला राहतील? मग कर्म ह्मणून जे काही आहे ते मानण्याचे प्रयोजन नाही. अर्थात् धर्माचरण करणे निष्फळ होईल.

कर्मबंधाचे चार भेद आहेत. **१ प्रकृतिबंध, १ स्थितिबंध, ३ अनुभागबंध, व ४ प्रदेशबंध.**

प्रकृतिबंध ह्मणजे जसें, आंबट, तिखट, खारट वगैरे पदार्थांचे निरनिराळे गुण असतात तसे ज्ञानाला झाकणाऱ्या, दर्शनाला झांकणाऱ्या, खरें खोटें ओळखू न देणाऱ्या, खोट्या मार्गाने वागवणाऱ्या, सुखदुःख भासविणाऱ्या वगैरे वेगवेगळ्या प्रभाव दाखविणाऱ्या वेगवेगळ्या कर्मप्रकृति होत. त्यांचे मूळ भेद आठ आहेत. प्रकृति

ह्मणजे स्वभाव. जसा लिंबाचा स्वभाव कडू, आणि गुळाचा स्वभाव गोड असतो त्याप्रमाणे कर्मामध्येहि आठ प्रकारचे स्वभाव होतात यांस प्रकृतिबंध ह्मणतात. १ ज्ञानावरणीय, २ दर्शनावरणीय, ३ वेदनीय, ४ मोहनीय, ५ आयु, ६ नाम, ७ गोत्र, ८ अंतराय अशीं आठ कर्मे आहेत.

ज्ञानावरणीचा स्वभाव आत्म्याचें ज्ञान आच्छादन करण्याचा आहे.

दर्शनावरणीचा स्वभाव आत्म्याच्या दर्शनाला आच्छादन करणे.

वेदनीयकर्माचा स्वभाव सुखदु:ख उत्पन्न करण्याचा आहे.

मोहनीयकर्माचा स्वभाव हिताहिताविषयी आत्म्याला श्रद्धान न होऊ देणे, व आत्म्यामध्ये क्रोधादिक विकार उत्पन्न करणे हा आहे. त्याचप्रमाणे दारुप्रमाणे श्रम उत्पन्न करण्याचा आहे

आयुकर्माचा स्वभाव आत्म्याला कोणत्या तरी एका शरीरामध्ये काही काल अडकाविणे हा आहे.

नामकर्माचा स्वभाव आत्म्याकरिता सांगोपांग शरीर बनविणे.

गोत्रकर्माचा स्वभाव उच्च नीच कुलामध्ये आत्म्याला उत्पन्न करणें

अंतराय कर्माचा स्वभाव आत्म्याची शक्ति, दान, लाभ, भोग, उपभोग व वीर्य यांत विघ्न करण्याचा आहे.

पहिल्या चार कर्माला घातियाकर्म ह्मणतात कारण ही चार जोंपर्यंत आत्म्याच्या मागे आहेत तोपर्यंत ती आत्म्याला केवळ ज्ञान होऊ देत नाहीत. व ह्मणूनच यास घातियाकर्म ह्मणतात. व आयुनामादिक चार कर्माला अघातियाकर्म ह्मणतात. कारण घातियाकर्मांचा क्षय झाल्यावर अघातियाकर्मे बलहीन होऊन जाते. ह्या मूळ प्रकृतींचे एकशें-अठ्ठेचाळीस भेद आहेत ते तत्वार्थसूत्राच्या आठव्या अध्यायाची टीका पाहिल्यास समजून येतील. तेव्हां कर्मामध्ये याप्रकारचे स्वभाव होणें यास **प्रकृतिबंध** ह्मणतात.

२ बंधाचा दुसरा भाग **स्थितिबंध** आहे. वरील ज्ञानावरणादि आठ प्रकारची कर्मप्रकृति जी आत्मप्रदेशाशी बंधस्वरूपाची होऊन गेली

आहे तिची जी कालमर्यादा तिला ( ती जेवढा वेळपर्यंत राहील ह्मणजे जावत्कालपर्यंत आपल्या स्वभावाला सोडणार नाही त्या अवस्थेला ) **स्थितिबंध** ह्मणतात

३ ज्याप्रमाणे बकरी, गाई, ह्मैस, इत्यादि पशूंच्या दुधामध्यें कमी अधिक प्रमाण दूध देण्याचे आहे, त्याचप्रमाणें कर्मांमध्येंहि तीव्र, मध्यम, मद फल देण्याची शक्ति आहे. फल देण्याच्या शक्तींचे जें हीनाधिक्य त्यास अनुभाग अथवा **अनुभवबंध** ह्मणतात. तत्वार्थ-सूत्रांत उमास्वामीनी अनुभागबधाचे लक्षण असे दिले आहे.

**विपाकोऽनुभवः ।**

—( अ ८ सू. २१ ).

विशेष प्रकारचा पाक अथवा नानाप्रकारचा पाक ह्मणजे फल-दानशक्ति प्राप्त होणे यास विपाक ह्मणतात. व तोच अनुभागबध ह्मणावा. भावार्थ—तीव्र मध्य मदरूपी परिणामानी कर्मांचा उदय झाला असता आत्म्याला सुखदु खादि फल प्राप्त होते. कर्मांचे ठायी ती फल-दानशक्ति येणें यासच अनुभागबध ह्मणतात. शुभपरिणामाच्या अधि-कतेने शुभ-प्रकृतीमध्ये अधिक रस पडतो आणि अशुभ प्रकृतीमध्ये मदरस पडतो. आणि अशुभ परिणामाची अधिकता झाल्याने अशुभ-प्रकृतीमध्यें अधिक रस पडून शुभ प्रकृतीमध्यें मदरस पडतो. अनुभा-गबध हा कर्मप्रकृतीच्या नामानुसार होतो. ह्मणजे ज्या प्रकृतीचे जे नांव आहे तसाच त्याचा अनुभव येतो. जसें ज्ञानावरणाचे फल ज्ञानाला आवरण करणे, दर्शनावरणाचे फल दर्शन न होऊ देणे त्याचप्रमाणे मूल-प्रकृति आणि उत्तर-प्रकृतीमध्ये ज्याचे जसे नाव असेल तशीच त्यात फलदानशक्ति आहे. व यालाच अनुभागबध ह्मणतात.

४ आणि वरील आठ प्रकारच्या कर्मांचा आत्मप्रदेशाशी एक-क्षेत्रावगाहसबध होणे ह्मणजे आत्म्याच्या सर्व प्रदेशांमध्ये ज्ञानावरणादि नावाप्रमाणें कर्मांचे अनतानत प्रदेश सूक्ष्मपणाने एकत्र असणे याला **प्रदेशबंध** ह्मणतात.

त्यापैकी प्रकृति व प्रदेश हे दोन बंध मन, वचन, आणि काय याच्या योगापासून होतात. आणि स्थिति व अनुभाग हे दोन बध कषायापासून होतात. वेदातामध्ये कर्मबंधाचे स्वरूप **संचित, क्रिया, भाग,** आणि **प्रारब्ध** असें दाखविले आहे, त्याप्रमाणे जैनमतांत **सत्ता, बंध,** आणि **उदय** असे भेद आहेत. सत्ता, ह्मणजे पूर्वी कर्मबध केलेले शिलकेंत असून अझून त्याचे फळ भोगिलें नाहीं ते. बध ह्मणजे नवीन कर्म बाधले जाणे. आणि उदय ह्मणजे पूर्वी केलेल्या कर्माची फळे भोगणे. असे बधतत्वाचे वर्णन सांगितले. आता त्याच्या पुढचें पाचवे तत्व जे ' सवर ' ते सागतो.

## संवरतत्व.

## आस्रवनिरोधः संवरः ।

आस्रवाचा निरोध करणे ह्मणजे त्याला रोकणे याला सवरतत्व ह्मणतात. ह्मणजे ज्या द्वाराच्या योगाने कार्माण परमाणूचे आत्म्याच्या प्रदेशाजवळ आगमन होते त्या द्वाराना रोकणे यास सवर ह्मणतात. जसे नौकेत किंवा एखाद्या फुटक्या भाड्यात पाणी शिरू नये ह्मणून त्याच्या छिद्रास बोळे वगैरे लावून पाण्यास जसा प्रतिबध करितात त्याप्रमाणे आत्म्याचे ठिकाणीं नवीन कर्म न येऊ देणे अर्थात् कर्म येण्याचे निमित्त जे मनवचनकाय ह्याचे योग, मिथ्यात्व आणि कषाय याना प्रतिबध करणे ह्मणजे हे न होऊ देण्याने अनेक प्रकारच्या सुखदु:खाला कारणरूप जी कर्मप्राप्ति तिचा प्रतिबध करणे याला सवरतत्व म्हणतात. सवर दोन प्रकारचा आहे. एक **द्रव्यसंवर** व दुसरा **भावसंवर,** जो आत्म्याचा परिणाम पुद्गलस्वरूपी कर्माच्या आस्रवाला प्रतिबध करितो तो **द्रव्यसंवर** व द्रव्यमय आस्रवाला प्रतिबध करण्याला कारणरूपी जे आत्म्याचे परिणाम होणें यास **भावसंवर** ह्मणतात. तो सवर तीन गुप्ति, पांच समिति, दहा धर्म, बारा अनुप्रेक्षा, बावीस परीषह जिकणे आणि पाच प्रकारचे चारित्र या सहा कारणांनी होतो.

( १ ) संसारपरिभ्रमणापासून आत्म्याचें रक्षण करणे–अर्थात् मन, वचन, काय यांना ताब्यांत ठेवणे याला **गुप्ति** ह्मणतात.

तत्वार्थसूत्रांत गुप्तीचे लक्षण सागितलें आहे ते असेः—

**सम्यग्योगनिग्रहो गुप्तिः ॥** —( अ. ९ सू. ४ ).

**अर्थः**—'सम्यक्' ह्मणजे उत्तम प्रकारानें ह्मणजे लोकांकडून सत्कार, कीर्ति, पूजा, लाभ इत्यादिकाची इच्छा ज्यात नाही, **अशा** प्रकारानें 'योगनिग्रह' ह्मणजे काय, वाक् आणि मन यांच्या क्रिया-रूपी योगाचा जो निग्रह ( निरोध करणे ) याला 'सम्यग्योगनिग्रह' ह्मणतात. याचेंच नांव **गुप्ति.** योग तीन प्रकारचा आहे. ह्मणून गुप्ति-हि तीन प्रकारची होते. **मनोगुप्ति, वचनगुप्ति** व **कायगुप्ति.** गुप्तींच्या योगाने आर्त, रौद्र वगैरे दुर्ध्यानें होत नाहीत. आणि त्यामुळे संक्लेश होत नाहींत व नवीन कर्म येत नाही. ह्मणून मुनींने गुप्ति अवश्य पाळल्या पाहिजेत.

तीन गुप्ति ह्मणजे १ मन निश्चित करणे, २ मौन धरणें आणि ३ शरीराची चलनवलनक्रिया बद करणे. ह्या गोष्टी थोडा वेळ करितां येतात नेहमीं होत नाहींत ह्मणून **पांच समिति** सागितल्या आहेत.

**सूत्र ॥ ईर्याभाषैषणादाननिक्षेपोत्सर्गाः समितयः ॥**

—( त. अ. ९ सू. ५ ).

( २ ) आपल्या शरीरापासून अन्य जीवांना पीडा होऊ नये ह्मणून याना विचारपूर्वक सावधानतेनें क्रिया करणे यास समिति ह्मण-तात. पाच समिति.

( क ) **ईर्यासमिति** ह्मणजे चालताना, बसताना, निजतांना कोणत्याहि प्राण्याला आपणापासून पीडा न होईल असे वागणे.

( ख ) हितमितसशयरहित प्रिय वचन बोलणें याला **भाषा-समिति** ह्मणतात.

---

**१ या संसारकारणादात्मनो गोपनं भवति स गुप्तिः ।**

**२ प्राणिपीडापरिहारार्थं सम्यगयनं समितिः ।**

( ग ) निर्दोष आहार घेणें, आपल्या खाण्यापिण्यापासून दुसऱ्याला ओझे वाटू नये, व त्रास होऊ नये, व खाण्यापिण्यापासून आळस, प्रमाद रोग उत्पन्न होऊं नयेत अशी खबरदारी ठेवणे, ही **एषणासमिति** होय.

( घ ) आपले पिछी, कमण्डलु वगैरे उपकरणे ठेवण्यामध्यें व उचलण्यामध्ये कोणत्याहि प्राण्याला पीडा होऊ नये असे काळजीपूर्वक वागणे ह्याला **आदाननिक्षेपणसमिति** ह्मणतात.

( ङ ) त्रस व स्थावर जीवाना पीडा होणार नाही अशा शुद्ध जतुरहित भूमीवर मलमूत्र क्षेपण करणे हिला पांचवी **उत्सर्गसमिति** ह्मणतात. ह्याप्रमाणे पांच समितीपासून सवर होतो.

३ स्वर्गमोक्षादि इष्ट स्थानी पोहोचविणारा तो धर्म[1] होय. धर्म दहा आहेत. ह्या दहा प्रकारच्या धर्मापासून ( दशलाक्षणी धर्माने ) संवर होतो. या दहा धर्माचे वर्णन पुढे वेगळे केलेच आहे.

४ शरीरादिक परद्रव्य, ज्ञानमय आत्मद्रव्य आणि अन्य धर्मादिक द्रव्याचे वारवार चितवन करणे यांस अनुप्रेक्षा[2] ह्मणतात. अनुप्रेक्षा ह्मणजे पुन पुन. चितवन करणे. ह्या बारा अनुप्रेक्षा आहेत. ह्याचें चितवन केल्याने सवर होतो. ह्याचेहि वर्णन स्वतत्र रीतीने पुढे केले आहे

५ बाह्य अभ्यतर कारणानी क्षुधातृषादिक परीषह[3] प्राप्त झाले असता क्लेशरहित परिणामानी ते सहन करणे यांस **परीषहजय** ह्मण-

---

१ इष्टे स्थाने धत्ते इति धर्मः ।

२ शरीरादीनां स्वभावानुचिंतनमनुप्रेक्षा ।

क्षुधाधिवेदनोत्पत्तौ कर्मनिर्जरार्थं सहनं परिषहः ।

३ कायक्लेश व परिषह ह्या दोहोमध्ये इतकाच भेद आहे की, प्रयत्नाने कष्ट उपस्थित करून सहन करणे याला कायक्लेश ह्मणतात. स्वतः अकस्मात् आपोआप आलेल्या कष्टाला सहन करणे याला परिषह ह्मणतात.

तात. परीषह बावीस आहेत. ते असे:—१ क्षुधा, २ तृषा, ३ शीत, ४ उष्ण, ५ दंश-मशक (डास माशा वगैरे), ६ नग्नपणा, ७ अरति ( अनिष्ट वस्तूशीं संयोग होणें. ) ८ स्त्री, ९ चर्य्या ( चालणे ), १० आसन, ११ शय्या, १२ आक्रोश, १३ वध, १४ याचना, १५ अलाभ, १६ रोग, १७ तृणस्पर्श, १८ मल, १९ सत्कारपुरस्कार, २० प्रज्ञा, २१ अज्ञान, २२ अदर्शन ( दीक्षा घेऊन बहुत वर्षे झाली अद्यापि मला ऋद्धि, अवधिज्ञान वगैरे कांहीच प्राप्त होत नाहीं अशी चिंता करणे ),—ह्या बावीस परिषहापैकीं ज्या ज्या वेळीं जे जे सहन करण्याचा प्रसंग येईल त्या त्या वेळीं ते शांतपणाने सहन केल्यास त्यापासूनहि संवर होतो.

६ संसारपरिभ्रमणाला कारण अशा बाह्याभ्यंतर क्रियेचा त्याग करणे यांस **चारित्र** म्हणतात. चारित्र पांच प्रकारचे आहे.—

**सामायिकच्छेदोपस्थापनापरिहारविशुद्धिसूक्ष्म-सांपराय यथाख्यातमिति चारित्रम् ॥**

१ सामायिक ह्मणजे दिवसांतून व रात्रीतून मिळून चार वेळां सकाळसंध्याकाळ, मध्यान्ह व मध्यरात्र अशा संध्येच्या समयी एकाग्र मनाने दोन घटका एका आसनाने बसून अथवा उभे राहून ध्यान धरणे अथवा धर्मविचारात लक्ष लावणे वगैरे षडावश्यक क्रिया करणे हें **सामायिक** होय.

२ दोष लागल्यामुळे प्रायश्चित्त घेणे किंवा पुनः दीक्षा घेणे ह्याला **छेदोपस्थापना** म्हणतात.

३ **परिहारविशुद्धि** ह्मणजे जीवांना दुःख देण्याचा त्याग करून विशेष शुद्ध होणें.

---

१ **क्षुत्पिपासाशीतोष्णदंशमशकनाग्न्यारतिस्त्रीचर्यानिषद्याशय्याक्रोषवधयाचनाऽलाभरोगतृणस्पर्शमलसत्कारपुरस्कारप्रज्ञाऽज्ञानाऽदर्शनानि ॥**

४ **सूक्ष्मसांपराय** ह्मणजे बाकीचे कषाय मावळले, व सूक्ष्म लोभ राहिला असतां त्याच्या नाशाविषयीं प्रयत्न करणे.

५ **यथाख्यात**-चारित्र ह्मणजे सर्वोत्कृष्ट आचरण पाळलें जाणें. असें पांच प्रकारचे चारित्र पाळल्यानें संवर घडतो.

## बारा प्रकारचीं तपें.

आता बारा प्रकारच्या तपानीं संवर व निर्जरा हीं दोन्हीं घडतात ते असे.—"**इच्छानिरोधस्तपः**" रत्नत्रय प्रगट होण्यासाठीं स्वइच्छेला रोकणे किंवा शास्त्रानुसार वागणे ह्याला तप ह्मणतात.

लौकिक, ख्याति याची इच्छा न करितां संयमसिद्ध्यर्थ शक्तीप्रमाणे उपोषण करणें याला (१) **अनशन** ह्मणतात.

ध्यानाची निश्चलता व्हावी ह्मणून उण्यापोटाने जेवणे ह्याला (२) **अवमोदर्य** अथवा ऊनोदर ह्मणतात.

अमुक इतक्याच वेळा खाणेंपिणे करणे अथवा अमुक इतकेंच पदार्थ खाणें ह्याला (३) **वृत्तिपरिसंख्यान** ह्मणतात.

इंद्रियदमन करण्याकरितां, संयमाचे रक्षण करण्याकरिता तूप, तेल, मीठ, साखर, दूध इत्यादि रसातून एक अथवा अधिक रस सोडणें ह्याला (४) **रसपरित्याग** ह्मणतात.

एकांत जागीं आसन घालणे किंवा निजणे ह्याला (५) **विविक्तशय्यासन** ह्मणतात.

शरीरावरील ममत्व कमी करून दुःख सहन करण्याची सवय लावणे ह्याला (६) **कायक्लेश** ह्मणतात.

हे सहा प्रकार बाह्य-तपाचे आहेत. तसेंच सहा प्रकारचे अंतरंग तप आहे.

---

१ **अनशनावमोदर्य्यवृत्तिपरिसंख्यानरसपरित्यागविविक्तशय्यासनकायक्लेशा बाह्यं तपः** —( त. अ. ९ सूत्र १९ )

२ **प्रायश्चितविनयवैय्यावृत्यस्वाधायव्युत्सर्गाध्यानान्युत्तरम्** —( त. अ. ९ सूत्र २०. )

१ प्राय: ह्मणजे अपराध त्याची चित् ह्मणजे शुद्धिकरण यास प्रायश्चित ह्मणतात. प्रमादाने लागलेल्या दोषाबद्दल योग्य शिक्षा भोगून त्या दोषाची शुद्धि करणे ह्याला **प्रायश्चित्त** ह्मणतात.

२ पूज्य पुरुषाचे व माननीय गुरूचे ठायीं आदर करणें ह्यास **विनयतप** ह्मणतात.

३ मुनी, आचार्यादि दहा प्रकारच्या साधूची शुश्रूषा करणे हें **वैयावृत्यतप** होय.

४ धर्मशास्त्राचें पुस्तक वाचणे, ऐकणे व अभ्यास करणे व उपदेश करणे यास **स्वाध्याय** ह्मणतात.

५ बाह्याभ्यतर परीग्रहाचा त्याग करणे, शरीरावरील ममत्व सोडणें ह्याला **व्युत्सर्ग** ह्मणतात.

६ एकाच ध्येय-वस्तूच्या ठिकाणीं– अर्थात् शुद्धबुद्धचिदानद-स्वरूप आत्म्याच्या ठिकाणीं–चित्तविक्षेपाचा त्याग करणे ह्मणजे चित्त एकाग्र ठेवणे ह्याला **ध्यानतप** ह्मणतात.

अशा ह्या बारा प्रकारच्या तपाने सवर होतो.

१ **अनशन**–या पहिल्या बाह्यतपाच्या योगाने कामक्रोधादि षड्रिपु जिंकतां येतात, कर्माचा क्षय होत जातो, व ध्यानादिकांची प्राप्ति होते.

२ **ऊनोदर** अथवा **अवमोदर्य्य**–या तपाच्या योगाने निद्रा येत नाही. दोष कमी घडतात. व मनुष्य नेहमी आनंदित असतो.

३ **वृत्तिपरिसंख्यान**–आशारूपी तृष्णा नाहीशी होते.

४ **रसपरित्याग**–या तपाच्या योगाने इंद्रियदमन होतें. मनुष्याला जितेंद्रिय होता येतें. निद्रा आणि आळस याचे दमन होते.

५ **कायक्लेश**–या तपाच्या योगानें सुखाभिलाषा कमी होते. क्रोधाचा अभाव होतो. दुःख व सकटे सोसण्याची सवय होते. प्रभावना वाढते.

६ **विविक्तशय्यासन**—या तपाच्या योगाने कोणत्याहि प्रकारचा रोग होत नाही. ब्रह्मचर्याचे चागलें पालन होते. ध्यानाध्ययनाची सिद्धि होते.

१ **प्रायश्चित्त**—या तपाच्या योगानें व्रतादिकांची शुद्धता होऊन परिणाम नि:शल्य होतात. तसेच मानादिक कषाय कृश होतात.

२ **विनय**—या अतरग तपाच्या योगाने मानकषायांचा नाश होऊन ज्ञानादि गुणाची प्राप्ति होते.

३ **वैयावृत्य**—या दुसऱ्या तपाच्या योगाने दुसऱ्यांच्या गुणाबद्दल प्रीति उत्पन्न होते. व अभिमान नाहीसा होतो.

४ **स्वाध्याय**—या तपाच्या योगाने बुद्धि तरतरीत होऊन परिणाम उज्वल होतात. सवेग घडतो. धर्माची वृद्धि होते.

५ **उत्सर्ग**—या तपाच्या योगानें परीग्रहावरील ममत्व कमी होते व मनुष्य निर्भय होतो. आणि त्यामुळे ससारातील मोह कमी होत जातो.

६ **ध्यान**—या तपाच्या योगानें मन वशीभूत होऊन कोणत्याहि प्रकारची चिता नसल्यामुळे आनदामध्ये निमग्न होते. बारा प्रकारच्या तपश्चरणानी निर्जरा आणि सवर असे दोन्ही होतात. यद्यपि दशधर्मामध्यें तप सागितले आहे तरी सर्व प्रकारच्या सवरामध्ये तप हें प्रधान कारण आहे. ह्मणून पुन: वेगळे सागितले आहे.

अशा रीतीनें सवर होण्याचीं मुख्य सहा कारणे सांगितली. आह्मी नेहमी ही कारणे आपल्या डोळ्यासमोर ठेवणे अत्यावश्यक आहे. असे केल्याने आह्माला कर्माचे आस्त्रव होणार नाहीत, व ह्या जगांमध्यें आमचे कोणत्याहि तऱ्हेचें नुकसान होणार नाही. सभ्यता ( Gentlemanliness ) अगी असावी ह्मणून आह्मी सवर धारण केला पाहिजे. ह्याप्रमाणें सवरतत्वाचे वर्णन झाले. आता सहावे 'निर्जरा' तत्व आहे ते असे:—

## ' निर्जरा '

## एकदेशकर्मक्षयलक्षणा निर्जरा.

कर्मांचा अशत· नाश करणें ह्याला निर्जरा ह्मणतात. बद्धकर्म नाहींसें होणे ही निर्जरा होय. कर्म उदयाला येऊन आपले तीव्र अगर मद फल दिल्यानतर त्या कर्माची निर्जरा होते. ह्मणजे तें कर्मफल दिल्यानतर आत्म्यापासून वेगळे होतें. ह्याचे दोन भेद आहेत. एक **सविपाक-निर्जरा** आणि एक **अविपाक-निर्जरा**. कर्मांचे फल भोगून ते नाहीसे होणं ही **सविपाक-निर्जरा.** ही चारी गतींतील समस्त जीवांना असते. अथवा एकेंद्रियादि अनेक प्रकारच्या जातींमध्ये या ससारात अनत कालापासून हा जीव भ्रमण करीत असताना याला अनेक प्रकारच्या शुभ अशुभ कर्मांचा उदय प्राप्त झाला असून ज्याप्रमाणे तीव्र मद परिणामानी बद्ध झाला असेल त्याप्रमाणे तीव्र मद रस भोगता भोगता या जीवाला उदयावलिरूपी नलिकेच्या द्वारा जे कर्म रस देऊन नाहीसे होते त्यास सविपाकनिर्जरा ह्मणतात. अर्थात् कर्मांचा उदयकाल प्राप्त झाला असता जे रस देऊन आपोआप नाहींसे होते त्यास सविपाकनिर्जरा ह्मणतात. आणि कर्मांचे फळ भोगण्याचा काळ अझून पुढे आहे व त्याच्या आधी ते नाहीसे करणे ह्मणजे कर्मांचा उदयकाळ अद्याप आला नाही परतु तपश्चरणादिकांनीं कर्मांच्या अनुदय अवस्थेमध्येंच त्याना नाहीसें करणें ही **अविपाक-निर्जरा** होय. काही कर्मांचा क्षय होतो, व काहीं तशीच असतात ह्मणून कर्मांचा अशत: नाश करणें ह्याला **निर्जरा** असे ह्मटले आहे. ही निर्जराहि सवराप्रमाणे बारा प्रकारच्या तपानीच होते. तप शब्दाचा अर्थ सोने अग्नीमध्यें घालून तप्त केल्याच्या योगानें जसे शुद्ध होते तसे कर्मांनी बद्ध झालेल्या आत्म्याचा मल तप केल्याने नाहीसा होतो. तपाच्या प्रभावाने नवीन कर्मांचा निरोध होऊन सत्तेमध्ये असलेल्या प्राचीन बधनरूपी कर्मांची निर्जराहि होते. जरी तपश्चरणापासून स्वर्गमोक्षादि फळाची प्राप्ति होते

तरी प्राधान्येंकरून सपूर्ण कर्मांचा नाश करणें हेंहि याचें फल आहे. तप बारा प्रकारचे आहे. त्याचे सविस्तर वर्णन सवरतत्वामध्यें केलेंच आहे. आता ह्याप्रमाणे निर्जरातत्वाचें वर्णन करून सातवे व शेवटचें मोक्षतत्वाचे स्वरूप सागतो. त्यापूर्वी मोक्षाचे स्वरूप व त्याचा उपाय यांचे वर्णन करणे आवश्यक आहे.

## गुणस्थान.

### मोक्षाचें स्वरूप व त्याचा उपाय.

ससारी जीवाला खरे व शाश्वत सुख मोक्षप्राप्तीपासूनच प्राप्त होते ही गोष्ट निर्विवाद आहे. व मोक्ष हा सवर व निर्जरा या दोन उपायानी प्राप्त होतो असे जैनागमात सागितले आहे. व सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, व सम्यग्चारित्र या तीन गुणांची एकता होणे हाच सवर व निर्जरा होण्याचा उपाय आहे. या तीन गुणाची एकता युगपत ( एकाच कालीं ) होते, अथवा क्रमाने होते. सपूर्ण कर्मापासून आत्म्याची सुटका होणे हा मोक्ष होय. व आत्मा कर्मबधने जसजशीं नाश (निर्जरा)करीत जातो तसतशी त्याची स्थिति बदलत जाते. ह्या स्थितीलाच **गुणस्थान** असे नाव आहे. अथवा मोह आणि योग याच्या निमित्तानें सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, व सम्यग्चारित्रस्वरूपी आत्म्याच्या गुणांची जी तारतम्यरूपी विशिष्ट अवस्था तीस गुणस्थान ह्मणतात. हीं गुणस्थानें चवदा आहेत. मोहनीयकर्म, व योग यामुळे गुणस्थानांचीं ही खालील नावे पडली आहेत.

**मिच्छो सासण मिस्सो । अविरदसम्मो यदेसविरदोय ।**
**विरदप्पमत्त इदरो । अपुव्व अणिवदि सुहुमो य ॥ १ ॥**
**उवसंत खीणमोहो । सजोगकेवलिजिणो अजोगी य ।**
**चोद्दसगुणठाणोहि य । कमेणसिद्धा य णादव्वा ॥ २ ॥**

१ मिथ्यात्व, २ सासादन, ३ मिश्र, ४ अविरतसम्यग्दृष्टि, ५ देशविरत, ६ प्रमत्तसयत, ७ अप्रमत्तसंयत, ८ अपूर्वकरण, ९

अनिवृत्तिकरण, १० सूक्ष्मसांपराय, ११ उपशांतमोह, १२ क्षीणमोह, १३ सयोगकेवलीजिन, १४ अयोगकेवलिजिन, याप्रमाणे गुणस्थानाची चौदा नांवें आहेत. आता प्रत्येक गुणस्थानाचे संक्षेपतः वर्णन करितो.

**१-२ मिथ्यात्व गुणस्थानः**—मिथ्यात्वप्रकृतीच्या उदयानें अतत्वश्रद्धानरूप आत्म्याचे परिणाम होणे यास मिथ्यात्वगुणस्थान ह्मणतात. या गुणस्थानात असलेला जीव विपरीत श्रद्धान करीत असतो. ह्या ठिकाणीं असलेल्या जीवाला आपले खरे हित काय आहे हें समजत नाहीं. खऱ्या धर्माकडे ह्याची रुचि असू शकत नाही. पित्तज्वर झालेल्या रोग्यास दुग्धादिक रस जसें कडू लागतात त्याप्रमाणें यालाहि समीचीन ( उत्तम ) धर्म चांगला भासत नाहीं. दुसरे **सासादन गुणस्थान** प्रथमोपशमसम्यक्त्वाच्या अवस्थेमध्यें ज्यावेळीं जास्तींत जास्ती सहा आवली (असंख्यात समयाना एक आवली ह्मणतात) आणि कमीतकमी एक समय बाकी राहतो त्यावेळीं कोणा एखाद्या अनंतानुबंधी कषायाच्या उदयानें नाश झाले आहे सम्यक्त्व ज्याचे असा जीव सासादनगुणस्थानवर्ति ह्मणविला जातो.

**३ मिश्रगुणस्थानः**—सम्यग्मिथ्यात्व प्रकृतीच्या उदयाने जीवाचे केवल सम्यक्त्वरूप परिणामहि होत नाहींत व केवल मिथ्यात्वरूप परिणामहि होत नाहींत, परंतु मिश्र केलेल्या दही आणि गुळाप्रमाणे एका वेगळ्याच जातीचे मिश्र परिणाम होतात त्यास मिश्रगुणस्थान ह्मणतात. या गुणस्थानीं श्रद्धान मलिन व मिथ्यात्वाची मिसळ असते ह्मणून ह्याला **मिश्रगुणस्थान** ह्मणतात.

**४ अविरतसम्यग्दृष्टि गुणस्थानः**—दर्शनमोहनीयाच्या तीन व अनंतानुबंधीच्या चार अशा सात प्रकृतीचा उपशम, क्षय अथवा क्षयोपशम, आणि अप्रत्याख्यानावरण क्रोध, मान, माया, लोभ याचा उदय झाल्यानें व्रतरहित सम्यक्त्वधारण करणारा जीव चतुर्थ गुणस्था-

नवर्ती होतो. आपलें खरे हित काय आहे हें कळून त्याप्रमाणें श्रद्धा बसली ह्मणजे त्याला तिसरे अथवा चौथे गुणस्थान प्राप्त होतें. चवथ्या गुणस्थानीं ही श्रद्धा निर्मळ असते ह्मणून ह्याला सम्यक्त्वगुणस्थान ह्मणतात. तिसऱ्या अथवा चवथ्या गुणस्थानापासून कधीं कधीं पुन. पहिल्या गुणस्थानांत जातो. तेव्हा जोपर्यंत पहिल्या गुणस्थानी पोहोचला नाहीं तोंपर्यंत ते सासादन नावाचे दुसरे गुणस्थान होय. चवथ्यापर्यंत नुसती यथार्थ श्रद्धा असली ह्मणजे पुरे आहे.

**५-६ देशविरतनामक गुणस्थानः**—प्रत्याख्यानावरण क्रोध मान माया लोभाच्या उदयानें यद्यपि सयमभाव होत नाही तथापि अप्रत्याख्यानावरण क्रोध मान माया लोभ याच्या उपशमामुळे श्रावकव्रतरूप देशचारित्र होते. यालाच देशविरतनामक पाचवे गुणस्थान ह्मणतात. पाचव्याला आरभ करून पुढील सर्व गुणस्थानात सम्यग्दर्शन, व सम्यग्दर्शनाला कधींहि सोडून नसणारे असे सम्यग्ज्ञान अवश्य होते. याशिवाय, पाचवे, सहावे वगैरे गुणस्थान मुळीच सभवणार नाही. पाचव्या गुणस्थानी श्रावकांची अहिंसा, सत्य, अचौर्य वगैरे अणुव्रते, गुणव्रते, शिक्षाव्रते वगैरे अकरा प्रतिमापर्यंत आचरण असते. नुसते एक अणुव्रत असलें तरी त्याला पाचवे गुणस्थान असणार व सपूर्ण अकरा प्रतिमेचे आचरण पाळित असला तरी त्याला पाचवेच गुणस्थान राहणार. ह्याचे नाव सयतासयत गुणस्थान असे आहे. पुढे मुनीची महाव्रते पाळू लागणे ह्मणजे त्याला सहावे **प्रमत्तविरत गुणस्थान** ह्मणतात. येथे प्रमादाचे दोष घडतात. सज्वलन आणि नोकषाय यांच्या तीव्र उदयाने सयमभाव आणि मलजनक प्रमाद हे दोन्ही युगपत् उत्पन्न होतात. ह्मणून या गुणस्थानवर्ती मुनीला प्रमत्तविरत अथवा चित्रलाचरणी ह्मणतात.

**७ अप्रमत्तविरतः**—सज्वलन आणि नोकषाय यांच्या मद उदयाने प्रमादरहित सयमभाव होतात ह्मणून या गुणस्थानवर्ति मुनीला अप्रमत्तविरत ह्मणतात.

**८ अपूर्वकरण गुणस्थानः**—पुढे योगसाधनांनीं ध्यानाची एकाग्रता वाढत जाते व कर्मबंधनाचा नाश झपाट्यानें होत जातो. ह्मणून आठव्या गुणस्थानाला अपूर्वकरण ह्मणतात. ह्मणजे ह्याची वृत्ति ( परिणाम–करण ) पूर्वी कधींच झाली नाहीं अशी होते.

**९ अनिवृत्तिकरण**—नावाचे गुणस्थान आहे. येथे परिणामामध्ये विशेष फेरफार होत नाहीत. प्रतिसमयी अनंतपटीनें विशुद्ध होत जाणारा साधु विशुद्धलब्धीच्या बळाने ह्या गुणस्थानाची प्राप्ति करून घेतो.

**१० सूक्ष्मसांपराय**—येथे कषाय सगळे सूक्ष्म होतात. अत्यंत सूक्ष्म अवस्थेला प्राप्त झालेल्या व लोभकषायाच्या उदयाचा अनुभव घेणाऱ्या जीवाला सूक्ष्मसांपराय नामक दहावे गुणस्थान प्राप्त होते.

**११ उपशांतमोह-गुणस्थान**—चारित्रमोहनीयाच्या २१ प्रकृतींचा उपशम होण्यानें यथाख्यातचारित्र धारण करणाऱ्या मुनीला हें अकरावें उपशांतमोह गुणस्थान प्राप्त होते. या गुणस्थानाचा काल समाप्त झाल्यानंतर मोहनीयकर्माच्या उदयाने जीव खालच्या गुणस्थानात येतो. या गुणस्थानी कषायाचा उपशम होतो. तेथून पुन. खाली सहाव्या अथवा सातव्या गुणस्थानी जाण्याचा संभव आहे.

**१२ क्षीणमोह गुणस्थानः**— मोहनीयकर्माचा अत्यंत क्षय झाल्याने स्फटिकमण्याच्या पात्रामधील पाण्याप्रमाणे अत्यंत निर्मल, अविनाशी व यथाख्यात चारित्राला धारण करणाऱ्या मुनीला क्षीणमोह नामक गुणस्थान प्राप्त होते. या गुणस्थानीं मोहनीय, ज्ञानावरणीय, दर्शनावरणीय व अंतराय अशा चार घातिकर्मांचा संपूर्णपणे नाश करावा लागतो ह्मणून याला क्षीणमोह गुणस्थान ह्मटले आहे या गुणस्थानीं एक सातावेदनीचा मात्र बंध होतो. येथें शुक्लध्यानाच्या चार भेदापैकीं पहिले पृथक्त्ववितर्कविचार आणि एकत्ववितर्कअविचार असे दोन भेद असतात. पहिल्या ध्यानात तिन्ही योग असतात व दुसऱ्या ध्यानांत तिन्हीपैंकीं कोणता तरी एक योग असतो.

**१३ सयोगकेवली नामक गुणस्थानः**—हे वरील एकाग्र-ध्यानाच्या बळाने प्राप्त होतें. घातियाकर्मांच्या ४७ व अघातियाकर्मांच्या १६ मिळून ६३ प्रकृतींचा क्षय झाल्याने लोकालोकप्रकाशक केवलज्ञान आणि मनोयोग, वचनयोग व काययोग याला धारण करणाऱ्या अरहत भट्टारकाला **सयोगकेवली** नावाचे तेरावें गुणस्थान प्राप्त होते. तेराव्या गुणस्थानीं केवलीजिनाला दान, लाभ, भोग, उपभोग, वीर्य, सम्यक्त्व, दर्शन, ज्ञान आणि चारित्र ह्या नऊ लब्धि प्राप्त होतात. १ दानांतरायकर्मांच्या क्षयाने दान ( अनंत प्राण्यावर अनुग्रह करणारे अभयदान ) नावाची लब्धि प्राप्त होते. २ लाभांतरायकर्मांच्या क्षयाने लाभ ( केवलीच्या शरीरास बल देण्यास कारण असे अत्यंत शुभ व सूक्ष्म असे अनंत पुद्गल प्रतिसमयीं संबंध पावतात तो लाभ ) नावाची लब्धि प्राप्त होते. ३ भोगांतरायकर्मांच्या क्षयाने भोग ( पुष्पवृष्टि, गंधोदकवृष्टि वगैरे ) नावाची लब्धि प्राप्त होते. ४ उपभोगांतरायकर्मांच्या क्षयाने उपभोग ( सिंहासन, छत्र, चामर वगैरे ) नांवाची लब्धि प्राप्त होते. ५ वीर्यांतरायकर्मांच्या क्षयाने वीर्य ( जाणण्याचे व पहाण्याचे सामर्थ्य ) नावाची लब्धि प्राप्त होते. ६ सप्त प्रकृतींच्या क्षयाने सम्यक्त्वलब्धि प्राप्त होते. ७ पंचवीस कषायांच्या नाशाने चारित्रलब्धि प्राप्त होते. ८ केवलदर्शनावरण कर्मांच्या क्षयाने दर्शनलब्धि आणि ९ केवलज्ञानावरण कर्मांच्या नाशाने ज्ञानलब्धि प्राप्त होते. येथे अनंतदर्शन, अनंतज्ञान, अनंतसुख आणि अनंतवीर्य असतात. हें केवलज्ञान झालें ह्मणजे स्वर्गांतून कुबेरादिक इंद्र येऊन समवसरण रचतात. बारा सभा एकत्र होतात. हेच केवलीभगवान् आपल्या दिव्यध्वनीने भव्यजीवाला मोक्षमार्गाचा उपदेश करून संसारांत मोक्षमार्ग प्रकाशित करितात. त्या स्थितींत अरहंत, परमेश्वर, भगवान्, सर्वज्ञ, प्रभु, परमहितोपदेशकर्ता इत्यादि नावानी इंद्र, चक्रवर्ति वगैरे सर्व लोक त्याची स्तुति व पूजन करितात. पुढें हे केवली तेथून दुसऱ्या ठिकाणीं जातात व उपदेश करितात. अशीं कित्येक वर्षे उपदेश करून

आयुष्य जवळ आले असे पाहून शुक्लध्यानापैकी तिसरा भेद 'सूक्ष्मक्रियाप्रतिपाति' नावाचे ध्यान करू लागतात त्याच्यायोगाने आत्म्याचे प्रदेश सगळ्या त्रैलोक्यात पसरून पुन: स्वत च्या शरीरापुरते सकोचतात. येथे नुसता काययोगच असतो. व मग चवथा भेद व्युपरतक्रियानिवर्ति नावाचे शुक्लध्यान धरितात.

**१४ अयोगकेवली गुणस्थान** येथे योग कोणताहि नसतो ह्मणून ह्याला अयोगकेवली म्हणतात. मनवचनकायेच्या योगविरहित केवलज्ञानसहित अरहत भट्टारकाला चवदावे गुणस्थान प्राप्त होते. येथे आत्म्याचे एकाग्र करून देहविसर्जन करावयाचे. शरीर कापरासारखे जेथल्यातेथेच जळून जाते, ह्याला निर्वाण ह्मणतात. आत्मा निघून तीन लोकाच्या अग्रभागी सिद्धशिला नावाची जागा आहे तेथे जातो. तो पुन. परत येत नाही. त्या स्थितीला मोक्ष ह्मणतात. येथे अनतानत **सिद्धजीव** अनादिकालापासून आहेत व ते अनतकाल राहणार. ह्यांचे आठ गुण सांगितले आहेत.— **१ सम्यक्त्व, २ अनंतज्ञान, ३ अनंतदर्शन, ४ अनंतवीर्य, ५ सूक्ष्मत्व, ६ अवगाहनत्व, ७ अगुरुलघुता** आणि **८ अव्याबाधता.** ह्याप्रमाणे मोक्षाचे स्वरूप आहे. गुणस्थाने जी चवदा सांगितली ती क्रमाने चढत चढत मोक्षपदाला पोहोचावयाचे हाच त्याचा उपाय आहे. असो. आता मोक्षाचे वर्णन करितो.

## मोक्षतत्त्व.

### बन्धहेत्वभावनिर्जराभ्यां कृत्स्नकर्मविप्रमोक्षो मोक्षः ।

बधाच्या कारणाचा अभाव आणि निर्जरा यांच्याद्वारे सपूर्ण कर्माचा अत्यताभाव ( नाश ) होणे यास **' मोक्ष '** ह्मणतात. मोक्ष हा केवलज्ञानपूर्वक होतो. ह्मणजे प्रथमत केवलज्ञान प्राप्त होते. व नतर मोक्ष प्राप्त होतो. ह्मणजे ज्ञानावरणीय, दर्शनावरणीय, मोहनीय व अतराय ह्या चारी घातियाकर्माचा सर्वथा नाश झाल्यानतर केवलज्ञान प्राप्त होते. आणि नतर आयु, नाम, गोत्र, व वेदनी या चार अघा-

तिया कर्मांचा नाश होऊन मोक्षप्राप्ति होते. **अरहंतावस्थेमध्यें** चार अघातिया कर्मे असू शकतात. पण **सिद्धावस्था** अथवा मोक्षावस्था प्राप्त झाल्यानंतर कोणत्याच प्रकारचे कर्म शिल्लक राहत नाही. संपूर्ण कर्मांचा नाश झाल्यानंतर मुक्तजीव लोकांच्या अंतभागापर्यंत ह्मणजे सिद्धशिलेपर्यंत जातो. अलोकाकाशात धर्मद्रव्याचा अभाव असल्यामुळें आत्म्याचें गमन पुढे होत नाही. ह्मणजे लोकाबाहेर गति न झाल्यामुळे लोकाच्या अंती जी पंचेचाळीस लाख योजनांची एक सिद्धशिला आहे तेथपर्यंत मुक्तजीव येऊन त्या मोक्षधामावर थांबतात. त्या मुक्तात्म्याच्या ठिकाणी रागद्वेषादिकांचा संपूर्ण अभाव होतो व त्यामुळें पुनः सिद्धात्म्याला कर्मबंध होत नाही. आणि ह्मणूनच या चतुर्गतिरूप संसारामध्ये त्याचे परिभ्रमण होत नाहीं. मोक्षामध्ये तो नेहमीं अविनाशी, अतींद्रिय, व निराकुल सुखाचा अनुभव घेत असतो. केवलसम्यक्त्व, केवलज्ञान, केवलदर्शन, आणि केवलसिद्धत्व या चार भावाशिवाय दुसऱ्या भावाचा मुक्तजीवाचे ठिकाणी अभाव आहे. याठिकाणी असा प्रश्न उत्पन्न होतो की–' जर मुक्तजीवांना हे चार भावच शिल्लक राहतात तर अनंत वीर्यादिकांचा त्याचे ठिकाणी अभाव प्राप्त झाला, व तो तर तुह्मास मान्य नाही. ' याचे उत्तर,–'अनंत वीर्यादिकांचा, अनंतज्ञान व अनंतदर्शन याजबरोबर अविनाभावी संबंध आहे. ह्मणजे ज्याठिकाणी अनंतज्ञान व अनंतदर्शन असते त्याठिकाणी अनंतवीर्य व अनंतसुख हेहि नियमाने असतेच. कारण अनंतसुख व अनंतवीर्य हे जीवाचे ठिकाणींच संभवते. अन्य जड पदार्थामध्ये हे असणें संभवनीय नाही. ह्मणून ज्याअर्थी हे जीवांतच होते त्याअर्थी जीव हा अनंतज्ञानमय आहे. ज्ञानाशिवाय अन्य जड पदार्थांना सुखाभास होणे शक्यच नाहीं.' आत्म्याला मुक्तावस्थेमध्यें संकल्प विकल्परूप भाव नसतात. अर्थात् **'ममेदं, तवेदं'** ह्मणजे 'हें माझें' 'हें तुझे' हे परिणाम त्यात राहत नाहींत. औपशमिक, क्षायोपशमिक, औदयिक, आणि भव्यत्व या चार प्रकारच्या भावाचा व पुद्गल

कर्मांच्या सर्व प्रकृतींचा नाश झाल्यानंतर मोक्ष होतो. सिद्धावस्थेमध्ये शरीर नाहींसे होऊन नुसता अनंतज्ञानमय आत्मा मात्र राहतो. येथे आत्मा हा शुद्धबुद्धचिदानंद परमात्मस्वरूपीं तल्लीन होऊन जातो. त्यामुळें आधिभौतिक दुःखें व मानसिक तळमळ पार लयास जाते. सारांश थोडक्यात मोक्षाची कल्पना सांगावयाची ह्मणजे ती अशी आहे. मोक्ष ह्मणजे फक्त, मनुष्यानें आपल्याच अज्ञानानें स्वतःवर लादून घेतलेल्या जडदेहाविषयींच्या स्वीयबुद्धीतून व बाह्य विषयाच्या संबंधानें कर्तृत्वभोक्तृत्वाच्या अभिमानांतून आपली मुक्तता करून घेणें व आपलें मूळ, सदास्थिर व सच्चिदानंदमय स्वरूप ओळखणें हाच खरा **मोक्ष** होय. वस्तुतः मनुष्य हा मूळचाच **शुद्ध, बुद्ध, मुक्त** व **परिपूर्णस्वरूप** आहे. परंतु तें समजण्यासाठीं आपल्यावर अज्ञानानें ओढून घेतलेल्या ज्ञानावरणादि आठ कर्मांचा संपूर्ण नाश करून—अर्थात् या आवरणाचा त्याग करून—बाहेर येणें हें त्यास आवश्यक असल्यामुळें तेवढ्या क्रियेपुरता मोक्ष हा शब्द औपचारिक रीतीनें योजण्यांत येतो. असो. येथपर्यंत मोक्षाचें जें विवेचन केलें त्यावरून मोक्षाचें स्वरूप ध्यानांत आलें असेलच. याप्रमाणें जीवादि सात तत्वांचें संक्षेपतः वर्णन झालें. या सात तत्वांचें ज्ञान होण्याकरितां ह्मणून आपण शास्त्रस्वाध्याय केला पाहिजे. प्राधान्येंकरून चार अनुयोगांपैकीं द्रव्यानुयोगाचें सूक्ष्म अवलोकन व सतत अभ्यास करण्याची अत्यंत आवश्यकता आहे. जीव, अजीव, आस्रव, बंध, संवर, निर्जरा व मोक्ष यांमध्यें **पुण्य** व **पाप** मिळविलें ह्मणजे **नऊ पदार्थ** होतात. जैनांच्या प्राचीन महर्षींनी पुण्य व पाप यांच्या बंधनाचें कारण परिणाम होत असें ठिकठिकाणीं प्रतिपादन केलेलें आढळून येतें. उदाहरणार्थ—**महापुराण** पर्व वीसमध्यें असें ह्मटलें आहेः—

'**कारणं परिणामः स्याद्बंधने पुण्यपापयोः**' ह्मणजे पुण्य व पाप यांच्या बंधनाला कारण चित्ताचे शुभाशुभ परिणाम होत. अर्थात् चित्ताचे परिणाम शुभ असले तर पुण्यबंध होतो. व तेच

अशुभ असले ह्मणजे पापबध होतो. **गुणभद्राचार्यांनी** आपल्या सर्वमान्य आत्मानुशासनग्रथामध्येहि ह्मटले आहे·—

**परिणाममेव कारणमाहुः खलु पुण्यपापयोः प्रज्ञाः ॥**
**तस्मात् पापापचयः पुण्योपचयश्च सुविधेयः ॥ २३ ॥**

**अर्थः**—पुण्य व पाप याचे कारण परिणाम आहेत. याकरितां पापाचा नाश व पुण्याचा सचय करणेच योग्य आहे. असो. हा आत्मा ( जीव ) सर्वज्ञ, सर्वशक्तिमान्, अनादि व असख्यात गुणांनीं युक्त आहे. व कर्म हे जड आहे. कर्माचा आत्म्याशी सबध झाला ह्मणजे कर्म आत्म्याला बांधून टाकते, व आत्म्याचे काही गुण छपविते. आणि ह्यालाच जैनाच्या पूर्वाचार्यांनी जैनागमात **'कर्मावरण'** ही सज्ञा दिली आहे. कर्माच्या बधनामुळे आत्मा आपले आत्मस्वरूप विसरून जातो, व आपले यथार्थ स्वरूप वस्तुत. जसे आहे त्याविरुद्ध आहे अशी आपली स्वत·ची समजूत करून घेतो. अशा आत्म्याला बहिरात्मा म्हणतात. जीव तीन प्रकारचे आहेत. **१ बहिरातम, २ अंतरातम, ३ परमातम.**

१ जो शरीर व आत्मा एकच आहे अर्थात् या देहास व पुत्रमित्रकलत्रादि परिवारास आपले असे ह्मणतो तो **बहिरात्मा** (मिथ्यादृष्टि) जीव होय.

२ जो आत्म्याचे (जीवाचे) स्वरूप ओळखतो अर्थात् देहादिक हे आत्मभिन्न होत असे जाणतो तो **अंतरात्मा** (सम्यग्दृष्टि) जीव होय. ह्याचे तीन प्रकार आहेत. उत्तम, मध्यम, व जघन्य. जे चोवीस प्रकारच्या परिग्रहरहित, शुद्ध परिणामी व आपल्या आत्म्याचे ध्यान करणार आहेत ते उत्तम. ( अतएव आत्मध्यानी मुनि उत्तम. ) मध्यम अतरात्मा देशव्रती गृहस्थ आहे. जघन्य व्रतरहित सम्यग्दृष्टि आहे. हे तिन्ही अतरात्म मोक्षमार्गाला जाणार आहेत.

३ अतर्बाह्य उपाधिरहित शुद्ध अवस्थेला पोहोचलेला जीव **परमात्मा** जाणावा. परमात्म्याचे दोन भेद आहेत. एक सकल-

परमात्मा व दुसरा निकलपरमात्मा. ज्यांनीं ज्ञानावरणी, दर्शनावरणी, अंतराय व मोहनी या चार घातियाकर्मांचा नाश केला आहे, जे लोक व अलोक पाहणारे आहेत असे **श्रीअरहंत भगवान्** शरीरसहित **सकलपरमात्मा** आहेत. व ज्ञान हेंच ज्याचें शरीर आहे,' जे द्रव्यकर्म, भावकर्म व नोकर्म या तीन प्रकारच्या कर्ममलापासून रहित आहेत, असे महान् **सिद्धभगवान्** निर्मल जडशरीररहित **निकलपरमात्मा** हे अनंतकालपर्यंत सुख भोगणारे आहेत. ह्मणून बहिरात्म्याला त्याज्य ह्मणून सोडून द्या. व अंतरात्मा होऊन नेहमीं दोन प्रकारच्या परमात्म्याची सेवा करा ह्मणजे त्यायोगानें आपणाला निरंतर सुख प्राप्त होईल.

## आठ कर्में.

१ ज्ञानावरण, २ दर्शनावरण, ३ मोहनीय, ४ अंतराय, ५ आयु, ६ वेदनीय, ७ नाम व ८ गोत्र अशीं आठ कर्में आहेत ह्मणून पूर्वी सांगितलेंच आहे. प्रत्येकाचें थोडक्यांत येथें वर्णन केलें आहे.

## ज्ञानावरणकर्म.

ज्ञानावरणीचा स्वभाव आत्म्याचें ज्ञान आच्छादन करण्याचा आहे. ह्याचा स्वभाव पडद्याप्रमाणें आहे. ज्याप्रमाणें पडदा ( आवरण ) पडल्यानें आपणाला पदार्थ बरोबर दिसत नाहीं, अर्थात् देवतामुख पडदा पडल्यामुळें ज्याप्रमाणें झाकलें जातें त्याप्रमाणें ज्ञानावरणीकर्मपुद्गल ज्ञान होऊं देत नाहीं. हें कर्म आत्म्याच्या ज्ञानगुणाचा घात करितें. आत्म्यावर कोणत्याहि प्रकारचें आवरण उर्फ आच्छादन नसतें तर एका वेळीं संसारामधील तिन्ही काळांतील सर्व पदार्थांचें ज्ञान होण्याची शक्ति आत्म्यामध्यें आहे. परंतु ह्या कर्मांनीं आच्छादिला गेल्यामुळें त्याची ज्ञानशक्ति अंशतः झाकून गेली आहे. ज्ञानावरणीकर्मांचें व दर्शनावरणीकर्मांचें आस्रव होण्याचीं कारणें.—

१ **प्रदोषः**- कोणी पुरुष मोक्षाला कारणीभूत अशा जीवादि

१ **तत्प्रदोषनिन्हवमात्सर्यान्तरायासादनोपघाता ज्ञानदर्शनावरणयोः ॥ १० ॥** —( तत्वार्थसूत्र अ. ६. )

तत्वांचे निरूपण करीत असेल तें ऐकून ईर्षाभावाने त्याची प्रशंसा न करणे, मौन धरून बसणे, ह्याला ' प्रदोष ' ह्मणतात.

२ **निन्हवः**—स्वत शास्त्राचा ज्ञाता असूनहि कोणी एखाद्याने एखाद्या वस्तूचे स्वरूप विचारिले असतां मला माहित नाहीं, असें ह्मणून आपले ज्ञान छपविणें यास ' निन्हवभाव ' ह्मणतात.

३ **मात्सर्यः**—हा शिकून पंडित झाला तर माझी बरोबरी करील ह्या हेतूने कोणालाहि न शिकविणे यास 'मात्सर्यभाव' ह्मणतात.

४ **अंतरायः**—सर्वार्थसिद्धि ग्रथात ह्मटले आहे—**ज्ञानव्ययेच्छदकरणमन्तरायः** । ज्ञानाभ्यासामध्ये' विघ्न करणे, व ज्या योगाने ज्ञानाचा प्रसार होत असेल त्या कार्यात विरोध करून ते कार्य बिघडून टाकणे यास ' अंतरायभाव ' ह्मणतात.

५ **आसादनः**—दुसऱ्याने प्रगट केलेल्या ज्ञानाला रोकणे ह्मणजे आताच तुह्मी प्रसिद्ध करू नका असे ह्मणणें याला 'आसादनभाव' ह्मणतात.

६ **उपघातः**—प्रशसनीय ज्ञानाला दूषण लावणे याला उपघात ह्मणतात. या सहा कारणानी जर ज्ञानासबधी असेल तर ज्ञानावरणी कर्माचे व दर्शनासबधी असेल तर दर्शनावरणी कर्माचे आस्रव होतात. याशिवाय पंडिताचा व विद्वानांचा अपमान करणें, सद्सद्विवेकबुद्धीचा खून करून खोटा उपदेश करणे, मत्सराने, स्वार्थबुद्धीने प्रेरित होऊन निंदाव्यंजक लेख प्रसिद्ध करून एखाद्या माहात्म्यावर खोटे दोषारोप करणे व खोटी शास्त्रें छापविणे, मी सर्वात विद्वान् ह्मणून गर्व करणे, इत्यादि सर्व कृत्ये ज्ञानाभ्यासाला रोकणारीं असल्यामुळे ज्ञानावरणी कर्माचे आस्रव होतात. आपल्या प्राचीन शास्त्रामध्यें ज्ञानाचे महत्व किती सांगितले आहे याची कल्पना आपणाला ह्यावरून चांगली येईल. आपली शास्त्रे कठरवाने सांगत आहेत, " **ज्ञानात् सुखं जायते** " ज्ञानापासून सुख मिळते. **जं अण्णाणी कंम खवेदि भव सयसहस्स कोडिं। तं णाणि तिहि गुत्तो खवेदि अंतो मुहुत्तेण॥**

असे **शिवकोटि** मुनि आपल्या भगवतिआराधना नामक ग्रथांत ह्मणतात. याचाच अनुवाद एका हिंदी कवीने केला आहे:—

**कोटिजन्म तप तपै ज्ञान विन कर्मकरैं जे ।**
**ज्ञानीके छिनमे त्रि गुप्तिंतें सहज टरैं ते ॥**

ह्मणजे अज्ञानी मनुष्य क्रोड वर्षपर्यंत तप करून जितक्या कर्मांचा क्षय करू शकतो तितक्या कर्मांचा क्षय ज्ञानी मनुष्य एका निमिषार्धात तप करून करू शकतो. तसेंच रयणसार ग्रथांत ह्मटलें आहे:—

**णाणेण झाणसिज्झी झाणादो सव्वकम्मणिज्जरणम् ।**
**णिज्जरणफलं मोक्खसुदं णाणब्भासं तदो कुज्जा ॥३७॥**

ज्ञानें करून आत्मध्यानाची सिद्धि होते, व आत्मध्यान केल्याने कर्मांची निर्जरा होते. निर्जरेचें फल मोक्ष, याकरिता तुह्मी ज्ञानाचा अभ्यास करा. कारण मोक्षप्राप्तीस परंपरेने मूळकारण ज्ञान होय. सध्यां आपल्या समाजात किती अज्ञान आहे हे नव्याने सांगण्याची आवश्यकता नाही. आपण अज्ञान असल्यामुळे आपला धर्म, कर्म, राज्य व संपत्ति सर्व गमावून बसलो आहोत. आपला व्यापारहि सध्या आपल्या हातात नाहीं; आह्मी परदेशच्या व्यापाऱ्यांचे नुसते हमाल उर्फ दलाल बनलो आहोत. आमच्या सर्व कारखान्यांचा व उद्योगधंद्यांचा नायनाट झाला. आमची शेती निकृष्टावस्थेस जाऊन पोहोचली आहे. आमची कला नामशेष झाली आहे. एका पाश्चात्य लेखकाच्या भाषेत लिहावयाचे ह्मणजे 'Drawers of water and hewers of wood' पाणके व लांकुडतोडे आह्मी बनलों आहोत. हा सर्व परिणाम कशाचा? ह्याचे खापर बहुतांशी आपल्या अज्ञानाच्या माथींच फोडिलें पाहिजे. तीच जपानाने चाळीस वर्षात विद्या-शास्त्र—कलांचा एकनिष्ठ अभ्यास करून, स्वदेश—स्वधर्म—स्वभाषादिकांची केवढी उन्नति केली? जपानचे लोक बौद्धधर्मी आहेत. व तेहि आह्मा जैनांप्रमाणें ज्ञान ही महान् शक्ति आहे असे समजतात. जपानाची आज जगांतील बलाढ्य राष्ट्रांमध्ये गणना होते

याचें कारण विद्येचा प्रसारच होय. ता. २८ एप्रील १९०४ च्या ॲडव्होकेटमध्ये धर्मपाल नावाच्या इसमाने एक लेख लिहिला आहे त्यांमध्ये तो ह्मणतो, " There are no illiterete children in the land of the rising sun. " ह्मणजे जपानमध्ये अशिक्षित मुलगा आढळून येत नाहीं. नाहीतर आमच्या दयाळु आंग्ल सरकाराकडे पहा. इंग्रजसरकारचे या आर्यावर्तावर राज्य होऊन एक शतक झालें. त्या अवधीमध्ये इकडे ज्ञानाचा केवढा प्रसार झाला तो पहा! पांच खेड्यापैकी चार खेड्यात अद्याप शाळा नाहीत. सारांश, आह्मी शिक्षणाच्या बाबतीत फारच मागासलेले आहोत. प्राथमिक शिक्षण सक्तीचे व मोफत श्री. सयाजीरावासारख्या मांडलिक राजाने सुरू करावे व सुधारलेल्या सरकारानें तिजोरीत पैसे शिल्लक नाहीत ह्मणून ह्मणावें हे आश्चर्य होय ! असो. सरकार करो वा न करो. आपण ते काम हाती घेऊन लौकिक व धार्मिक शिक्षण देण्यास सुरवात केली पाहिजे. एका पिढीनें दुसऱ्या पिढीस देण्यासारखी महत्वाची देणगी ह्मणजे सामर्थ्य उत्पन्न करणारे ज्ञान होय. अनेक वर्गातील कोट्यावधि लोक निरक्षर असल्यामुळे ज्ञान मिळविण्याच्या मुख्य साधनाच्या अभावी आपली सामाजिक, सांपत्तिक व राजकीय स्थिति सुधारून घेण्यास असमर्थ आहेत. त्यांना सज्ञान करून त्यांस राष्ट्रमंदिरात योग्य जागा करून देणे यापेक्षा राज्यकर्त्यास अथवा लोकनायकास दुसरे आवश्यक अथवा अधिक भूषणावह काम प्राप्त होणें अशक्य आहे. ह्मणून ज्ञानमंदिरें उघडा; पाठशाळा ठिकठिकाणी स्थापन करून लोकांना सज्ञान करा एवढीच आमची सविनय प्रार्थना आहे. सर्व प्रकारच्या उन्नतीचा व सुधारणेचा शिक्षण हा **प्राणवायु** आहे हें ध्यानात ठेवून ज्ञानार्जन करा व करण्याचा उपदेश करा. असे केलें तरच आपणाला ज्ञानावरणी कर्माचे आस्रव होणार नाहींत. एरवीं आपला आत्मा ज्ञानावरणी कर्माने बद्ध झाल्यामुळे आपणाला इहलोकीं परवशतेच्या नरकयातना व परलोकी नरकाच्या यातना भोगाव्या

लागतील. ह्मणून '**अजरामरवत्प्राज्ञो विद्यामर्थं च साधयेत्**' ह्या उक्तीप्रमाणे आपले आचरण ठेवा.

## दर्शनावरणीकर्म.

दर्शनावरणीचा स्वभाव आत्म्याच्या दर्शनाला आच्छादन करण्याचा आहे. राजाची भेट घेण्यास ज्याप्रमाणे द्वारपाल रोकतो त्याप्रमाणे दर्शनावरणीकर्म दर्शन होऊ देत नाहीं, अर्थात् आत्म्याचे श्रद्धान होऊं देत नाही. दर्शनावरणीयप्रकृतीचे नऊ भेद आहेत. त्याचें वर्णन तत्वार्थसूत्रामधून पहावे. ज्या सहा कारणानी ज्ञानावरणकर्माचे आस्रव होतात त्याच कारणानी दर्शनावरणीयकर्माचेहि आस्रव होतात. दर्शनावरणीयकर्म आत्म्याच्या दर्शनगुणाचा घात करिते, अर्थात् त्यामुळे आत्म्याची अनत दर्शनशक्ति झाकली गेली आहे. सम्यग्दृष्टि माणसाला दूषण लावणे, दिवसा निजणे, आळशी बनणे, एखाद्याने शास्त्रे, धर्मग्रथ वगैरे वाचावयास अथवा पाहण्यास मागितली असताना त्याला ती न देणें, कुतीर्थांची प्रशसा करणें, जीवांचा वध करणें, सयमी मुनींना पाहून ग्लानि येणें इत्यादि दर्शनावरणीकर्माच्या आस्रवाची कारणें आहेत. ह्या कर्माचा बध होऊ नये ह्मणून आपण आपल्या मनवचनकायेवर दाब ठेवावा. ह्यावरून आपणाला कळून चुकलें असेल की, आळस व प्रमाद ही दर्शनावरणीकर्माच्या आस्रवाची मुख्य कारणे आहेत. ह्मणून आह्मी आळस व प्रमाद सोडून देऊन धर्म, अर्थ, काम, व मोक्ष हे जे चार पुरुषार्थ सागितले आहेत ते साध्य करण्याकरिता झटलें पाहिजे. जर आमच्या सध्यांच्या जैनसमाजाचे पुढारी, विद्वान व शास्त्रज्ञ माणसे ज्ञानदर्शनावरणीकर्माच्या आस्रवाची कारणे सोडून देऊन उद्योगी बनतील, पुरुषार्थांच्या सिद्ध्यर्थ प्रयत्न करतील, तर थोड्याच दिवसांत आमच्या जैनसमाजाची उन्नति होईल, परतु आमच्यांतील समाजाग्रणी आपल्या महान् आचार्यांनी सागितलेल्या सदुपदेशाकडे द्यावे तितके लक्ष देत नाहीत, ही मोठी दु:खाची गोष्ट आहे!

## वेदनीयकर्म.

वेदनीयकर्माचा धर्म आत्म्याला सुखदुःख उत्पन्न करण्याचा आहे. वेदनीयकर्माचा स्वभाव शर्करेचा लेप लावलेल्या सुरीप्रमाणे आहे. ज्याप्रमाणे ती सुरी चाटली ह्मणजे गोड लागते, परतु शेवटी जीभ कापण्यास कारणीभूत होते त्याप्रमाणे वेदनीयकर्म थोडावेळपर्यंत साता ( सुख ) दाखवून असाताने (दुःखाने) पीडित ठेविते. वेदनीयकर्माचे १ **सातावेदनीय,** व २ **असातावेदनीय** असे दोन भेद आहेत.

१ ज्या कर्माच्या उदयाने जीवाला, देवगति, मनुष्यगति व तिर्यंचगतीमध्ये शारीरिक व मानसिक अशा अनेक प्रकारच्या सुखसामुग्रीची प्राप्ति होते त्यास **सातावेदनीयकर्म** ह्मणतात.

२ ज्या कर्माच्या उदयाने दुःखदायक सामुग्रीची प्राप्ति होते अर्थात् **'इष्टस्य वियोगोऽनिष्टस्य संयोगः'** ज्याच्यायोगाने होतो त्यास **असातावेदनीयकर्म** ह्मणतात.

१ दुःख, २ शोक, ३ ताप, ४ आक्रंदन, ५ वध, व ६ परिदेवन हे स्वत करणे, अथवा दुसऱ्याकडून करविणे, अथवा दोन्ही एकदम उत्पन्न करणे ह्याच्यायोगाने असातावेदनीयकर्माचे आस्रव होतात.

१ पीडारूप परिणामाला **दुःख** ह्मणतात.

२ आपल्यावर उपकारक द्रव्याचा वियोग झाल्यामुळे परिणामामध्ये मलीनता होणे, चिंता उत्पन्न होणे, खेदरूप होणे यास **शोक** ह्मणतात.

३ आपल्या हातून निंद्यकर्म झाल्यामुळे पश्चात्ताप करणे यास **ताप** ह्मणतात.

४ पश्चात्तापपूर्वक अश्रुपात करणे अथवा विलाप करणें अथवा रडणें यास **आक्रंदन** ह्मणतात.

५ आयु, इंद्रिय, बल, व प्राण याचा वियोग करणे यास **वध** ह्मणतात.

---

१ **दुःखशोकतापाक्रन्दनवधपरिदेवनान्यात्मपरोभयस्थान्यसद्वेद्यस्य ॥ ११ ॥** —( तत्वार्थसूत्र अ. ६. )

१ ज्यापासून ऐकणाऱ्याला दया उत्पन्न होईल असा विलाप करणें यास **परिदेवन** ह्मणतात.

याशिवाय बदनामी करणें ( Defamation ), चुगली करणें, कठोर परिणाम असणे, आपली प्रशसा करणें, दुसऱ्याची निंदा करणे, आरभ व परिग्रह यांमध्ये अतिशय ममत्व ठेवणे, प्राण्यांना विनाकारण दड करणे, विष पिणे व पाजविणे इत्यादि परिणाम असतावेदनीयकर्माच्या आस्रवाची कारणे आहेत.

(१) भूत ( Common human beings ) ह्मणजे चारी गतीतील जीव, व अहिसादिक व्रताला धारण करणारे व्रती याना जे दु ख होते ते आपणालाच होतें असे समजून ते नाहींसें करण्याची भावना होणे यास **'भूतव्रत्यनुकंपा'** ह्मणतात.

(२) परोकारार्थ खर्च करणे, यास **दान** ह्मणतात. आहारदान, औषधदान, अभयदान व विद्यादान असे चार दानाचे प्रकार आहेत.

(३) **सरागसंयमः**-दुष्टकर्मे नाहींसे करण्याची प्रीति असणे यास सराग ह्मणतात. अशा सरागीचें सयम त्यास सरागसयम ह्मणतात, अथवा रागसहित सयम यासहि सरागसयम ह्मणतात. सूत्रांतील 'आदि' शब्दाने सयमासंयम, अकामनिर्जरा व बालतप याचे ग्रहण करावे. पाच इद्रिये व मन यास वश करणे यास सयम म्हणतात. एकदेश त्याग करणे अथवा विषयाचे ठिकाणी प्रयोजनाशिवाय त्याग करण्याची भावना ठेवणे यास संयमासयम म्हणतात. आपल्या अभिप्रायाने त्याग न करिता पराधीनपणामुळें भोगोपभोगांचा निरोध होणें यास अकामनिर्जरा म्हणतात. तत्वाच्या यथार्थ स्वरूपाविषयीं अनभिज्ञ मिथ्यादृष्टीला बाल ह्मणावे. त्याचे जें तप ते बालतप होय.

(४) **योगः**—मनामध्ये शुभ परिणाम असणे, वचन हित-मित व प्रिय असणे व शरीर सत्कार्यी खर्चे करणे यास **योग** ह्मणतात.

---

१ **भूतव्रत्यनुकम्पादानसरागसंयमादियोगः क्षान्तिः शौचमिति ॥ १२ ॥** —( तत्वार्थसूत्र अ ६ )

(५) शुभपरिणामाच्या चिंतनाने क्रोधादिक कषायांचा अभाव होणे यास '**क्षांति**' अथवा क्षमा ह्मणतात.

(६) **शौच**:-लोभाचा त्याग करणे ह्मणजे शौच. या मुख्य सहा कारणानीं सातावेदनीय कर्माचे आस्रव होतात. याशिवाय अरहंताची पूजा भक्तिभावाने करणे, बालक, वृद्ध, तपस्वी व अनाथ विधवा यांचे रक्षण करण्यास झटणे, सरल परिणाम ठेवणें, विनय असणे, इत्यादि जे चांगले परिणाम व शुभ कार्याची आवड हीं सर्व सातावेदनीय कर्माच्या आस्रवाचीं कारणे होत. सातावेदनीय, शुभायु., शुभनाम, आणि शुभगोत्र ही पुण्याची चिन्हे आहेत, आणि दुसरी ह्मणजे असाता वेदनीय, अशुभायु, अशुभनाम, व नीचगोत्र हीं पापाची चिन्हे आहेत.

धर्मबंधूहो, हे वेदनीय कर्म जोपर्यंत नाहीसें झाले नाही तोंपर्यंत कधी सुख, व कधी दुःख या संसारात भोगावे लागते. व हें मोही मन त्यामध्ये लीन झाल्यामुळें आपल्या आत्मस्वरूपाला ओळखीत नाहीं. आत्मस्वरूपाला ओळखणे हे तर लांबच राहिले परंतु साता व असाता वेदनीय कर्माचे आस्रव होण्याची कारणे कोणकोणती आहेत याचा आपण कधी विचारहि केला नाही. आणि ह्मणूनच आपण बालविवाह निःशंकपणे करतो, वृद्ध विवाह करण्यास कचरत नाहीं, मुलांना विद्वान अथवा पंडित करण्याची आपणास जरूरी वाटत नाही, व समाजाची दिवसेंदिवस चोहींकडून अवनति होत असतानाहि खिचडी, दारू नाचरंग इत्यादि फाजील खर्च करण्यातच आपणांस धन्यता व भूषण वाटते' असो. जर एखादा महात्मा जैनधर्मांतील सदुपदेशाप्रमाणे वागण्याचा निश्चय करील तर त्यास अनंतसुख व शांतता याची निःसंशय प्राप्ति होईल.

## मोहनीकर्म.

मोहनीय कर्माचा स्वभाव आत्म्यामध्यें **मदिरेप्रमाणें** धुंदी उत्पन्न करण्याचा आहे. ह्मणजे स्वतःला पूर्ण विसरून जाऊन मोहामध्ये गुरफटून जाण्याचा आहे. ज्याप्रमाणे मदिरेमुळे मूर्छा येऊन

मनुष्य बेसावध होतो त्याप्रमाणें मोहनीकर्म आत्म्याला ससारांमध्ये भुल-वून टाकतें. ह्याचे दोन मूलभेद आहेत. १ दर्शनमोहनीय २ चारित्रमोहनीय.

**दर्शनमोहनीयकर्मा**च्या उदयाने आत्म्याचा सम्यग्दर्शन गुण झांकला जातो व **चारित्रमोहनीयकर्मा**च्या उदयाने आत्म्याचा सम्यक्चारित्र गुण झाकला जातो.

**केवलिश्रुतसंघधर्मदेवावर्णवादो दर्शनमोहस्य ॥ २५ ॥**

—( **तत्वार्थसूत्र** अ. ६. )

१ केवली, २ जैनशास्त्र, ३ मुनीचा सघ याची निंदा करणे, त्यांना दूषण देणे, व ४ अहिंसामय धर्म व ५ भवनवासी, व्यतर, ज्योतिष व कल्पवासी देव याचींहि निंदा करणे, व दूषण लावणे या परिणामांनी दर्शनमोहनीयकर्माचे आस्रव होतात. '**कषायोदयातीव्रपरिणामश्चारित्रमोहस्य**' ह्मणजे द्रव्यक्षेत्रकालभाव याला अनुसरून होणाऱ्या कषायाच्या उदयापासून क्रोध, मान, माया, लोभादिक परिणाम तीव्र होणे हे चारित्रमोहनीयकर्माच्या आस्रवाचे कारण आहे. याशिवाय आत्मज्ञानी तपस्वीची व सयमाची निंदा करणे, धर्माच्या साधनामध्ये अतराय आणणे, ब्रम्हचारी पुरुषाला त्याच्या व्रतापासून भ्रष्ट करणे, उत्तम चारित्रयुक्त, कीर्तिमान महात्म्याला दूषण लावणे, इत्यादिक तीव्र परिणामाची कार्ये आहेत, या सर्वांपासून चारित्रमोहनीयकर्माचे आस्रव होतात.

मोहनीयकर्माचे मुख्य भेद व त्या कर्माचे आस्रव होण्याचीं कारणे सांगितलीं आहेत:—

**लब्धेंधनोज्वलत्यग्निः प्रशाम्यति निरंधनः ।**
**ज्वलत्युभयताप्युच्चैरहो मोहाग्निरुत्कटः ॥**

—( **आत्मानुशासन** अ. ५६. )

**अर्थः**—अग्नि हा इंधन ह्मणजे लाकडानीं प्रज्वलित होतो. व त्याच्या अभावीं विझून जातो. मोहरूपी अग्नी फार प्रबळ आहे. परि-

ग्रहरूपी इंधनानें अति तृष्णारूप होतो. परतु, त्याची तृप्ति न झाल्यामुळें व्याकुळ होऊन प्रज्वलित होतो. या मोहाग्नीसारखा दुसरा अग्नि नाही. ह्मणून मोह सोडा. तो महादुःखदाक आहे. देहगेहादिकांच्या ठिकाणी मोह किंवा ममत्व उत्पन्न होणें हाच महामृत्यु होय. हितोपदेशात असें म्हटले आहे:—

**गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत् ।**

ह्मणजे मृत्यूने आपल्या केंसाला धरलें आहे, तो आतां आपल्याला घेऊन जाणार असें समजून नेहमींच **धर्म** आचरीत असावा. आणि मृत्यु वृद्धानाच नेतो व बालाना किंवा तरुणांना नेत नाहीं. असें थोडेच आहे ' '**मृत्यु न ह्मणे बाल, तरुण**' ही ओंवी प्रसिद्धच आहे. तेव्हां धर्मसाधन सर्व वेळीं सर्व स्थितींत केले पाहिजे. ह्मणून आपल्या आत्म्याचा उद्धार करण्याचा प्रयत्न करा. कुदेवाची ह्मणजे अबाबाई, तुकाई, काली, भवानी इत्यादि देवतांची स्वधर्मापासून च्युत होऊन पूजा करून, त्यांना आपले आदिदैवत अथवा कुलदैवत मानून त्यापासून आपले कांही हित होईल अशा प्रकारचा जो कांहीं आमच्या जैनबधूमध्ये व्यामोह उत्पन्न झाला आहे तो नाहीसा केला पाहिजे. सारांश, प्रत्येक मनुष्य या मोहनीय कर्मजालाच्या फांशामध्ये सांपडला आहे त्यामुळें त्याला या ससारामध्ये पुनःपुन परिभ्रमण करावें लागतें. नाना प्रकारचे दुःख भोगावे लागते; अनत यातना सोसाव्या लागतात. याकरितां ज्यायोगाने मोहनीय कर्माचे आस्रव होणार नाहीत असें वागणे प्रत्येकाचें कर्तव्यकर्म आहे. कारण मोहाचा नाश केला ह्मणजे सम्यक्त्व प्राप्त होतें.

## आयुकर्म.

आयुकर्माचा स्वभाव आत्म्याला कोणत्या तरी एका शरीरामध्ये कांहीं काल अडकविणे हा होय. जीवाने ससारामध्यें नानाप्रकारच्या योनींमध्ये भ्रमण करीत कालक्षेप करणें हें आयुकर्म होय. आयुकर्म आत्म्याच्या अवगाहन गुणाचा घात करिते. नरकायु, मनुष्यायु, तिर्य-

चायु, आणि देवायु अशा आयुकर्माच्या चार प्रकृति आहेत. ज्याच्या सद्भावाने नरकादि गतींमध्ये आत्मा जगतो व ज्याच्या अभावाने मरणाला प्राप्त होतो त्यास आयुकर्म ह्मणतात. आयुकर्माचा स्वभाव खोड्याप्रमाणें ( लांखडाच्या मोठ्या बिडीप्रमाणे ) आहे. ज्याप्रमाणे खोड्यामध्ये चोराचा पाय एकदा घातला ह्मणजे मग चोराला त्यांतून पाय बाहेर काढतां येत नाही त्याप्रमाणे आयुकर्म पुरें झाल्याशिवाय आत्मा नरकादि पर्यायामधून बाहेर निघू शकत नाही.

आता आयु.कर्माच्या आस्रवातून नरकायूच्या आस्रवाचे कारण सागतात. **बह्वारंभपरिग्रहत्वं नारकस्यायुषः ।** ह्मणजे पुष्कळ आरभ करणे आणि परिग्रहावर ममत्व ठेवणे ही नरकायूबंधनाच्या आस्रवाची कारणे आहेत.

**माया तैर्यग्योनस्य ।** ह्मणजे चारित्रमोहाच्या उदयानें उत्पन्न झालेला कुटिलस्वभाव हा तिर्यंचयोनीच्या आस्रवाचे कारण आहे. मनाने एक चिंतन करणे, वचनाने दुसरेच बोलणे, व शरीराने तिसरेच करणे यास मायाचार ह्मणतात. कपटी मायाचारी वर्तनापासून तिर्यंचायूचे आस्रव होतात. खरोखर आपले परिणामच आपल्या दु खाला कारणीभूत आहेत ही गोष्ट यावरून सिद्ध होत नाही कां ?

**अल्पारंभपरिग्रहत्वं मानुषस्य ।** ह्मणजे थोडा आरभ करणे, थोडा परिग्रह ठेवणे ही मनुष्यायूच्या आस्रवाची कारणे आहेत. स्वाभाविक कोमलता, ससारामध्ये कमी आसक्ति, पापभीरुपणा, दयार्द्रचित्त, ही सर्व मनुष्यायूच्या आस्रवाची कारणे होत.

**सरागसंयमसंयमासंयमाकामनिर्जराबालतपांसि दैवस्य ॥**

ह्मणजे सरागसयम, सयमासयम, अकामनिर्जरा, व बालतप ही आणि त्याचप्रमाणें आत्मध्यान करणे, धर्माची प्रशसा व प्रभावना करणे, इंद्रियदमन करणे, सत्यधर्म श्रवण करणे, शीलव्रत पाळणे व सम्यक्त्व हींहि देवायूच्या आस्रवाचीं कारणे आहेत. सम्यग्दर्शनाने देवांपैकीं फक्त

कल्पवासी देवाचेच आस्रव होतात, भवनवासी, ज्योतिषी, व व्यंतर अशा तीन गतीतील देवायूचे आस्रव होत नाहीत.

येथपर्यंत चारी गतीमध्ये जीवाला गमन करविणाऱ्या कर्मांच्या आस्रवाचे वर्णन संक्षेपत केले आहे. विशेष माहिती सर्वार्थसिद्धीवरून पहावी. येथे हें सांगण्याचे कारण इतकेच कीं श्रेष्ठ मनुष्यगतीमध्ये आमचा जन्म झाल्यामुळे आपली दिवसेंदिवस जास्तजास्त प्रगति होईल व आपण उच्चगतींमध्यें जाऊं असे करणें रास्त आहे. ह्या अल्पायूमध्ये जर आह्मी आपला आत्मा निर्मल करण्याचा अर्थात् संसारातून मुक्त होण्याचा ह्मणजे मोक्ष मिळविण्याचा यत्न केला नाही तर आमची पुढे गति काय ? मनुष्यजन्म हा केवळ सुखाकरिताच नाही, आणि तसें जर मानलें व काल्पनिक सुख मिळविण्यापलीकडे मनुष्याच्या कर्तव्याची सीमा जाणें शक्यच नसेल तर मनुष्यमात्रास एखाद्याने चतुष्पादादिकाबरोबर बसविल्यास त्यांत फारसे वावगें होणार नाही. मनुष्यजन्म हा काही श्वानशूकराचा जन्म नाही केवळ ऐषआरामात लोळण्यापेक्षा मनुष्यजन्माचे काही तरी अधिक उदात्त असे प्रयोजन आहे. मनुष्यमात्रानें काल्पनिक सुखविलासात दंग होणें हे त्याचे अंतिमसाध्य नव्हे. हे विचार कदाचित् जीवामध्यें अज्ञानामुळे दिसून येणार नाहींत. व बावळटाप्रमाणें कर्मरूपी वारुणीच्या धुंदीमध्ये ह्या संसारार्णवात चोहीकडे भटकत असल्यामुळे ह्या भयानक समुद्रामधून तरून जाण्याचा मार्ग आपणाला दिसत नाहीं त्यात काही फारसे आश्चर्य नाही! परंतु जर आह्मी या संसारार्णवातून तरून जाण्याचा धीमेधीमे प्रयत्न करूं व ह्या संसारांतील मोहक वस्तूंचा मोह न धरिता सरळपणे धर्ममार्गानें जाऊं तर खरोखर ह्यांतून पार पडून आपणाला मोक्ष मिळेल.

## नामकर्म.

नामकर्माचा स्वभाव आत्म्याकरिता अनेक प्रकारचे शरीर बनविण्याचा आहे. **नामकर्माचा स्वभाव चित्रकारा**प्रमाणे आहे. त्याप्रमाणें चितारी नाना प्रकारचीं चित्रें बनवितो त्याप्रमाणे नामकर्म आ-

त्याशी सबंध ठेवून नाना प्रकारची मनुष्यतिर्यंचादिकांचीं चित्रे तयार करिते. नामकर्माच्या ४२ प्रकृति व त्याचे अवांतर भेद मिळून ९३ प्रकृति आहेत. त्याचे वर्णन सर्वार्थसिद्धि ग्रंथामध्ये पहावे. नामकर्म आत्म्याच्या सूक्ष्मगुणाचा घात करिते. **योगवक्रता विसंवादनं चाशुभस्य नाम्नः ।** ह्मणजे मन, वचन, कायेची वक्रता आणि अन्यथा प्रवर्तन ह्मणजे शास्त्रात जसे सांगितले आहे त्याच्या उलट वागणे हे **अशुभनामकर्माच्या आस्रवाचें कारण** आहे. **तद्विपरीतं शुभस्य** ह्मणजे ह्याच्या उलट मनवचनकाय यांची सरलता, व विसंवादनाचा अभाव व त्याचप्रमाणे शास्त्रोक्त आचाराने वागणे हे **शुभनामकर्माच्या आस्रवाचें कारण** आहे. आपल्या परिणामाच्या स्वाधीनच आपलें भाग्य ( Destiny ) आहे. ह्याकरिता आपण आपले परिणाम निर्मळ व शुद्ध राखिले पाहिजेत.

## ' षोडषकारणभावनावर्णन '

दर्शनविशुद्धि आदि षोडश भावना ज्याला होतात तो तीर्थंकर होणारच असा नेम आहे. त्याची कुगती होणार नाही. तो संसारसमुद्रांतून पार पडला. विदेहक्षेत्रात कित्येक गृहस्थाश्रमात असूनच केवली श्रुतकेवलीच्या जवळ षोडशकारणभावनाचे चिंतवन केल्याने त्याच जन्मात देवाकडून त्यांचे तपकल्याणिक, ज्ञानकल्याणिक व निर्वाणकल्याणिक होतें व ते मोक्षाला जातात. आणि कित्येक पूर्वजन्मी केवली श्रुतकेवलीपाशी षोडशकारणभावनाचे चिंतवन करून सौधर्मस्वर्गआदि सर्वार्थसिद्धि अहमिंद्रपर्यंत जन्म घेऊन पुनः तीर्थंकर होऊन निर्वाण पावतात. कित्येकानीं पूर्वजन्मी मिथ्याश्रद्धानामुळे नरकगतीचा बंध केला त्यामुळे, व पुढे केवली श्रुतकेवलीच्या आश्रयाने सम्यक्त ग्रहण करून षोडशकारणभावनेचे चिंतवन करूनही नरकाला जातात, तरी नरकांतून निघून तीर्थंकर होऊन मोक्षाला जातात. पूर्वजन्मी षोडशभावनांच्या योगाने जे तीर्थंकर प्रकृति बांधतात त्यास पांच कल्याणिकाची महिमा प्राप्त होते. आणि जे विदेहक्षेत्रात गृहस्थपणामध्यें

तीर्थंकर प्रकृती बांधतात ते त्याच जन्मात तप, ज्ञान आणि निर्वाण अशी तीन कल्याणिके भोगून मोक्षाला जातात. कित्येक विदेहक्षेत्रात मुनींची व्रते घेऊन नतर केवली, श्रुतकेवलीपाशी षोडशकारण भावनेचें चितवन करून त्याच जन्मात तीर्थंकर होऊन ज्ञान आणि निर्वाण अशीं दोन कल्याणिके भोगून मोक्षाला जातात. कारण तपकल्याणिक त्याचे आधींच होऊन गेले असल्यामुळें पुन. होत नाही. ज्यांना तीर्थंकर प्रकृतीचा बध पडला ते, भवनत्रिक देवामध्ये, अन्य मनुष्य तिर्यंचांमध्ये, भोगभूमीमध्यें, स्त्री, नपुसक, एकेंद्रिय, विकल चतुष्कादि जन्मांमध्ये उत्पन्न होत नाहीत. तसेच तिसऱ्या नरकाच्या खाली जन्म घेत नाहीत. ह्मणून षोडशकारणभावना कुगतीचें निवारण करणारी आहे इतकेंच नव्हे, तर षोडशकारणभावना झाल्यानतर तिसऱ्या जन्मात निर्वाण प्राप्त होणारच. ह्मणून ती मोक्षाला कारण आहे असे ह्मटले आहे. तीर्थंकराची ऋद्धी षोडशकारणभावनांनीच प्राप्त होते असा नेम आहे. ह्मणून षोडशकारणभावनाला नमस्कार करून त्याचे वर्णन करतों.

## १ दर्शनविशुद्धि.

हे भव्य जीवहो, हा दुर्लभ मनुष्यजन्म तुह्मास प्राप्त झाला आहे तरी तुह्मी पचवीस दोष टाळून दर्शनविशुद्धी नावाच्या भावनेचें चितवन करा. सम्यग्दर्शनाला नाहीसे करणारे जे दोष आहेत ते असे—तीन मूढता, आठ मद, सहा अनायतन, आणि शकादि आठ दोष मिळून हे पचवीस दोष सत्यार्थ श्रद्धानाला मळीन करणारे आहेत त्यांचा त्याग करा, ह्मणजे तुमचे सम्यग्दर्शन अतिशय निर्मळ होईल. व त्यालाच दर्शनविशुद्धिभावना ह्मणतात.

## २ विनयसंपन्नता.

ह्मणजे पांच प्रकारचा विनय यथायोग्य पाळणें. हे पांच भेद सर्वज्ञ प्रभूनी परमागमामध्ये सांगितले आहेत. दर्शनविनय, ज्ञानविनय, चारित्रविनय, तपविनय, आणि उपचारविनय. हा पाच प्रका-

रचा विनय जिनशासनाचे मूळ आहे. जेथे हा पांच प्रकारचा विनय नाही तेथे जिनधर्माची प्रवृत्तीच नाही. ह्मणून जिनेंद्र देवांनीं ह्याला जिनशासनाचे मूळ असे ह्मटले आहे. ही भावना भावल्यानें मनुष्याच्या आत्म्यामध्ये आठ प्रकारच्या गर्वाला कधीहि अवसर मिळत नाहीं.

## ३ शीलव्रतेष्वनतिचार.

अहिंसादिक पांच व्रते, आणि हीं व्रतें पाळण्यासाठी क्रोधादि कषायांचा त्याग करण्याचें शील ह्मणजे मन, वचन कायेची जी निर्दोष प्रवृती तिला शीलव्रतेष्वनतिचारभावना ह्मणतात. अर्थात् अतिचाररहित शील व व्रतें पालन करा. शील मळिन होऊं देऊं नका. निर्मळ शील मोक्षाच्या मार्गाला मोठें साह्यकारी आहे. ज्याचे शील निर्मळ आहे त्याला इंद्रियविषय आणि कषायपरिग्रहादिक मोक्षमार्गामध्ये विघ्न करू शकत नाहींत.

## ४ अभीक्ष्णज्ञानोपयोग.

ह्या दुर्लभ मनुष्यजन्मामध्ये ज्ञानाभ्यासांतच नेहमी असा. जीवादि नऊ पदार्थांचें स्वरूप व आत्मतत्वाचे निरूपण करणारे असे जे सम्यग्ज्ञान त्याच्या प्राप्तीकरिता सतत उद्योग करा. सम्यग्ज्ञानाशिवाय एक क्षण देखील फुकट घालवू नका. अन्य संकल्प विकल्प संसारांत बुडविणारे आहेत. ह्यामुळे त्यांचा सर्वथा त्याग करा.

## ५ संवेगभावना.

धर्मावर प्रीति ठेवून संसारातील शरीरसंबंधी भोगांपासून विरक्त रहा, व ही संवेगभावना अंतःकरणांत चिंतवीत असा. ह्यापासून संपूर्ण विषयावरील प्रीति नाहीशी होऊन धर्मामध्ये आणि धर्माच्या फलाकडे दृढपणे प्रवृत्ती राहील.

## ६ शक्तितस्त्यागभावना.

आत्म्याचा घात करणारे लोभादिक चार कषाय आहेत त्यांचा त्याग करा; आणि आपल्या शक्तीप्रमाणे सुपात्राच्या गुणांमध्ये प्रीति

ठेवून त्यास आहारादिक चार प्रकारचें दान विधिपूर्वक देण्यामध्यें उद्युक्त असा. ही शक्तितस्त्यागभावना आहे.

## ७ शक्तितस्तपभावना.

७ अतरंग आणि बहिरग अशा दोन प्रकारच्या परिग्रहावरील आसक्ति सोडा, आणि सपूर्ण विषयाची इच्छा नाहीशी करून उत्कृष्ट तपश्चरण आपल्या शक्तीप्रमाणे अगिकार करा. कारण तप हें एक धर्माचे प्रधानअग आहे व मोक्षाला नेणारे आहे. ही शक्तितस्तपभावना आहे.

## ८ साधुसमाधि.

अत करणातील रागादिक विकार आणि इद्रियविषय सोडून देऊन परम वीतरागतारूप साधुसमाधि धारण करा. साधुपुरुषावर सकट येईल त्यावेळी ते दूर करण्याचा प्रयत्न करा.

## ९ वैयावृत्य.

संसारातील दु खांचें निराकरण करणारे असे दहा प्रकारचे वैयावृत्य करा. मुनी, अर्जिका श्रावक व श्राविका याना औषध देणे, शुश्रूषा करणे, त्यांचे दुःख दूर करण्याचा प्रयत्न करणे हें वैयावृत्य होय.

## १० अर्हद्भक्ति.

अरहताचा अभिषेक, पूजा, गुणस्तवन, नामस्मरण वगैरे करणें. यांस अर्हद्भक्ति ह्मणतात. अरिहतान्च्या गुणामध्यें प्रीतिरूप भक्ति ठेवून अरिहताच्या नामादिकाचे ध्यान करा ह्मणजे अर्हतभक्ति घडेल.

## ११ आचार्यभक्ति.

जे पाच प्रकारच्या आचाराचे स्वत: आचरण करून इतर शिष्यांकडून आचरण करवितात, आणि दीक्षा शिक्षा देण्यामध्ये निपुण असतात, जे केवळ धर्माचे स्तभ, अशा आचार्य परमेष्टीच्या गुणावर मनापासून प्रीति ठेवणें ह्याला आचार्यभक्ति ह्मणतात. आचार्यमुनींस अपूर्व उपकरण ह्मणजे पिछी, कमण्डलु, पुस्तक वगैरे देणे, त्याना सन्मुख जाणे, त्यांच्याकरिता उत्सव करणे, पादपूजा, दान, सन्मान व मनःशुद्धिपूर्वक प्रेम करणें यासहि आचार्यभक्ति ह्मणावी.

## १२ बहुश्रुतभक्ति.

ज्ञानामध्ये प्रवृती करविणारे निरतर सम्यक्ज्ञानाचे पठण स्वत· करून अन्य शिष्याला शिकविण्यामध्ये तत्पर, चारी अनुयोगांच्या शास्त्रामध्यें पारगत, आणि अगपूर्वादि श्रुतज्ञानाचे धारक, असे जे उपाध्यायपरमेष्ठी त्याच्याविषयी भक्ति ठेवणे यास बहुश्रुतभक्ति ह्मणतात.

## १३ प्रवचनभक्ति.

रत्नत्रयाचे स्वरूप प्रतिपादन ज्यात केलें आहे अशा जिन-शास्त्राची भक्ति करणे, व जिनशासनाला पुष्ट करणारे, सशयादिक अधकाराला दूर करून सूर्याप्रमाणे ज्ञानाचा प्रकाश करणारें असे जे सर्वज्ञप्रणीत अनेकातात्मक आगम, ते शिकण्यामध्यें, ऐकण्यामध्यें, चिंतवन करण्यामध्ये, भक्ति ठेवून प्रवर्तन करणे ह्यास प्रवचनभक्ति ह्मणतात.

## १४ आवश्यकापरिहाणि.

सामायिक, स्तवन, वदना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान व कायोत्सर्ग अशा अवश्य करण्यायोग्य सहा आवश्यक क्रिया आहेत. त्या अशु-भकर्मांच्या आस्रवाला रोकून कर्माची निर्जरा करणाऱ्या आहेत. अश-रणाला शरण आहेत. सामायिक ह्मणजे चतुर्विंशति तीर्थकराचे स्तवन, व एक तीर्थकराचे वदन, प्रतिक्रमण ह्मणजे केलेल्या दोषांचे निरा-करण इत्यादि ज्या सहा आवश्यक क्रिया त्या नित्य वेळच्यावेळी करणे यास आवश्यकापरिहाणिभावना ह्मणतात.

## १५ मार्गप्रभावना.

लोकांमध्ये पसरलेलें अज्ञान नाहीसे करून विद्वत्तेच्या आणि शुद्ध आचरणाच्या प्रभावाने जिनमार्गाचे माहात्म्य प्रगट करणे ह्यास मार्गप्रभावना ह्मणतात. मार्गप्रभावनेपासून अनेक पुरुषांची वीतराग-धर्मामध्यें प्रवृत्ति होते आणि कुमार्गाचा अभाव होतो. ज्ञान, दान, जिनपूजा, तपोऽनुष्ठान वगैरे उत्तम प्रकारे करून जिनधर्माचा

प्रकाश करा. मोक्षाचा जो रत्नत्रयात्मक सत्यार्थ मार्ग त्याच्या प्रभावाला प्रगट करणे ती मार्गप्रभावना होय.

## १६ प्रवचनवत्सलत्व.

धर्मामध्यें, धर्मात्मा पुरुषांमध्ये, धर्माच्या आयतनामध्ये आणि परमागमाच्या अनेकांतरूप वाक्यामध्ये, अत्यंत प्रीति करणें यास वात्सल्यभावना ह्मणतात. ह्या वात्सल्यअंगापासून दुर्धर मोह, मान यांचा नाश होतो. प्रवचन ह्मणजे देव, गुरु व धर्म ह्याविषयीं जे वात्सल्य ह्मणजे प्रीतिभाव त्याला प्रवचनवत्सलत्व ह्मणावे.

ह्याप्रमाणे निर्वाणसुखाला देणाऱ्या ह्या सोळा भावनांचें जो भव्यजीव स्थिर चित्त ठेवून चिंतवन करतो, व ज्याच्या आत्म्यामध्ये ह्या भावना रचल्या जातात, तो समस्त जीवाचे कल्याणकारक असे तीर्थंकरपद पावून पंचमगती जी निर्वाण ती प्राप्त करून घेतो. तीर्थंकर प्रकृतीच्या आस्रवाला कारणीभूत अशा ह्या सोळा भावनाचें संक्षिप्त स्वरूप सांगितले.

ह्याचे सविस्तर वर्णन श्री. हीराचंद नेमचंद यांच्या षोडशकारणभावना ह्या पुस्तकात केलेले आढळून येईल. येथपर्यंत नामकर्माचें वर्णन केलें. आतां गोत्रकर्माचें वर्णन करितो.

## गोत्रकर्म.

गोत्रकर्माचा स्वभाव उच्चनीच कुलामध्ये उत्पन्न करणे हा होय. ह्याचा स्वभाव **कुंभकाराप्रमाणें** आहे. ज्याप्रमाणें कुंभकार नानाप्रकारचीं चांगली व वाईट मडकी तयार करितो त्याप्रमाणे गोत्रकर्म उच्चनीच गोत्रामध्ये (कुलामध्ये) उत्पन्न करितें गोत्रकर्म आत्म्याच्या अगुरुलघुगुणाचे घातक आहे. उच्चगोत्र व नीचगोत्र अशा दोन प्रकृति गोत्रकर्माच्या आहेत. ज्याच्या उदयानें उच्च व मोठ्या कुलामध्ये जन्म होतो त्यास उच्चगोत्रकर्म ह्मणतात. व ज्याच्या योगाने नित्यदरिद्रि, अप्रसिद्ध चांडालादिकांच्या कुलांत जन्म होतो त्यास नीचगोत्र ह्मणतात.

**परात्मनिंदाप्रशंसे सदसद्गुणोच्छादनोद्भावने च नीचैर्गोत्रस्य ॥**

—( **तत्वार्थसूत्र अ. ६.** )

ह्मणजे दुसऱ्याची निंदा व आपली प्रशंसा करणे, आणि दुसऱ्यांत असलेल्या गुणांचे आच्छादन व आपणांत नसणाऱ्या गुणांची प्रसिद्धि ही नीचगोत्रकर्माच्या आस्रवाची कारणे आहेत.

**तद्विपर्ययो नीचैर्वृत्त्यनुत्सेकौ चोत्तरस्य ॥** अर्थात् नीचगोत्राच्या आस्रवाच्या उलट ह्मणजे आपली निंदा व दुसऱ्याची प्रशंसा करणे, तसेंच आपले गुण झाकून दुसऱ्याचे गुण प्रगट करणे, आपल्याहून गुणांनीं अधिक असणाऱ्याशीं विनयानें राहणें व आपण गुणांनीं अधिक असल्यास गर्व न करणे या योगानें उच्च गोत्रकर्माचे आस्रव होतात.

## अंतरायकर्म.

अंतरायकर्माचा स्वभाव दान, लाभ, भोग, उपभोग व वीर्य या पांचांत विघ्न उत्पन्न करण्याचा आहे. अंतरायकर्माचा स्वभाव राजाच्या भंडाऱ्याप्रमाणें आहे. ज्याप्रमाणे भंडारी ( कोठवळा ) राजानें दान देण्याची आज्ञा केल्यावरहि कोणाला दान देत नाहीं त्याप्रमाणे अन्तरायकर्म आत्म्याच्या दानलाभादिकांमध्ये विघ्न आणते. ह्मणून तत्वार्थसूत्रांत '**विघ्नकरणमन्तरायस्य**' असे ह्मटले आहे. अंतरायकर्म वीर्य ( पराक्रम ) गुणाचा घात करितें.

१ ज्याचे उदयाने दान देण्याची इच्छा असूनहि दान देववत नाहीं त्यास दानांतरायकर्म ह्मणतात.

२ लाभाची इच्छा असूनहि ज्यायोगें लाभ होत नाहीं त्यास लाभांतरायकर्म ह्मणतात.

३ ज्याच्या योगानें भोगण्याची इच्छा असूनहि भोगवत नाहीं त्यास भोगांतरायकर्म ह्मणतात.

४ ज्याचे योगानें उपभोग घेण्यास समर्थ होत नाहीं त्यास उपभोगांतरायकर्म ह्मणतात.

५ ज्याचे योगानें शरीरांत सामर्थ्य उत्पन्न होत नाहीं, व एखादे

काम करण्याचा उत्साह असूनहि काम सिद्धीस जात नाही त्यास वीर्यातरायकर्म ह्मणतात. असे हे अतरायकर्माचे पांच भेद आहेत.

दुसऱ्याच्या दानभोगादिक क्रियेमध्ये विघ्न करणे हे अतराय कर्माच्या आस्रवाचे कारण आहे. अर्थात् कोणी दान देत असताना त्यात आपण विघ्न आणिल्याने दानातराय कर्माचें आस्रव होतात. दुसऱ्याच्या लाभात विघ्न करण्याने लाभांतराय कर्माचे आस्रव होतात. दुसऱ्याच्या भोगाच्या सामुग्रीमध्ये विघ्न केल्याने भोगांतराय कर्माचे आस्रव होतात. उपभोगांच्या सामग्रीमध्ये विघ्न करण्याने उपभोगांतराय कर्माचे आस्रव होतात. व दुसऱ्याचे बलवीर्य बिघडविल्यानें वीर्यातराय कर्माचे आस्रव होतात. ही अतरायकर्माच्या आस्रवाची कारणे होत. याशिवाय जी कार्ये केल्याने आपले, व आपणावर अवलबून असणाऱ्या नोकर चाकर स्त्रीपुत्र इत्यादिकाचें नुकसान होते ती सर्व अंतराय कर्माच्या आस्रवाची कारणे होत. उदाहरणार्थ:—मुलगे व मुली याना विद्या न शिकविल्यामुळे त्याचे ज्ञान प्रगट होण्यात विघ्न आल्याने, तसेच मुलामुलींची लग्ने बालपणीं करून त्याना विद्याभ्यासापासून पराङ्मुख केल्याने व आपणावर अवलबून असणाऱ्या नोकर, चाकर व प्रजा इत्यादिकाच्या धर्मकृत्यात विघ्न आणल्यानें अंतराय कर्माचे आस्रव होतात. व त्याप्रमाणेच विद्यालय, औषधालय, भोजनालय इत्यादि धर्मकार्यांची उन्नति झालेली सहन न होणें, व त्यामध्ये वितुष्ट आणणे हीं सर्व तीव्रअतराय कर्माच्या आस्रवाची कारणे आहेत. त्याचप्रमाणे तीर्थक्षेत्रावरील भडारातील रकमेचा व धर्मादाय फडाचा योग्य तो विनिमय न करणे, उचित धर्मकार्यामध्यें त्याचा उपयोग न करिता ती रक्कम स्वत: खर्च करणें ही सर्व तीव्र अतराय कर्माच्या आस्रवाची कारणे आहेत. याप्रमाणे ही आठहि प्रकारची कर्मे ससारी जीवाला आपल्याच परिणामामुळे बाधलीं जातात. व तीं उदयाला आल्यावर आपण त्याची फलेहि भोगतो. ह्याप्रमाणे हें कर्म पौद्गलिक आहे, जड आहे आणि आमच्याच परिणामाचें फळ आहे.

ह्या आठ कर्मापैकी पाचवें आयुकर्म जे आहे तें फक्त जन्म व मृत्युरूप आहे. जेव्हा एखाद्या प्राण्याच्या आयुकर्माची समाप्ति होते तेव्हां त्याचा आत्मा ह्या जड शरीरांतून निघून जातो, व लोक ह्यालाच मृत्यु असे ह्मणतात. तो आत्मा दुसऱ्या शरीरामध्यें प्रवेश करितो, आणि ह्यालाच 'जन्म' असे ह्मणतात. **श्रीमद्भगवद्गीतें**त सांगितले आहे.

**वासांसि जीर्णानि यथा विहाय ।**
**नवानि गृण्हाति नरोऽपराणि ॥**
**तथा शरीराणि विहाय जीर्णान्य-**
**न्यानिसंयाति नवानि देही ॥ १ ॥**

**अर्थः**- ज्याप्रमाणे मनुष्य जीर्ण झालेल्या वस्त्राचा त्याग करून नवीन वस्त्रें धारण करितो, त्याप्रमाणे जीव अर्थात् आत्मा हा पूर्व-कर्मजन्य शरीराचा त्याग करून नवीन शरीर धारण करितो. मृत्यु-महोत्सवांतहि असेच ह्मटले आहे:—

**ज्ञानिन् भयं भवेत्कस्मात्प्राप्ते मृत्युमहोत्सवे ।**
**स्वरूपस्थः पुरं याति देही देहान्तरस्थितिः ॥**

ह्मणजे हे ज्ञानीहो, तुह्मास वीतरागी सम्यग्ज्ञानी उपदेश करि-तात की, हा मृत्युरूपी महोत्सव प्राप्त झाला असता भय कशाचे बाळगता? हा देही ह्मणजे आत्मा तो आपल्या स्वरूपामध्ये राहून दुसऱ्या देहामध्ये राहण्यास जात आहे. याशिवाय जन्म व मृत्यु ह्मणजे काहीं एक नाही. कारण, आत्मा हा ज्ञानमय व अमूर्तिक असा आहे; ह्याचा नाश कधीहि होणार नाही. ही क्षुधा, तृषा, वातपित्तकफादिक रोगमय वेदना पुद्गलाची आहे. ह्या शरीराचे व आत्म्याचे जरी एके ठिकाणी वास्तव्य आहे, तथापि आत्म्याचे रूप ज्ञानमय आहे. आणि शरीराचे रूप जड आहे. आत्मा अमूर्तिक, देहमूर्तिक, आत्मा अखंड एक आहे, पुद्गल हे अनेक परमाणूंनी बनलेले पिंड आहे. आत्मा हा अविनाशी आहे, देह हा नाशवंत व क्षणभंगुर आहे. ह्या देहामध्ये जे रोग व क्षुधातृषादिक वेदना उत्पन्न होतात त्याचा आत्मा हा जाणणारा आहे.

आत्मा हा ज्ञायकस्वभावी आहे. अन्य पदार्थावर ममत्व करणें तेंच अज्ञान होय, मिथ्यात्व होय. जसे एक घर सोडून दुसऱ्या घरांत प्रवेश करणे, तसेच आत्म्याच्या शुभाशुभ परिणामांपासून उत्पन्न केलेल्या कर्माने रचिलेल्या देहामध्ये जावयाचे आहे. यात आत्म्याच्या स्वरूपाचा नाश नाही हें ध्यानात ठेवा. कर्मबंधनामुळेच एका शरीरातून दुसऱ्या शरीरात भ्रमण करीत असतो. जो अज्ञानी बहिरात्मा आहे तो देहामध्ये राहून मी सुखी, मी दुःखी, मी क्षुधावान्, मी तृषावान माझा नाश झाला आहे असें मानतो. परंतु जो अंतरात्मा सम्यग्दृष्टि आहे तो असें मानतो की, जो उत्पन्न झाला तो मरणारच. पृथ्वी, जल, अग्नि व वायूच्या पुद्गलपरमाणूच्या पिंडाचे उत्पन्न झालेले जे हे शरीर ते नाश होणारच. असो. जेव्हा हा जीव संपूर्ण कर्मांचा अत्यंत नाश करून, आपले आवृत गुण संपादन करितो तेव्हां अर्हंत अथवा जिन होतो. अर्थात् त्याला मोक्ष मिळतो व तेथे आत्मस्वरूपामध्यें अविनाशी आत्मिक सुखाचा अनुभव घेतो. जोपर्यंत ह्या जीवाने संपूर्ण कर्मांचा नाश केला नाही तोपर्यंत हा जीव त्या कर्मबंधनामुळे एका शरीरातून दुसऱ्या शरीरात भ्रमण करीत राहणारच. पट ( वस्त्र ), प्रतिहारी ( द्वारपाल ), तलवार, मद्य, बेडी, चितारी, कुंभकार आणि भंडारी या आठांचा जसा स्वभाव आहे तसाच क्रमशः ज्ञानावरणादि आठ कर्मांचा स्वभाव आहे. आपल्या अंतिमसाध्याचे सुकाणू मोक्ष नामक पुरुषार्थावर ज्यांना लावावयाचे आहे त्यांनीं या आठ कर्मांचा संपूर्ण नाश केला पाहिजे. तरच मोक्षलक्ष्मी प्राप्त होईल. येथपर्यंत ज्ञानावरणादि आठ कर्मांचे संक्षेपाने वर्णन केलें. आता जैनांच्या तत्वज्ञानाकडे वळूं.

# ज्ञानावरणी कर्म.

ज्ञानावरणी कर्मः—ज्ञान+आवरण. आवरण म्हणजे पडदा अथवा आच्छादन. ज्याप्रमाणें एखाद्या मूर्तीवर वस्त्र टाकिलें असतां त्या मूर्तीचा आकार वगैरे कांहींही दिसत नाहीं त्याचप्रमाणें आत्म्यामध्यें केवलज्ञान होण्याची शक्ति आहे; परंतु ह्या ज्ञानावरण नामक पडद्यानें त्या आत्म्याची सर्व ज्ञानशक्ति झाकून टाकिली आहे.

# दर्शनावरणी कर्म.

**दर्शनावरणी कर्मः**—ज्याप्रमाणें द्वारपाळ राजदर्शनास प्रतिबंध करितो त्याप्रमाणें दर्शनावरणीं कर्माचा स्वभाव आत्म्याच्या दर्शनगुणाला आच्छादन करण्याचा आहे; अर्थात् हें कर्म आत्म्याचें दर्शन ( श्रद्धान ) होऊं देत नाहीं.

# वेदनीय कर्म.

**वेदनीय कर्मः**—मधाचा लेप लावलेली सुरी चाटली असता जसें अल्प सुख व अतिशय दुःख होतें तसें वेदनीय कर्म थोडा वेळ सुख ( साता ) दाखवून शेवटीं दुःख ( असाता ) उत्पन्न करणारें आहे.

# मोहनीय कर्म.

**मोहनीय कर्मः**—याचा स्वभाव आत्म्यामध्यें मदिरेप्रमाणें धुंदी उत्पन्न करण्याचा आहे. ज्याप्रमाणें सुरापान केलें असतां मनुष्य बेसावध होतो त्याप्रमाणें हें कर्म आत्म्याला संसारामध्यें मोह उत्पन्न करून गुरफटून टाकतें.

# आयुकर्म.

**आयुकर्मः**—याचा स्वभाव खोड्याप्रमाणें आहे. खोड्यामध्यें एकदां चोराचा पाय अडकविला म्हणजे त्याला ज्याप्रमाणें त्यांतून त्याचा पाय बाहेर काढतां येत नाहीं त्याप्रमाणें आत्म्याला कोणत्या तरी एका शरीरामध्यें कांहीं कालपर्यंत अडकविल्यावर आयुकर्म संपूर्ण झाल्याशिवाय त्याला त्यांतून बाहेर निघतां येत नाहीं.

# नामकर्म.

नामकर्मः—ज्यापमाणें एखादा चित्रकार नानापकारचीं चित्रें काढतो त्याप्रमाणें नामकर्म हें आत्म्याकरिता अनेक मकारचीं मनुष्य-तिर्यश्चादिकांचीं सांगोपांग शरीरें बनवितें.

# गोत्रकर्म.

गोत्रकर्मः—ज्याप्रमाणें एखादा कुंभकार नानाप्रकारचे लहानमोठे घट तयार करितो त्याप्रमाणें गोत्रकर्म हें उच्च अथवा नीच गोत्रामध्यें उत्पन्न करितें.

# अंतरायकर्म.

अंतरायकर्मः—राजानें हुकूम सोडल्यावरही ज्याप्रमाणें भंडारी ( कोठ-वळा ) दान देत नाहीं त्याप्रमाणें अंतरायकर्म हें दान, लाभ, भोग, उपभोग यांमध्यें विघ्न उत्पन्न करितें.

## ‘जैनांचें तत्वज्ञान’

“मी कोण आहे? हें जग काय आहे? हें निर्माण कसे झाले? मी कोठून आलो आहे? मला कोठे जावयाचे आहे? ह्या सर्व वस्तूंचा शेवट काय होणार आहे? जीव नित्य आहे की अनित्य आहे, जीवादितत्वाचे स्वरूप काय आहे?” इत्यादि गूढ प्रश्नांचा उलगडा जैनधर्माच्या तत्वज्ञानात ( Philosophy ) केला आहे. हे प्रश्न निरनिराळ्या देशातील मोठमोठ्या थोर पुरुषानी व तत्ववेत्त्यांनीं निरनिराळ्या काळी निरनिराळ्या रीतीनी सोडविले आहेत. कोणाहि दोघाची मते एकमेकांशी सर्वांशी मिळत नाहीत. आणि ह्यामुळेच निरनिराळी मते, सांप्रदाय व धर्म जगात प्रचलित असलेले दिसून येतात. जैनतीर्थकरानी - आमच्या प्राचीनकाळच्या क्षत्रिय महर्षींनी— ‘मी कोण आहे? व हे जग काय आहे” इत्यादि प्रश्नाची उत्तरे फार योग्य व सोपपत्तिक अशी दिलीं आहेत. आत्मा अनादि आहे, कर्म अनादि आहे, व संसारहि अनादि आहे असे त्यानी आह्मांला दाखविले आहे. ह्या सृष्टीचा कोणी कर्ताहि नाही, व कोणी नाश करणाराहि नाही. तर याची स्थिति स्वभावानेच नियत झालेली आहे. अधोलोक, तिर्यग्लोक, आणि उर्ध्वलोक असे या लोकाचे तीन भेद आहेत. अधोलोकाचा आकार वेताच्या खुर्चीप्रमाणे आहे. मध्यलोकाचा आकार झल्लरी (झांज) प्रमाणे आहे. आणि उर्ध्वलोकाचा आकार मृदंगाप्रमाणे आहे. पाय पसरून, कमरेवर हात टेकून उभा राहिलेला पुरुष जसा दिसावा त्याप्रमाणे हा लोक ( जग ) दिसतो असे जैनाचे मत आहे. आपण जसे बी पेरितो त्याप्रमाणे त्याचे फळ मिळते. आमचे भाग्य आमच्याच स्वाधीन आहे. तीर्थकराचे उपरिनिर्दिष्ट उत्तर हें उदात्त आणि अत्युत्तम नीतितत्वानी भरलेले आहे. परमेश्वराच्या, त्याच्या पुत्राच्या अथवा प्रतिनिधींच्या कृपेने आपणाला ‘मोक्ष’ मिळतो अशी जैनाची मुळीच समजूत नाहीं. खरोखर परमेश्वराच्या, त्याच्या पुत्राच्या अथवा प्रतिनिधींच्या कृपेवर आह्मी आपला स्वर्ग अथवा मोक्ष का अवलंबून ठेवावा? त्याची कृपादृष्टि

झाली ह्मणजे स्वर्ग मिळतो अशी जी कित्येक अन्य धर्मियाची समजूत आहे ती सर्वस्वी चुकीची आहे. आमचा मोक्ष आमच्या परिणामावर अवलंबून आहे. आपल्या कर्माच्या स्वाधीन आपला मोक्ष आहे. आह्मी जैन ईश्वराला आपल्या कर्माचा न्यायाधीश समजत नाही. कारण, त्यामुळे बराचसा विरोध येतो, त्या कारणाने ईश्वराला एका मोठ्या विचित्र स्थितीत ठेवल्यासारखे होते. आह्मी जैनलोक ईश्वराला सर्वज्ञ, अविनाशी व अनंतसुखी असे समजतो. खोट्या स्तुतीचा भोक्ता, एकाचा तारक व दुसऱ्याचा मारक अथवा जो कोणी जेवढी स्तुति व पूजा करितो, तेवढ्या मानाने अनियंत्रितपणे व स्वच्छंदाने न्याय करणारा ईश्वर आहे असे आह्मी जैनलोक मानीत नाहीं. सर्वज्ञ, वीतराग आणि परमहितोपदेशक असा, व क्षुधा, तृषा, जन्म, जरा, मरण, रोग, शोक, भय, विस्मय, राग, द्वेष, निद्रा, स्वेद, मद, मोह, चिंता, खेद आणि अरति असे अठरा दोष ज्याचे अगदीं नाहीसे झाले, अनंतज्ञान, अनंतदर्शन व अनंतवीर्य अनंतसुख इत्यादि आत्मिक अविनाशी अनंतगुण ज्याच्यामध्ये प्रगट झाले, तोच आमचा खरा **आप्त** होय. त्यालाच आह्मी जैनलोक आपला परमेश्वर समजतो. तोच आमचा परमात्मा होय. आपण त्याचे अनुकरण करावे ह्मणून पुढे ठेविलेलें ते आमचे अत्युत्कृष्ट ध्येय होय. अशा त्या सिद्ध परमात्म्याच्या सद्‌गुणांचें चिंतन, ध्यान व स्तवन करणे ही त्याची उपासना होय. व या उपासनेचा हेतु त्याच्या गुणाची प्राप्ति व्हावी हाच आहे. परमात्म्याच्या उपासनेपासून आपल्या मनातील कालुष्य कमी होते, व पूर्वकर्माची निर्जरा होत जाते; त्याचप्रमाणें नवीन कर्माचा संवर ह्मणजे निरोध होऊन आत्मा कर्ममलापासून निष्कलंक झाला ह्मणजे त्यास मोक्षप्राप्ति होते. परमेश्वर हा कोणाचे चांगले वाईट करीत नाहीं. आत्माच आपले चांगले अथवा वाईट करून घेण्यास समर्थ आहे.

**उद्धरेदात्मनात्मानम् नात्मानमवसादयेत् ।**
**आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥** –( भगवद्गीता. )

अर्थात् रडून उद्धार होत नाहीं. आपला उद्धार आपणच केला पाहिजे असेच तत्व गीतेतहि प्रतिपादन केले आहे. आत्म्याला मोक्ष मिळाल्यावर तोच जीवात्मा (परमात्मा) आमचा परमेश्वर होतो. तोच आप्त आह्माला वंदन स्तवन पूजन करण्याला योग्य आहे. अन्य कामी, क्रोधी, लोभी, मोही, स्त्रियामध्ये आसक्त, शस्त्रादिक धारण करणारा, जो कर्माच्या स्वाधीन झालेला, सर्वज्ञतारहित, केवळ इंद्रियजन्य ज्ञानाचाच धारक तो आह्मा जैनाचा आप्त नव्हे; तो आह्मांला स्तवन पूजन नमस्कारास योग्य नाही. या विवेचनावरून आह्मा जैनाची ईश्वरासंबधाची काय कल्पना आहे ती आपल्या ध्यानांत आली असेलच. आह्मी जैन लोक ईश्वराचें अस्तित्व मानतों ही गोष्ट सिद्ध होते. ह्मणजे जे लोक आह्माला नास्तिक ह्मणतात ते सपशेल चुकले आहेत हीहि गोष्ट पण सिद्ध होते. अनेकांत स्याद्वादाचे स्वरूप शंकराचार्यास नीट न समजल्यामुळें व स्वमताच्या अभिमानामुळे त्यानीं जैनमताला नास्तिक ह्मटले असावे. काही पाश्चात्य ग्रंथकारहि त्याना नास्तिक समजतात. परंतु जैनाना नास्तिक ह्मणण्यांत अक्षम्य अशी चूक करीत आहेत. कारण आह्मी जैन ईश्वराचें अस्तित्व मानतो. 'मी कोण आहे? व हे जग काय आहे?' यासंबधाने मी आपणाला आता सांगितले आहे. ह्या प्रश्नाचे उत्तर निरनिराळ्या वातावरणातल्या महान् पुरुषानी निरनिराळ्या काळी आपापल्या समजुतीप्रमाणे दिले आहे. ईश्वरा विषयीच्या त्याच्या कल्पनाहि वेगळ्याच आहेत. काही लोक त्याला सृष्टीचा उत्पन्नकर्ता आहे असे ह्मणतात. कोणी त्याला नाशकर्ता तर कोणी त्याला सृष्टीचा रक्षक समजतात. कांही ह्मणतात की त्याच्या पुत्रावर व प्रतिनिधीवर आपली ज्याप्रमाणे श्रद्धा असेल त्याप्रमाणे तो आपणाला न्याय देतो. तर इतर काहीं ह्मणतात की आपण ज्या मानानें त्याची उपासना करू त्यामानाने तो आपणाला फळ देतो. जे काही होते ते ईश्वरानें केल्यामुळेंच होत आहे; लोकांकडून चागले, वाईट सगळें ईश्वरच करवितो.

ईश्वराने केल्यावाचून कांहीं होत नाही; सर्व कांहीं ईश्वरेच्छेच्या स्वाधीन आहे; चागले कृत्य किंवा वाईट कृत्य ईश्वराच्या प्रेरणेवांचून होत नाही अशी काहींची समजूत आहे. ईश्वराची व्याख्या एकजण अशा प्रकारची तर दुसरा त्याच्या उलट त्याची व्याख्या करितो. ईश्वर ह्मणजे सृष्टीचा निर्माता, शास्ता किंवा संहारकर्ता नसून अत्यंत पूर्णावस्थेला पोहोचलेला **आत्माच** होय असे आह्मी जैन मानतों. ईश्वराला मुलेंहि नाहींत व त्याचे प्रतिनिधिहि नाहीत असे जैन समजतात. जैनलोक आत्मा, कर्मे व सृष्टि ही नित्य व अनादि आहेत असे मानतात. यांना कोणी उत्पन्नकर्ताहि नाहीं व नाशकर्ताहि नाही अशी आमची समजूत आहे. आपण जे काही कर्म करितों त्याचे फळ आपणास मिळते. ईश्वराचा या तिन्हींशी अर्थाअर्थी असा काहीएक संबंध नाही. आपण स्तुति करून परमेश्वराला प्रसन्न करून घेऊ व ईश्वर आपल्या स्तुतीला भुलून आपणाला सद्गति देईल ही कल्पना जैनलोकात नाहीं. ईश्वर सर्वज्ञ, सर्वशक्तिमान्, नित्य मंगलस्वरूप व अनंतगुणी आहे. ईश्वर पवित्र आत्मा आहे. पण ईश्वर आपल्या पूजेनें किंवा स्तुतीने प्रसन्न होऊन आपल्यावर विशेष कृपा करील व न्यायाचा कांटा अणुरेणुइतका इकडचा तिकडे करील असे नाही. कर्माप्रमाणे फळे मिळावयाचाच हा नियम आहे. त्या नियमाने या सृष्टीचे सूत्र चालावयाचे आहे. त्यात परमेश्वर मध्यें पडत नाही अशी जैनाची समजूत आहे. 'जब नर करणी करे तो नरका नारायण होय' हे तत्व मनुष्यानें पुढे ठेवून आपलें आचरण शुद्ध ठेवावे. मनुष्याचा आत्मा रत्नत्रयीच्या साधनाने उन्नतिप्रत जातजात मोक्षाप्रत पोहोचला ह्मणजे परमात्म (ईश्वर) रूप होतो असा जैनांचा सिद्धांत आहे. यावरून ईश्वराचे अस्तित्व आह्मी मानीत नाही असे नाहीं तर ईश्वराच्या कृतीविषयींची आमची समजूत व इतराची समजूत यांत कायतो भेद आहे. यावरून 'जैनलोक नास्तिक होत' असा निवळ व्यर्थ अपवाद आह्मावर आलेला आहे. कर्मानुरूप फलप्राप्तीच्या नियमानुसार हें जग चाललें आहे. ईश्वराकडे त्याबद्दलचें कर्तृत्व कांहीं

एक येत नाहीं असें जैनलोक ह्मणतात, ह्मणून जर त्यांस नास्तिक ह्मणावयाचें तर '**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः**' असे ह्मणणाऱ्या **श्रीकृष्णा**चीहि नास्तिकातच गणना करावी लागेल. नास्तिक व अस्तिक हे शब्द ईश्वराच्या अस्तित्वासबधानें अथवा कर्तृत्वासबधानें न योजता **पाणिनी**ने ह्मटल्याप्रमाणे:—

**सूत्र—अस्ति नास्ति दिष्टं मतिः ।**
**परलोकोऽस्तीति मतिर्यस्यास्तीति आस्तिकः ॥**
**परलोकोनास्तीति मतिर्यस्यास्तीति नास्तिकः ।**
**दैवमस्तीति मतिर्यस्यास्तीति दैष्टिकः ॥**

ह्मणजे परलोक आहे असे जे मानतात ते **अस्तिक** होत, आणि परलोक नाही असे मानणारे **नास्तिक** होत. दैव आहेत असें जे मानतात ते **दैष्टिक** आहेत. ह्यावरून पाहता जैनलोक परलोकाचें अस्तित्व मानणारे असल्यामुळे नास्तिकत्वाचा आरोप त्याच्यावर येऊ शकत नाही. जैनमतामध्ये सोळा[१] स्वर्ग, सात[२] नरक आणि तीन लोक हे सर्व मानले आहेत. हा जीव अनादिकालच्या मिथ्यात्वकर्माला वश झाल्याने त्याला आपण कोण व पर कोण याची ओळख झाली नाहीं. जे जे शरीर कर्मोदयानें प्राप्त झाले त्या त्या शरीरालाच आपले स्वरूप समजून आपले खरे स्वरूप विसरला, आणि असा भ्रमिष्ट होऊन चतुर्गतीमध्यें भ्रमण करू लागला. **स्वामी विवेकानंद** यांनीं याबद्दल आपल्या '**वस्तुपुरुष** व **भ्रांतिपुरुष**' या व्याख्यानामध्ये फार सुंदर व मार्मिक रीतीने विवेचन केलें आहे. स्वामीचे हें व इतर व्याख्याने ज्ञानयोगामध्ये छापून प्रसिद्ध झालीं आहेत. तीं व्याख्याने अत्यत

---

१ सौधर्म, ऐशान, सानत्कुमार, माहेंद्र, ब्रह्म, ब्रह्मोतर, लांतव, कापिष्ठ, शुक्र, महाशुक्र, शतार, सहस्त्रार, आनत, प्राणत, आरण व अच्युत असे सोळा स्वर्ग मानिले आहेत. २ रत्नप्रभा, शर्कराप्रभा, वालुकाप्रभा, पंकप्रभा, धूमप्रभा, तमःप्रभा, महातमःप्रभा अशा सात नरकभूमि आहेत. या सात नरकभूमीमध्यें नारकी जावाची राहण्याची बिळे आहेत.

बोधप्रद व वाचनीय झाली आहेत. स्वामी आपल्या व्याख्यानांत ह्मणतात, "मनुष्याचा बाह्य व जडद्रव्यरूप देह हा खरा पुरुष-**वस्तुपुरुष**- नसून त्याचा आत्मा हाच खरा पुरुष आहे. देहात्मक वाटणारा पुरुष केवळ **'भ्रांतिपुरुष'** आहे. **अनात्म्या**च्या ठिकाणीं माणसाने भ्रमाने स्वीय बुद्धि स्थापिल्यामुळेच त्यास (देहास) होणाऱ्या औपाधिक-बाह्य गोष्टी-मुळे होणाऱ्या-सुखदुःखाचा स्वतःवर आरोप करून घेऊन, तो स्वतःस सुखदुःखाच्या व तज्जन्य कर्मबंधनाच्या फेऱ्यांत पाडून घेऊन आपल्या मूळ स्वरूपास विसरतो." ज्याला स्वामी विवेकानंदानीं **'भ्रांतिपुरुष'** व **'वस्तुपुरुष'** अशी दोन वेगळी वेगळीं नावे दिलीं आहेत त्यालाच आह्मी जैनलोक **'बहिरात्मा'** व **'परमात्मा'** असें ह्मणतो. असो. जैनमतात परलोकाचे अस्तित्व पूर्णपणे मानलेले आहे. व पाणिनीच्या मताप्रमाणे ते पूर्णपणे अस्तिक मत आहे असें सिद्ध होते. याप्रमाणे- पाणिनीच्या व्याख्येप्रमाणे- जैनांवर नास्तिकत्वाचा आरोप येऊ शकत नाही. ज्याना श्रुति प्रमाण नाहींत ते नास्तिक असा अर्थ घेतला तर मात्र जैन हे नास्तिक आहेत असे कबूल केले पाहिजे. कारण ते वेदाला प्रमाण मानीत नाहीत हें सर्वश्रुत आहे. पण ख्रिस्ती, मुसलमान, बौद्ध, व अलीकडे उदयास आलेले ब्रह्मोसमाज, थियासफिष्ट वगैरे धर्मपंथसुद्धा वेदाला प्रमाण मानीत नसल्यामुळे तेहि नास्तिकाच्या कोटीत येतील! तेव्हा अस्तिक व नास्तिक या शब्दांचा कसाहि अर्थ घेतला तरी जैनलोक नास्तिक आहेत असे सिद्ध करता यावयाचे नाही. सारांश, आह्मी देवाला मानतो, परंतु त्याच्या कर्तासंबंधाने आह्मात व अन्यधर्मीयात मतभेद आहे. तेव्हा जे लोक आह्माला नास्तिक ह्मणतात ते आमच्यावर निवळ खोटा दोषारोप करीत आहेत. कारण ईश्वराचे व परलोकाचें अस्तित्व आह्मी मानतो. जैनमत जर नास्तिक असते तर वेदामध्ये त्याला सन्मान मिळाला नसता. परंतु वेदात व इतर ग्रथांत त्याचा सन्मान केलेला आढळतो. **ऋग्वेदांत** ह्मटले आहे:—

**ॐ त्रैलोक्य प्रतिष्ठितानां चतुर्विंशतितीर्थंकराणाम् ।**
**ऋषभादिवर्द्धमानान्तानां सिद्धानां शरणं प्रपद्ये ॥ १ ॥**

**अर्थः**— जे ऋषभापासून वर्द्धमानपर्यंत त्रैलोक्यांत प्रतिष्ठित असे चोवीस तीर्थंकर सिद्ध ह्यांना मी शरण जातों.

**ॐ पवित्रं नग्नमुपवि ( इ ) प्रमामहे**
**येषां नग्ना ( नग्नये ) जातिर्येषां वीरा ॥**

**अर्थः**—यजमान ह्मणतो आह्मी पवित्र ( शुद्ध ) किंवा पापापासून मुक्त करणारे व दिगंबर देवाना प्रसन्न करतो. ज्यांची जाति नग्न असते आणि वीरा ह्मणजे बलवान असते. **यजुर्वेदांत** ह्मटले आहे.

**" उँ नमोऽर्हन्तो ऋषभो "**–

**अर्थः**—अर्हत पूज्य ऋषभदेवाला नमस्कार असो.

**उँ ऋषभं पवित्रं पुरुहूतमध्वरं यज्ञेषु नग्नं परमं माहसं स्तुतं वारं शत्रुंजयं तं पशुरिंद्रमाहुरिति स्वाहा । उत्रातारमिन्द्रं ऋषभं वपन्ति अमृतारमिन्द्रं हवे सुगतं सुपार्श्वमिन्द्रं हवे शक्रमजितं तद्वर्द्धमानपुरूहूतमिन्द्रमाहुरिति स्वाहा । उँ स्वस्ति नस्तार्क्ष्यो अरिष्टनेमिः स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु दीर्घायुस्त्वाय बलायुर्वा शुभजातायु ॥**

**अर्थः**—पवित्र ऋषभदेवाला आणि इंद्ररूपी अध्वराला, यज्ञामध्ये नग्नाला, पशूशत्रूला जिंकणारा, ज्याला इंद्र ह्मणतात त्याला हवी देतो. रक्षण करणारे परम ऐश्वर्ययुक्त आणि अमृत व सुगत ( सर्वव्यापक ) सुपार्श्व ( ज्याच्या जवळील जीव चांगले आहेत ) अशा पुरुहूताला ( इंद्र ) ऋषभदेव व वर्द्धमान ह्मणतात त्याला हवी देतो. वृद्धश्रवा ( पुष्कळ धनवान ) इंद्र कल्याण करो. आणि विश्ववेदा सूर्य आमचे कल्याण करो. आणि अरिष्टनेमि गरुड आमचे कल्याण करो. आणि बृहस्पति आमचे कल्याण करो. (यजुर्वेद, अ. २५ म. १९) दीर्घायु, बल, शुभ मंगल दे.

**उँ रक्ष रक्ष अरिष्टनेमि स्वाहा । वामदेवशान्त्यर्थ मुपविधीयते सोऽस्माकं अरिष्ट नेमि स्वाहा ॥**

**अर्थः**—हे अरिष्टनेमि माझे, रक्षण कर. वामदेव, ज्याचे विधान आह्मी शांतिसाठी करतो तो, आमचा अरिष्टनेमि आहे त्याला हवि देतो.

येणेंप्रमाणे वेदांतामध्ये जैनमताचे ऋषभनाथ, सुपार्श्वनाथ, नेमिनाथ, वर्द्धमान इत्यादि चोवीस तीर्थकराची स्तुति व पूजा आहे. ह्यावरून जैनमताला नास्तिक ह्मणता येत नाही; परतु वेदाच्याहि पूर्वीचे जैनमत असले पाहिजे असे सिद्ध होते. असो. आता जैनागमात कालाचें जे स्वरूप दाखविले आहे त्याचे येथे सक्षेपतः वर्णन करितो काल हा अनंत व अमर्याद असून अनादि आहे तरी त्याची महात्म्येश्रेष्ठ पुरुषानी मर्यादा ठरविली आहे. कालाचे उत्सर्पिणी व अवसर्पिणी असे दोन भेद आहेत हें पूर्वी सांगितलेच आहे. प्रत्येक काल **दहा कोटी सागरोपम** वर्षाचा आहे. उत्सर्पिणी व अवसर्पिणी हे काल मिळून एक **कल्प** होतो. या प्रत्येकाचे (१) **सुखमासुखमा** (२) **सुखमा** (३) **सुखमा दुखमा** (४) **दुखमा सुखमा** (५) **दुखमा** व (६) **दुखमा दुखमा** असे सहा भेद आहेत. उत्सर्पिणी ह्मणजे चढता काळ (Period ascending from worse to best) आणि अवसर्पिणी ह्मणजे उतरता काळ ( Period descending from best to worst ) उत्सर्पिणी कालात मानवी आयुष्य, बल, शरीर, उंची आणि वैभव ही वाढत्या प्रमाणावर असतात. व अवसर्पिणीमध्यें ती कमी कमी होऊन अखेर ऱ्हास पावतात. ज्याप्रमाणे रहाटगाडगे किंवा चक्र सदैव परिभ्रमण करीत असते त्याप्रमाणे **कालचक्र** सदैव फिरत आहे. उत्सर्पिणी झाल्यावर अवसर्पिणी व अवसर्पिणी झाल्यावर उत्सर्पिणी. प्रस्तुत अवसर्पिणी काल चालू आहे.

### पहिला सुखमा सुखमा काल

हा अवसर्पिणीकालाचा प्रथम भाग होय. याकाली मनुष्यांची आयुष्यमर्यादा तीन उद्धार पल्योपम वर्षाची असते. शरीर सुदृढ व

सुदर मदनाप्रमाणें असून मनाचे परिणाम शांत असतात. त्याकाळीं कल्पवृक्षांचें या भूमीवर अस्तित्व असल्यामुळे सर्व लोक त्याच्याद्वारा आपली उणीव नाहींशी करीत. यामुळे अपपरभाव आणि कमी जास्ती हा भेद नसे. त्याकाळी मनुष्यास दुःख, थकवा, घाम, रोग व पीडा वगैरे मुळींच नसत. स्त्रीपुरुष एकमेकांवर अनुरक्त असून तीं सुखीं मनुष्यें देवाप्रमाणे आपलें आयुष्य सुखात घालवीत. जांभई किंवा शिंकेच्याद्वारे त्याचे प्राणोत्क्रमण होई. दिव्यभोग उपभोगण्यास सदैव मिळत असल्यामुळे त्याकाळीं ही पृथ्वी **भोगभूमि** या सज्ञेस पात्र झाली होती. हा काळ सपल्यानतर:—

## दुसरा सुखमा काल

आला. त्याकालीं पृथ्वीची स्थिति **मध्यम भोगभूमी**प्रमाणें झाली. हा काल तीन सागरोपम कोटि वर्षाचा असून मानवी आयुष्य दोन पल्य वर्षाचे असे. याकाळीही मानवी प्राण्याची उत्पत्ती ‘ सुखमा सुखमा ’ काळाप्रमाणेंच मातापित्याचे मरणसमयी होत असे. पुत्र व पुत्री याना ते जन्म देऊन जांभईच्या किंवा शिकेच्याद्वारे प्राणोत्क्रमण करीत. मग ते स्त्रीपुरुषाचे युगल एकोणपन्नास दिवसात वृद्धिंगत होऊन पूर्वावस्थेस प्राप्त होई. हे जरी आजच्या कालमानाने बधू–भगिनी असत तरी त्या कालाचे परिपाठीप्रमाणें ते पति–पत्नी या नात्याने कल्पवृक्षाच्या सुखांत आपला काल व्यतीत करीत. हा काल सपल्यावर

## तिसरा सुखमा दुखमा

काल प्राप्त झाला. याकाली मानवी आयुष्य एक पल्य वर्षाचें असून तीच परिपाठी व कल्पवृक्षसुख कायम असे. याकालीं पृथ्वीची स्थिती **जघन्यभोगभूमी**प्रमाणे होती. या कालाचा जेव्हां आठवा भाग उरला तेव्हां दहा कल्पवृक्षांपैकीं तेजःपुज प्रकाश देणारा **ज्योतिरंग** कल्पवृक्ष अदृश्य होऊन आषाढ शुद्ध पौर्णिमेच्या दिवशीं प्रातःकाळीं सूर्य

व सायंकाळी चंद्र आकाशांत पूर्ण प्रकाशू लागले. त्यावेळीं **प्रतिश्रुति** नांवाचा पहिला मनु ( कुलकर ) होता. त्याचें आयुष्य पल्याचे दशांश भागाचे असून शरीर आठशे धनुष्ये उच्च होते. ज्योतिरंग कल्पवृक्षाचा अभाव व सूर्यचंद्रांचा प्रकाश यामुळे त्यावेळी लोकाचे मनात भीति उत्पन्न झाली; पण मनूने कालस्थितीचे स्वरूप सर्वास समजावून सांगतांच ते निर्भय झाले. नंतर **सन्मति** मनु उत्पन्न झाला. त्याचे वेळी रात्रीं ग्रह, नक्षत्र, तारे प्रकाशू लागले. नंतर **क्षेमंकर** मनु उत्पन्न झाला. त्याचे वेळीं सिंह, व्याघ्रादि पशू हिंस्रवृत्तीने आचरण करू लागले. ह्मणून त्यांपासून स्वतःचें रक्षण करण्यासाठी हत्यारे निर्माण करून त्यांचा उपयोग करण्यास या मनूने शिकविले. नंतर **क्षेमंधर, सीमंकर, सीमंधर, विमलवाहन** मनु उत्पन्न झाले. विमलवाहनाने हत्तीघोड्यास वश करून घेण्यास लोकाना शिकविले. पुढे **चक्षुष्मान्** मनु झाला. याचे वेळेपासून युगलाच्या मातापित्यांचे युगुलाच्या उत्पत्तीबरोबर होणारे मरण बंद झालें. ही नवी परिस्थिति पाहून लोक भ्याले पण मनूनें ती भीति निवारिली. पुढें **यशस्वान, अभिचंद्र, चंद्राभ व मरुदेव** असे मनु होऊन गेले. मरुदेवाने **नौकानयन** सुरू केले. मग **प्रसेनजित्** व शेवटचा चौदावा **नाभिराय** कुलकर उत्पन्न झाले. नाभिरायाचे वेळीं मुलांस नाळ दिसू लागली. ती कापण्यास या मनूने आज्ञा देऊन **नाभिराय** असे सार्थक नांव संपादिलें.

**चौदा मनु**

या मनूचें वेळीं सर्व कल्पवृक्षांचा लोप झाला. त्यावेळीं या मनूनें, आदिब्रह्मा **ऋषभनाथ तीर्थंकर** ( The First Preacher & Reformer of the World ) हे लौकरच उत्पन्न होऊन सृष्टींतील लोकांना आपापलें कर्तव्य शिकवितील, असें सांगून त्याची भीति नाहींशी केली. नाभिरायाचे आयुष्य कोटीपूर्व वर्षाचें असून शरीर पांचशे पंचवीस धनुष्यें उच्च होतें. पुढें नाभिराजाला मरुदेवीपासून आदिनाथ तीर्थंकर झाले. त्यांचे गर्भाचे व जन्माचे वेळीं इंद्रादि

**श्रीआदिनाथ तीर्थकर** देवांनीं येऊन मोठा उत्सव केला. यांचें शरीर पांचशें धनुष्ये उच असून आयु ८४ लक्षपूर्व वर्षांचे होते. त्यांनी सृष्टींतील सर्व जीवाना **असि, मसी, कृषी** व **वाणिज्य** अशीं चार निर्वाहाचीं साधनें सागितली. **क्षत्रिय, वैश्य** व **शूद्र** या त्रिवर्णाची स्थापना केली. पुढे त्यांचे पुत्र **भरत** चक्रवर्ती–ज्यांच्यामुळे आर्यावर्ताला भरतखड हें नांव प्राप्त झाले –त्यानी **ब्राह्मण** वर्णाची स्थापना करून लोक धर्ममार्गात रत केले. श्रीआदिनाथ तीर्थकरानी धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारी पुरुषार्थांचें स्वरूप सांगून ससारांतून जीवाची मुक्तता होण्यासाठी शुद्ध रत्नत्रय जैनधर्माचा सर्वांना उपदेश केला. थोडक्यात सागावयाचें ह्मणजे प्रस्तुत जी जीवसृष्टि सर्वत्र दृश्यमान होत आहे त्याचा घडा आदिनाथ तीर्थकरानी घालून दिला व सृष्टिनियामकविधाता ही सज्ञा सपादन केली. **यतिधर्म** व **गृहस्थीधर्म** आखून देऊन प्राणीमात्राला मोक्षाचा मार्ग सागितला, व ससारास वाढविणारे रागद्वेष स्वत. जिकून **जिन** ही सज्ञा प्राप्त करून घेतली. जैनधर्माचा व या जीवसृष्टीचा या युगांतील स्रष्टा हाच सत्पुरुष होय. ऋषभनाथ तीर्थकर मोक्षास गेल्यावर तीन वर्ष साडेआठ महिन्यानीं—

### चवथा दुखमा सुखमा

काल सुरू झाला. त्यावेळीं भोगभूमीची स्थिति लुप्त होऊन ही पृथ्वी **कर्मभूमि** झाली. या कालात ऋषभस्वामीनतरचे **अजितादि महावीर** तीर्थकर, सगरादि बारा चक्रवर्ति, त्रिपुष्टादि कृष्णापर्यत नऊ नारायण, अश्वग्रीव, रावण, जरासिध्वादि नऊ प्रतिनारायण, अचल, रामचद्र, बलिरामादि नऊ बलिभद्र, तसेंच नऊ नारद, भीमबल्यादि सात्यकी पावेतों अकरा रुद्र, बाहूबली, नल, हनुमान, वसुदेव, प्रद्युम्न, जबुकुमारादि चोवीस कामदेव वगैरे पुण्यवान, महापदवीधर, व मोक्षगामी पुरुष याच कालांत होऊन गेले. कालदोषामुळे आयुष्य ८४ लक्ष

१ महापुराणात याचे सर्व वर्णन सविस्तर आहे.

पूर्ववर्षापासून १०० व ७२ वर्षावर येऊन ठेपलें. शरीरउची पांचशें धनुष्यापासून अवघी सात हातांवर आली. अवसर्पिणी कालामुळे शरीर व आयु हीं जरी कमी झाली तरी विशेष हें की, जें बल श्रीआदिनाथ तीर्थकरात होते तेच महावीरात दृग्गोचर झाले. **श्रीवर्धमान** ( महावीर ) तीर्थकर मोक्षास गेल्यावर तीन वर्षें साडेआठ महिन्यांनी-

**पंचमकाल उर्फ दुखमाकाल**

सुरू झाला. आज वीरसंवत् २४३७ आहे. प्रस्तुत पंचमकाल आहे. केवलीने ( महावीर ) आपल्या दिव्यध्वनीत भविष्य वर्तविल्याप्रमाणे या कालांत धर्माचे नांवचे अस्तित्व राहील; अन्यधर्मी मिथ्यामति प्रबल होतील, पृथ्वींत अनर्थ ओढवतील; **सहाव्या कालीं** सर्वत्र अधर्माचा प्रसार होऊन मानवी आयुष्य आजच्या एकचतुर्थांश होईल, बाल्यावस्थेतच संतति होऊन महापाप वाढेल, व अखेर पृथ्वीचा लय होईल. नंतर सात दिवस प्रलयकालस्थितीचे पृथ्वीवर अस्तित्व होऊन अगोदर अग्नि व नंतर जलवृष्टि वगैरे होऊन पुनः सृष्टीच्या घडामोडीस उलट सुरुवात होईल. असा हा कालाचा हिशेब आहे. या अल्प विवेचनावरून पूर्वीचें व भावीकालाचे स्वरूप सहज समजेल.

जे लोक जैनाना तत्वविद्या नाहीं असे ह्मणतात ते सर्वस्वी चुकले आहेत ही गोष्ट यावरून सिद्ध होते. आमच्या पूर्वाचार्यांनीं तत्वज्ञानाचें स्वरूप, त्याचे धर्म व त्याची साधने या सर्वांस नित्य, त्रिकालाबाध्य असे अढळस्थान देऊन टाकिले आहे. विश्वज्ञानाचे क्षेत्र केवढेंहि विस्तृत झालें, विद्याचा व कलाचा केवढाही कल्पनातीत उत्कर्ष झाला, तथापि आमच्या तत्वज्ञानाच्या स्वरूपास यापुढे बालाग्रहि धक्का लागणार नाहीं. विद्वान पूर्वाचार्यांनी तत्वज्ञानामध्ये सर्वांपेक्षां अघाडी मारून तें अत्यंत पूर्णावस्थेस नेलें आहे हें ' जैनाना तत्वज्ञान नाहीं ' अशा प्रकारचें पोचट व बाष्कळपणाचे विधान कर-

---

१ १ दुखमा दुखमा, २ दुखमा, ३ दुखमा सुखमा, ४ सुखमा दुखमा, ५ सुखमा, ६ सुखमा सुखमा हे उलटें कालपरिभ्रमण समजावें.

णाऱ्या सद्गृहस्थांनीं ध्यानांत ठेवावे. जैनागमातील सिद्धांत व प्रमेये यांची सघटना इतकी उत्कृष्ट झाली आहे कीं ते सिद्धांत व तीं प्रमेये अधिकारपुरःसर समजून उमजण्यापलीकडे आमचे कर्तव्यच राहिले नाही. परतु आमच्या सौभाग्याने प्राप्त झालेल्या या अलभ्य लाभाचे रहस्य कळण्याइतकी पात्रता फारच थोड्याच्या अगी दिसून येते ही अत्यत शोचनीय गोष्ट होय! असो. जैनांना फिलॉसफी नाहीं ह्मणणाऱ्या लेखकानी माधवाचे सर्वदर्शनसग्रह नामक पुस्तक वाचावे अशी आमची त्याना विनति आहे. येथपर्यंत जैनांच्या तत्वज्ञानाचे थोडक्यात वर्णन केले. आता 'रत्नत्रयी' चें वर्णन करितो.

## रत्नत्रयी.

सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, व सम्यक्चारित्र हे तिन्ही मिळून मोक्षमार्ग आहे. या तीन साधनाच्या समुच्चयाला **'रत्नत्रयी'** असे ह्मटलें आहे. आत्म्याशिवाय इतर कोणत्याहि द्रव्यांत रत्नत्रय ( सम्यग्दर्शनज्ञानचारित्र ) असत नाही. ह्मणून तत्रिकमय ह्मणजे रत्नत्रयमय असा जो आत्मा तोच मोक्षास कारण आहे. आत्म्याचे खरे हित सुखात आहे. सुखाचें लक्षण निराकुलता आहे. आकुलता उर्फ चिंता ससारांत सर्व ठिकाणी भरलेली आहे. ही आकुलता व ही दुःखे फक्त एका मोक्षामध्येच नाहीत. ह्याकरिता सुखाची इच्छा करणाऱ्या लोकानीं मोक्षमार्गाने चालावे. मोक्षाचे समर्थ कारण सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, व सम्यग्चारित्र याची एकत्रता अर्थात् पूर्णता हे होय. ज्ञान पांगळे, चारित्र आंधळे व दर्शन आळशी आहे. दर्शन नेत्रयुक्त आहे, पण ज्ञानावाचून आळशी आहे. ज्ञान आहे ते नेत्रयुक्त उद्योगी आहे. पण चारित्रावाचून पागळे आहे. चारित्र क्रियावान आहे पण ज्ञानाशिवाय आंधळे आहे. याप्रमाणे एकेकात एकेक गुण आहे ह्मणून ही एकत्रता झाल्याशिवाय मोक्षप्राप्ति होत नाही, परतु ह्या तिन्हींची एकत्रता (पूर्णता) युगपत् ह्मणजे एकदम होत नाही; क्रमपूर्वक होते. ह्या तिन्हींपैकीं मोक्षाचें पहिले साधन सम्यग्दर्शन आहे. त्याचे लक्षण असे

आहे. **'तत्वार्थश्रद्धानं सम्यग्दर्शनम्'** ह्मणजे जीव, अजीव वगैरे जीं सात तत्वे पूर्वी सांगितली त्याच्या स्वरूपाचे यथार्थ **श्रद्धान करणे** ह्याचें नाव **सम्यग्दर्शन.** तत्वांचे यथार्थ श्रद्धान व्हावे ह्मणून आमच्या प्राचीन ऋषींनी धर्मशास्त्राचे चार भाग केले आहेत. **१ प्रथमानुयोग** (धर्मकथानुयोग), **२ चरणानुयोग, ३ करणानुयोग** (गणितानुयोग) व **४ द्रव्यानुयोग.** धार्मिक विषयामध्ये धर्मसंस्काररहित प्राण्याची अवस्था अर्भकासारखी असते. ह्मणून प्रथम धर्मात्म्या पुरुषाचीं चरित्रें व पुण्यपापांचे फल दाखविणाऱ्या मनोरंजक व बोधपर गोष्टी, वाचून व ऐकून आपणा स्वतःमध्यें धर्मरुचि उत्पन्न केली पाहिजे. ह्या पुण्यपुरुषांच्या कथा वाचल्यापासून तत्वार्थश्रद्धाहि वाढत जाईल. चरणानुयोगामध्ये गृहस्थ व मुनि यांच्या चारित्राचें वर्णन केलेले असते. करणानुयोगामध्ये लोक, अलोक ह्याचे वर्णन असून उत्सर्पिणी व अवसर्पिणी अशा कालाच्या परिवर्तनाचे व चार गतीच्या परिवर्तनाचें वर्णन आहे. त्याचप्रमाणे सांप्रत द्रव्यानुयोगाचे ज्ञान व्हावें ह्मणून त्याचाहि अभ्यास व मनन करण्याची अत्यंत आवश्यकता आहे. कारण जैनांच्या द्रव्यानुयोगामध्ये जीव, पुद्गलपरमाणु, धर्म, अधर्म, आकाश व काल या सहा द्रव्याचें स्वरूप जिनेंद्रदेवाने इतक्या सुंदर रीतीनें व पूर्णत्वाने दाखविले आहे कीं, अधुनिककाळचे विज्ञानशास्त्र ( Science ) वेत्तेहि आश्चर्यचकित झाल्याशिवाय राहणार नाहीत अशी आमची खात्री आहे. असो. मिथ्यात्वरूपी अंधकाराचा नाश केल्यावाचून सम्यग्दर्शन उदयास येत नाही. हें सम्यग्दर्शन ज्ञान व चारित्र याचे मूळ आहे. आणि सम्यग्दर्शनच आत्म्याचे स्वरूप होय. सम्यग्दर्शन असले ह्मणजे दुरभिनिवेश (संशय, विमोह व विभ्रम) रहित असे सम्यग्ज्ञान प्राप्त होते. तसेच निर्दोष आणि सर्वज्ञ असून जो आगमाचा कर्ता तो आप्त ( परमेश्वर ) असे मानणें, व त्या आप्ताने सांगितलेले, तत्वोपदेश करणारे, प्रत्यक्ष व परोक्ष ह्या दोन्ही प्रमाणाला बाध न आणणारें, ज्यांमध्ये संपूर्ण सहा कायजीवांच्या हिंसेचा निषेध केला आहे, आणि

आत्म्याचा उद्धार होण्याचा उपाय आहे, वस्तूचें अनेकांत स्वरूप साक्षात् ज्यांत दाखविले आहे, सर्वांचे हित वर्णन करणारे व कुमार्गाचे खण्डन करणारे जे शास्त्र त्यालाच **आगम** मानणे आणि विषयावरील इच्छा सोडून जो निरारंभ व परिग्रहरहित असून, ज्ञान, ध्यान व तप ह्यामध्ये निमग्न असणारा, कर्मोदयामुळे उत्पन्न झालेल्या सुखदुःखांमध्यें साम्यभाव धारण करणारा व जो दिगंबर आहे तोच **गुरु** आहे असे मानणे हेंहि सम्यग्दर्शन आहे. तेव्हा सत्य अशा आप्त (देव), आगम (शास्त्र) व गुरु याच्या ठायी तीन मूढता व आठ मद यानी रहित, व आठ अगानी युक्त अशी जी श्रद्धा तीस सम्यग्दर्शन ह्मणतात. अष्टागसम्यक्त्व- **निःशंका, निष्कांक्षा, निर्विचिकित्सता, अमूढदृष्टित्व, उपगूहन, स्थितिकरण, वात्सल्य,** आणि **मार्गप्रभावना.** ह्या आठ गुणास सम्यक्त्वाचीं आठ अगें ह्मणतात. ही असल्याशिवाय सम्यक्त्व शुद्ध नव्हे. जिनाने सागितलेले तत्व हेंच आहे, व असेच आहे, दुसरे नाही व दुसऱ्या प्रकारे नाही अशी श्रद्धा बळकट असणे याचे नाव **निःशंका.** ससारसुखाची इच्छा न करणें, याचे नाव **निष्कांक्षा.** रत्नत्रयधारी स्वधर्मीयाच्या देहाची चिळस न करणे याचे नाव **निर्विचिकित्सा.** कुमार्गास न भुलणें याचे नांव **अमूढदृष्टित्व.** सधर्मीयांचे दोष झांकणे याचे नाव **उपगूहन.** कोणी सम्यक्त्वव्रते इत्यादिकांपासून भ्रष्ट झाल्यास त्याला उपदेश करून पुनः मार्गास लावणे याचे नाव **स्थितिकरण.** धर्मबधूवर प्रेम करणे याचे नाव **वात्सल्य.** लोकातलें अज्ञान दूर करून जिनधर्माचा प्रभाव दाखविणें याचे नांव **मार्गप्रभावना.** ही आठ सम्यग्दर्शनाची अगे आहेत. ह्या आठ गुणाच्या उलट ह्मणजे **शंका, कांक्षा, जुगुप्सा, मूढदृष्टिता, अनुपगूहन, अस्थितिकरण, अवात्सल्य,** आणि **अमार्गप्रभावना** हे आठ दुर्गुण सम्यक्त्वाचे आठ दोष आहेत. हे आठ, मूढत्वाचे तीन प्रकार, सहा अनायतने आणि आठ मद मिळून पंचवीस दोषानीं रहित असें जे सम्यक्त्व ते शुद्ध सम्यक्त्व होय.

**मूढत्रय-देवमूढ, लोकमूढ,** व **पाखंडीमूढ** असे मूढत्वाचे तीन प्रकार आहेत. रागद्वेषानी मलिन अशा देवाला नमस्कार करणें याला **देवमूढ** ह्मणतात. **'यो यच्छ्रद्धः स एव सः'** ज्याची जशी श्रद्धा असेल तशा प्रकारचा तो मनुष्य होतो. तुमचा देव जर क्रूर, रक्ताचा अभिलाषी असला तर तुह्मीहि क्रूर दुसऱ्याच्या रक्ताचे घोंट घेणारे असे व्हाल. ह्मणून जनतेची व आपली उन्नतदशा करून घेणे आहे तर अशा प्रकारच्या देवताचे भजनपूजन वर्ज्य केले पाहिजे. ह्या गोष्टीकडे निदान आमच्या मिथ्यात्वावर श्रद्धान ठेवू इच्छिणाऱ्या जैन बाधवानी तरी अवश्य लक्ष द्यावें अशी आमची त्याना सवि-नय प्रार्थना आहे. अर्थात् त्यानीं ह्मसोबा, बहिरोबा, अबाबाई, तुकाई आदि देवतावरील विश्वास नष्ट केला पाहिजे. कारण हे देव व ह्या देवता कामी, क्रोधी व शस्त्रधारी आहेत. ह्मणून त्या पूज्य नाहीत. परमेश्वर हा निर्विकार, निर्विकल्प, निष्कलक, निरजन, निष्क्रिय व स्वतत्र असा आहे. परमेश्वराचें वास्तविक असे सच्चिदानद स्वरूप असतां या इहलोकीच्या काही माणसांनी त्याला आह्मा मानवी प्राण्या-सारखेंच क्षुद्र आनदाने आनदित होणारे व क्षुद्र दु.खानें दुःखित होणारें मन दिलेलें आहे. त्यालाहि आमच्या सारखेंच मनोविकार आहेत, असे आह्मी ठरविले आहे! आह्माला जसे रागद्वेष आहेत त्याचप्रमाणे ते त्यालाहि असल्याचें आमच्यातील काहीजणानी कल्पिले आहे. एखाद्या साध्या व विकारवश माणसाप्रमाणें तू आमच्यावर रागावतोस व लहर लागेल तेव्हा खुपहि होतोस! अशा मनोविका-राच्या तडाक्यामध्ये सापडल्यामुळे तू कधी कधी एखाद्या क्षुद्र माण-साप्रमाणे वर्तन करताना आढळतोस. तुला एक चार पैशाचा नारळ चढविला ह्मणजे तेवढ्यावर खुष होऊन आमच्या एखाद्या श्रीमत बाईची हजारो रुपये किंमतीची हरवलेली नथ जेथे होती तेथे तू आणून ठेवतोस! एखाद्या बाईने तुळजापुरच्या अबाबाईची वारी केली नाहीं की तू तिच्यावर रागावून तिच्या मुलाचा हिवताप बद करीत

नाहींस ! तुला एखाद्या कचेरींतील कारकुनाप्रमाणें लांच दिल्यावांचून तू लोकांचें काम करीत नाहीस, व तुला भोगी केल्यावांचून लहान मुलाच्या निघालेल्या देवी तू बऱ्या करीत नाहींस ! हे सच्चिदानद परमेश्वरा, हे धर्म तुझ्या ठिकाणी कसे सभवतात ? हे जे लोकांनीं तुझ्यावर अज्ञानामुळे व स्वार्थाने अनेक अध्यारोप केलेले आहेत ते सर्व वाईट, दोषार्ह व असह्य आहेत. असे दोषारोप आह्मी आमच्या मूढतेमुळे तुझ्यावर करितो. असो. आता लोकमूढतेचे लक्षण सागतो.

सूर्याला अर्घ्य देणे, ग्रहणाच्या निमित्तानें स्नान करणें, सध्याकाळीं दिवा लावून हात जोडणे, पर्वतावरून ढासळून मुद्दाम मरून, अथवा अग्नीत पडून मोक्ष समजणे, गाईच्या शेपटीला नमस्कार करणे, लक्ष्मीपूजन करणे, पिपळाला प्रदक्षणा घालणे, नदीस्नानाने पुण्य समजणे, ही सर्व **लोकमूढतेचीं** लक्षणे होत. ससाराच्या भोवऱ्यात स्वत· सापडलेले, परिग्रह ठेवणारे असे जे पाखडी लोक त्याची सेवा करून पुण्य मानणे याला **पाखंडीमूढता** ह्मणतात. या मूढत्रयाच्या योगानें परवश झालेले प्राणी नरकास जातात. मिथ्यादर्शनाने असे जे विपरीत श्रद्धान होते ते सोडले पाहिजे. ह्मणून तीन मूढता सोडून श्रद्धान उज्वल करावे.

**षडनायतन**—कुदेव, कुगुरु, कुशास्त्र, कुदेवसेवक, कुगुरुसेवक, कुशास्त्रसेवक याचा सत्कार करणे ही सहा अनायतने होत. ह्या सहाहि अनायतनांमध्ये सम्यग्धर्म नाही असे दृढ श्रद्धान केल्याने दर्शनाची शुद्धता होते.

**अष्टमद**—जातिमद, कुलमद, ऐश्वर्यमद, रूपमद, ज्ञानमद, बलमद, तपोमद व पूजामद ( मोठेपणाचा गर्व ) असे आठ प्रकारचे मद आहेत. हे आठ कर्मस्वाधीन आहेत. ह्मणून ह्याचा गर्व सोडा. याप्रमाणें तीन मूढता, शकादिक आठ दोष, सहा अनायतन, व अष्ट मद मिळून २५ दोषांनी रहित असे जे सम्यक्त्व ते निर्दोष ह्मणजे शुद्ध सम्यक्त्व होय. हे दोष टाळल्याने सम्यग्दर्शन उज्वल होते. जोपर्यंत शुद्ध सम्यक्त्व नाही तोपर्यंत हा संसारसागर भयकर

वाटतो, तोंपर्यंतच जन्ममरण आणि दुःखेंहि तोपर्यंतच. **सम्यग्दर्शन** मोक्षरूपी महालात चढण्याची पहिली पायरी आहे. ह्याशिवाय ज्ञान आणि चारित्र सम्यक्पणे अर्थात् सत्यपणें प्राप्त होत नाहींत. मोक्ष-मार्गामध्ये सम्यग्दर्शन हें नावाड्यासारखें समजले आहे. ज्यांचें सम्य-ग्दर्शन शुद्ध आहे ते व्रतरहित जरी असले तरी त्याना नरकगति, तिर्यंचगति, नपुसकपणा, स्त्रीपणा, अल्पायु, दारिद्र्य इत्यादि गोष्टी होत नाहींत. मोक्षमार्गाचे दुसरें साधन **सम्यग्ज्ञान** होय. जीवादि पदार्थांचें सशयविपर्ययअनध्यवसायरहित जे यथार्थ ज्ञान त्याला सर्वज्ञांनी **सम्यग्ज्ञान** असे ह्मटले आहे. सम्यग्ज्ञानानें आत्मज्ञान होतें; व आत्मज्ञानाने केवलज्ञान होतें. ज्ञानाच्या योगाने जन्मोजन्मी केलेल्या पापांचा नाश होतो. ज्ञानाभ्यासाने माया, मिथ्या व निदान हीं तीन शल्यें नाहीशी होतात. ज्ञानाभ्यासापासून अनेक प्रकारचे विकल्प नाहींसे होतात. ज्ञानाभ्यासापासून धर्मध्यानांत व शुक्लध्यानांत मन अचल राहतें. ज्ञानानेच उत्तम क्षमादिगुण प्रकट होतात. सम्यग्ज्ञान हे आत्म्याचे स्वाधीन व अविनाशी धन आहे. ज्ञानच सम्यग्दर्शन उत्पन्न करिते. मनुष्यप्राणी उत्तरोत्तर परिस्थितीच्या गुलामगिरींतून सुटका पावून त्याच्या आत्म्याच्या ठायीं ज्या थोर व गूढ शक्ति आहेत त्यांचे सपादन करून तो पूर्ण स्वतत्र व्हावा हाच हेतु मनुष्यजीव-नाच्या उत्क्रांतीचा आहे ही गोष्ट ज्ञानापासून कळते; अर्थात् ज्ञाना-पासूनच मोक्ष प्राप्त होतो. हा जीव अनेक वेळां मुनीव्रत धारण करून ग्रीवक विमानामध्येंहि गेला, परतु आत्मज्ञानाच्या अभावीं तेथेंहि त्याला थोडेसेहि निराकुल असे सुख मिळाले नाहीं. ज्ञान हें आत्म्याचे स्वरूप आहे. अर्थात् ज्ञानाच्या योगानेंच आत्मा निश्चल राहतो. पडित दौल-तरामजींनी आपल्या छहढालेत ह्मटले आहे:—

**जे पुरब शिव गए, जाहिं अब आगे जैहैं ।**
**सो सब महिमा ज्ञान, तणी मुनिनाथ कहे हे ॥**

अर्थात् जितके कोणी पूर्वी मोक्षाला गेले, आज जातात, अथवा

पुढे जातील तितके सर्व ज्ञानाच्या प्रभावानेच मोक्षाला गेले **असे** **जिनेंद्र** भगवान ह्मणतात. ज्ञानाशिवाय परमार्थ व व्यवहार दोन्ही नष्ट होतात. ह्मणून आयुष्यांतील एक घटका देखील सम्यग्ज्ञानाशिवाय जाऊ देऊ नका. आतां तिसरें साधन सम्यग्चारित्र. ससार उत्पन्न होण्यास कारणीभूत अशा मिथ्यात्व कषायादि क्रियेपासून विरक्त होणे यास सम्यग्चारित्र ह्मणतात. ह्मणजे सम्यग्दर्शन व सम्यग्ज्ञान ज्याला प्राप्त झालें आहे त्याने आपले आचरण तसेच शुद्ध व निर्मळ ठेवणे ह्याला सम्यग्चारित्र ह्मणावें. तसेच '**चारित्रेण विना न भाति सततं यद्यप्यसौ शस्त्रवान्**' यावरून चारित्राची महति सहज करून येईल. भव्य जीव सम्यग्दर्शन व सम्यग्ज्ञान झाल्यानतर रागद्वेषादि विकार मावळण्यासाठी चारित्राचा अंगिकार करितो. कारण रागद्वेष नाहीसे झाले ह्मणजे हिंसादि पाच पातकांचा पूर्णपणे अभाव होतो. सम्यग्चारित्राचे दोन भेद केले आहेत. एक सकलचारित्र, आणि एक विकलचारित्र. शुद्ध असे सकलचारित्र विरत अशा मुनीजनाला होते. हें साधूपदवींत पाळलें जातें. व विकलचारित्र घर, बायको, मुलगा, द्रव्य इत्यादि परिग्रह ज्याला आहेत अशा गृहस्थी श्रावकाला होते. सागारधर्मामृतात असे ह्मटलें आहे, ''धर्म, अर्थ व काम या तिहीनीं युक्त असाच मनुष्य सागारधर्म (गृहस्थधर्म) चालविण्यास योग्य आहे. मनुष्यानें धर्म साभाळून व योग्य तितके काम सेवन करून धन मिळवावें. अर्थ व काम यांचा अतिक्रम करून केवळ धर्ममार्गाने चालणे हे यतींचे कर्तव्य आहे; श्रावकाचे नव्हे. आणि यतिधर्म चागला चालण्यास शुद्ध गृहस्थधर्म पाळणाऱ्यांची अत्यत आवश्यकता आहे. श्रावकधर्माच्या अभावीं यतिधर्म चालणे शक्य नाही. येथे हीहि गोष्ट ध्यानात ठेविली पाहिजे की, 'श्रावगी' असा शब्द कित्येक ठिकाणी प्रचारात आहे तो चुकीचा असून खरा शब्द 'श्रावक' असा आहे. 'श्रावक' शब्दाचा अपभ्रंश करून 'श्रावगी' असा वेडावाकडा चुकीचा शब्द अज्ञान लोकांनी प्रचा-

रांत आणिला आहे. ' श्रावक ' ह्मणजे ' श्रुणोति गुरुभ्यः स श्रावक ' अर्थात् गुरूपासून जो धर्मशास्त्र श्रवण करितो तो श्रावक. ' श्रावक ' यालाच ' उपासक ' असेहि ह्मणतात. पण काही कोशकारांनीं 'बौद्ध-धर्मानुयायी ' अथवा ' बुद्धाचा भक्त ' ('A Buddhist votary in general.' By Apte V .S ) असा अर्थ केला आहे. याचें कारण त्यांना ' बौद्धधर्म ' व जैनधर्म ' यांतील खरा भेद कळला नाही हेच होय. ' श्रावक ' ह्मणजे जैनधर्मउपासक असाच खरा अर्थ आहे. ' श्रावकाचार ' व ' यत्याचार ' असे निराळे दोन आचार आहेत. यांवरून श्रावक ह्मणजे मुनी नव्हे हें कोणीहि कबूल करील. गृहिणी, पुत्र, मित्र, परिवार यासह राहणारा तो श्रावक होय. ह्मणून गृहस्थाला ' श्रावक ' असे जैनधर्मात नांव दिले आहे. श्राव-काचे दोन प्रकार आहेत. अव्रतीश्रावक, व व्रतीश्रावक. व्रत करून आपल्या चारित्राला पाळण्याची शक्ति नाही ते अव्रतीश्रावक. ह्याना ' अविरत सम्यग्दृष्टि ' असेहि ह्मणतात. कारण सम्यग्दर्शन व सम्य-ग्ज्ञान त्याना झाले असून चारित्राला अद्याप आरंभ झाला नाही. व्रतें करून आपल्या चारित्राला पाळणारे ते व्रती श्रावक होत. ' **धर्मः स्वदारसंतोषाद्यात्मकः संयमोलक्षणो देवादिपरिचरणस्वरूपः सत्पात्रदानादि स्वभावः** ' ह्मणजे स्वस्त्रीच्याच ठायीं रत होऊन संतोष मानणें, मन स्वाधीन ठेवणे, देव, गुरु, यांची सेवा करणे, सत्पात्रदान वगैरे करणे हा सगळा श्रावकाचा धर्म आहे. श्रावकध-र्माचेच निरूपण करणारे असे बरेचसे ग्रंथ आपल्यामध्ये आहेत. त्यापैकीं हल्लीं जे काहीं पाहण्यांत येतात ते हे होत.—

| **पुस्तकाचें नांव.** | **कर्त्याचें नांव.** | **विक्रमसाल.** |
|---|---|---|
| १ रत्नकरंडश्रावकाचार | समंतभद्राचार्य | १२५ |
| २ वसुनंदिश्रावकाचार | वसुनंदिस्वामि | ५२६ |
| ३ चारित्रसार | चामुंडराय | ७९५ |
| ४ पुरुषार्थसिध्युपाय | अमृतचंद्राचार्य | ९६२ |

| | | |
|---|---|---|
| ५ अमितगतिश्रावकाचार | अमितगतिमुनि | १०५० |
| ६ सागारधर्मामृत | आशाधरपंडित | १२९२ |
| ७ प्रश्नोत्तरोपकासश्रावकाचार | सकलकीर्तिमुनि | १४९५ |

उपरि निर्दिष्ट सर्वमान्य ग्रथांमध्ये श्रावकधर्माचे फार सुदर रीतीनें विवेचन करून श्रावकधर्मांचे महत्व दाखविले आहे. द्वादशांग जिनवाणीमध्ये श्रावकाचार किंवा उपासकाध्ययन हें सातवें अग आहे. यावरूनहि (गार्हस्थ्य) श्रावकधर्माचे प्राधान्य सहज कोणाच्याहि ध्यानांत येईल. असो. व्रती **श्रावकांच्या** क्रमाक्रमानें अकरा प्रतिमा ह्मणजे पायऱ्या आहेत. ह्या अकरा प्रतिमा शाळेतील अकरा वर्गांप्रमाणे आहेत. त्या अकरा प्रतिमाचें येथें सक्षेपत· वर्णन करितो.

## एकादशप्रतिमावर्णन.

**१ दर्शनप्रतिमा**— या प्रतिमेच्या श्रावकाला खालील नियम पाळावे लागतात·—

( क ) मी सत्य अशा आप्त (देव), आगम (शास्त्र), गुरु व धर्म याजवर श्रद्धा ठेवीन. अर्थात् सम्यग्दर्शन हें शुद्ध ह्मणजे २५ दोषानीं रहित असें पाळीन. (ख) मी आठ मूलगुण पाळीन. ह्मणजे मद्य, मांस व मध–ज्याला तीन मकार ह्मणतात ह्या तिहीचा त्याग करीन. आणि पाच अणुव्रतें अथवा पाच उदुंबर ह्मणजे वड, पिंपळ, उंबर, कठुंबर, व पाकरफळ ही खाणार नाहीं ( ग ) मी सात प्रकारचीं व्यसनें ह्मणजे **१ जुगार, २ मांसभक्षण, ३ मद्यपान, ४ वेश्यासंग, ५ शिकार, ६ चोरी** आणि **७ परस्त्रीसेवन** ही वर्ज करीन. ( घ ) मीं प्रत्यहीं मंदिरामध्ये जाऊन देवाचे दर्शन करीन ह्मणजे पचपरमेष्ठीच्या पायाशीं सतत शरण असेन. हिला पहिली '**दर्शनप्रतिमा**' असे ह्मणतात.

**२ व्रतप्रतिमा**–ह्या प्रतिमेच्या श्रावकानें खालील नियम पाळावेत.

(क) मी शुद्ध ह्मणजे अतिचाररहित पांच अणुव्रतें, तीन गुणव्रतें व चार शिक्षाव्रतें अशी बारा व्रतें निर्दोषपणे पाळीन.

## पांच अणुव्रतें.

**संकल्पात्कृतकारित मननाद्योगत्रयस्य चरसत्वान् ।**
**न हिनस्ति यत्तदाहुः स्थूलवधाद्विरमणं निपुणाः ॥**

**अर्थः—** मन, वचन, काया अशा तिन्ही योगाच्या संकल्पाने आणि कृत कारित अनुमोदनानी त्रसजीवाला न मारणें याला **स्थूलहिंसात्याग** ह्मणतात. संकल्पी स्थूलहिंसेचा त्याग करणें, जाणूनबुजून हालत्याचालत्या दोन इंद्रियाच्या अथवा तीन चार पाच इंद्रियाच्या प्राण्यांचा वध न करणे व न करविणे हे पहिले **अहिंसा-अणुव्रत** होय. ह्या व्रताचे पाच अतिचार ( दोष ) आहेत. १ काठी चाबूक वगैरेनीं जीवाना मारणे, २ त्यांस बाधून टाकणे, ३ पशूचें कान नाक वगैरे कापणे, ४ त्यान्या शक्तीबाहेर काम घेणे, ५ त्यांना खाण्यापिण्याला प्रतिबंध करणे. हे दोष टाळून अहिंसा अणुव्रत पाळले पाहिजे ह्मणजे ते निर्दोष झालें.

दुसरे स्थूल **असत्यभाषण** त्याग नावाचे अणुव्रत आहे. '**असदभिदानमनृतम्**' ह्मणजे प्रमत्तयोगाने प्राणिमात्राना दुःखकारक निंद्य असत्यवचन बोलणें यास खोटे असे ह्मणतात. ह्याचे पाचे दोष आहेत. १ असत्याचा उपदेश करणे, २ स्त्रीपुरुषाची एकातातील गुप्त गोष्ट फोडणे, चहाडी सागणें, ३ खोटा मजकूर लिहिणें, व खोटे दस्त करणे, ४ हिशेबांत भोळे घेणें, ५ चर्येवरून गुप्त अभिप्राय समजून प्रसिद्ध करणे, हे दोष टाळल्याने **सत्यअणुव्रत** पाळले जाते.

तिसरे **अचौर्यअणुव्रत,** ह्मणजे स्थूल चोरीचा त्याग करणे हे होय. "**प्रमत्तयोगात् अदत्तादानं स्तेयं**" अर्थात् प्रमादाच्या योगाने परद्रव्य ग्रहण करणें याचे नाव चोरी. ह्मणून रस्त्यात पड-

---

१ **वधबन्धच्छेदातिभारारोपणान्नपाननिरोधाः ।**

—( त सू. अ ७ सू २५ )

२ **मिथ्योपदेशरहोभ्याख्यानकूटलेखक्रियान्यासापहार-साकारमन्त्रभेदाः ॥** —( त. सू. अ. ७. सू २६ )

लेलें, किंवा कोणी विसरलेलें, अथवा कोणी ठेविलेले आणि कोणी आपणास घे ह्मणून न दिलेलें आपण घेणे ही स्थूलचोरी आहे. अशा कृतीला **स्थूलअचौर्यव्रत** ह्मणतात. ह्याचेहि पांचे दोष आहेत. १ दुसऱ्याला चोरीचा उपदेश करून त्याच्याकडून चोरी कराविणे. २ चोरीचा माल घेणे. ३ नीतीविरुद्ध व राजाच्या कायद्याविरुद्ध मालाची जकात न देतां चोरून माल नेऊन परगांवीं विकणे. ४ न्यूनाधिक मापानीं किंवा वजनानी देणें घेणे करणे. ५ वस्तूचे स्वरूप झांकून क्रयविक्रय करणे, हे पाच दोष टाळल्याने तिसरे अचौर्य अणुव्रत निर्दोष पाळलें जातें.

चवथे **परस्त्रीत्याग** अणुव्रत आहे. ह्मणजे पर्वकाली स्वस्त्री-चाहि त्याग करणे, परस्त्री व अनगक्रीडा ह्मणजे कामसेवनाच्या इंद्रि-यावाचून अन्यठिकाणी काममेवा केव्हाहि न करणे हे स्थूलब्रह्मचर्य होय. यालाच स्वस्त्रीसतोष असे दुसरें नाव आहे ह्याचेहि पाचे दोष आहेत. १ दुसऱ्याची लग्ने करणे, २ कामविषयाच्या इंद्रियाखेरीज इतर ठिकाणीं (अनगक्रीडा) क्रीडा करणें, ३ कामवासनेविषयीं अत्यत आसक्त असणे, ४ बीभत्स बोलणे, ५ व्यभिचारिणी स्त्रियां-कडे जाणे येणे ठेवणे. हे पाच अतिचार टाळल्याने चवथे अणुव्रत निर्दोष पाळले जाते.

पाचवें **परिग्रहप्रमाण** नावाचे अणुव्रत आहे. 'मूर्च्छा परिग्रह':- ह्मणजे बाह्य अभ्यतर चेतन अचेतनरूपी पदार्थाचे ठिकाणीं ममत्व-रूप परिणाम ठेवणे यास परिग्रह ह्मणतात. धनधान्यादि पदार्थांचे प्रमाण करून त्यापेक्षा अधिकाचा त्याग करणे, व उत्पन्नापेक्षा अधिक

---

१ **स्तेनप्रयोगतदाहृतादानविरुद्धराज्यातिक्रमहीनाधिक-मानोन्मानप्रतिरूपकव्यवहाराः** —( त. सू. अ ६ सू. २७ )

२ **परविवाहकरणेत्वरिकापरिगृहीतापरिगृहीतागमनान-ङ्गक्रीडाकामतीव्राभिनिवेशाः** । —( त. अ ७ सू. २८ )

खर्च न करणे, हें परिग्रहप्रमाण अणुव्रत होय. ह्याचे पांच अति-चार आहेत. १ लोभामुळे फाजील उलाढाली करणे, २ अधिक संग्रह करणें, ३ दुसऱ्यांचे वैभव पाहून चकित होणे. ४ अधिक लोभ करणे. ५ लोभाने फाजील ओझें लादणे. हे पाच दोष टाळल्याने पाचवें अणुव्रत निर्दोष पाळले जाते. या पाच पातकाच्या एक देश-त्यागाने व सर्व प्रकार त्यागानें अणुव्रत व महाव्रत घडते.

येथपर्यंत पाच अणुव्रताचे वर्णन केलें. ह्यांचे जे अतिचार (दोष) सांगितले ते कदाचित् घडले तरी त्यापासून अणुव्रताचा भग होत नाही. अणुव्रत मलिन मात्र होते; श्रावकपणा कांहीं जात नाहीं. हीं पाच अणुव्रते अतिचाररहित ( निर्दोष ) पाळल्यास, इंडियन पीनलकोडापैकीं कोणताहि गुन्हा माणसाच्या हातून घडणार नाही. कारण श्रावकाला जे प्रतिक्रमण ( सध्या ) करावें लागते त्याचा पाठच असा आहे कीं, त्याला सर्व प्रकारच्या गुन्ह्यापासून दूर राहण्याची सवय लागते. आता तीन गुणव्रताचे वर्णन करितो.

## तीन गुणव्रते.

**दिग्व्रत**–सूक्ष्म पापाच्या निवारणार्थ पूर्व पश्चिम वगैरे दहा दिशांला अमुक कोसापेक्षा पुढे जाणार नाही अशी आजन्म प्रतिज्ञा करणे यास दिग्व्रत ह्मणतात. आपण मर्यादित केलेल्या दिशेत हिंसेला यत्किंचित आधार असला तरी त्याच्या बाहेरच्या प्रदेशांत होत असलेल्या हिंसेचा संबध आपणास होत नाहीं. त्यायोगानें अणुव्रतालाच महाव्रताची योग्यता येते.

**अनर्थदंडविरति** ह्मणजे केलेल्या मर्यादेतहि विनाकारण पापकर्मे न करणे. उदाहरणार्थ–पापोपदेश करणे, हिंसा करण्याचीं हत्यारे देणे, वाईट गोष्टींचें चिंतन करीत बसणे, वाईट गोष्टी व गाणीं ऐकणे किंवा वाचणे, आळसाने चेष्टा करणे व मिथ्यात्व, राग, द्वेष, गर्व, व

---

१ **क्षेत्रवास्तुहिरण्यसुवर्णधनधान्यदासीकुप्यप्रमाणाति-क्रमाः ।** —( त. अ. ७. सू. २९ )

कामविकार इत्यादिक कृत्यें करण्याविषयीं जेणेंकरून प्रवृत्ति होईल अशी शास्त्रें अगर गोष्टी ऐकणे असें हें अनर्थदडव्रताचे भेद आहेत. याचा त्याग करणे यास अनर्थदडव्रत ह्मणतात. मी जे केल्याने काहीं मनोरथ सिद्ध न होता पापाचा आरभ होऊन दण्डास पात्र होईन असे काम करणार नाहीं यासहि अनर्थदडव्रत ह्मणतात.

तिसरे **भोगोपभोगपरिमाण** गुणव्रत आहे. पचेंद्रिय विषयाच्या ठिकाणी आसक्ति कमी व्हावी ह्मणून जो परिग्रह कमी केला असेल त्यातहि पचेद्रियांचे विषय कमी करणें त्याला **भोगोपभोग परिमाणव्रत** ह्मणतात. ज्या वस्तु एकदाच भोगता येतात ते भोग पदार्थ होत. अन्न, पुष्प, गध इत्यादि पदार्थास भोग ह्मणतात. आणि जे पुनःपुन भोगता येतात ते उपभोगाचे पदार्थ होत स्त्री, वस्त्र, घर, दागिने, वाहन इत्यादि पदार्थास उपभोग ह्मणतात. ह्याचे पांच भेद आहेत. १ विषयरूपी विषाचा आदर असणे. २ पूर्वी भोगिलेल्या विषयाची आठवण करणे. ३ विषय भोगतांना अत्यत आसक्त होणें. ४ विषयभोगाविषयीं अतिशय तृष्णा ठेवणे. ५ विषय भोगीत नसल्यामुळे ते भोगीत आहे असे मनात आणणें. हें पाच अतिचार टाळल्याने तिसरे गुणव्रत निर्दोष पाळले जाते. अशी तीन गुणव्रतें आहेत. ह्याना गुणव्रते असे ह्मणण्याचे कारण ही अणुव्रताला वाढवून महाव्रतापर्यंत नेणारी आहेत. आता चार शिक्षाव्रते सांगितलीं आहेत ती अशीं:—

देशावकाशिक—अणुव्रतांत व गुणव्रतात यावज्जीवपर्यंत ज्या मर्यादा केल्या त्यातूनहि अलीकडे ह्मणजे देश, नदी, पर्वत वगैरेच्या मर्यादा करून त्यापलीकडे जाण्याचा त्याग करणे ह्मणजे हळुहळू महाव्रताकडे वळण्याची ओढ ठेवणे यास **देशव्रत** ह्मणतात.

## सामायिक[१] शिक्षाव्रत.

---

१ सम्=एकरूप होऊन, अयः=स्वरूपामध्ये गमन, समय, व समय हेच ज्याचे प्रयोजन आहे ते सामायिक. एकरूप होऊन स्वरूपामध्ये मिळून जाणे याला समय ह्मणतात. व समय हेच ज्याचे प्रयोजन आहे ते सामायिक होय.

**समता सर्वभूतेषु संयमः शुभभावना ।**
**आर्तरौद्रपरित्यागस्तद्धि सामायिकं मतम् ॥**

ह्मणजे प्राणीमात्रांच्या ठिकाणी समभाव ठेवणे, इंद्रिये स्वाधीन ठेवणे, शुभ भावना चिंतणे. आर्त व रौद्र ध्यान न करणे इत्यादि सर्व सामायिकाचें लक्षण होय. सकाळ, सध्याकाळ, व मध्यान्ह ह्या तीन काळीं अमुक वेळपर्यंत बसण्याची प्रतिज्ञा करून तितका वेळ एकात ठिकाणी, निरुपद्रव स्थळी एकाग्रतेने व प्रसन्नचित्ताने रागद्वेषादि विकार सोडून सर्वज्ञप्रभूच्या गुणांचे चिंतवन करणे, धर्मपुस्तक वाचणे, ध्यान करणे यास सामायिक ह्मणतात. सामायिकाकरितां १ योग्यक्षेत्र, २ योग्यकाल, ३ योग्यआसन, ४ योग्यविनय, ५ मनःशुद्धि, ६ वचनशुद्धि, व ७ कायशुद्धि या सात गोष्टींची अत्यत आवश्यकता आहे. कारण याच्याशिवाय मनुष्याचे परिणाम निर्मल अथवा निश्चल राहू शकत नाहीत. त्याप्रमाणेच आपल्या हातून जे काहीं दुष्कृत्य झालें असेल, अथवा आपण कोणाला वाईट शब्द बोलले असलो, अथवा वाईट गोष्टी मनात आणिल्या असल्या तर त्या सर्व गोष्टी तोंडानी उच्चारून त्याबद्दल पश्चाताप करावा ह्याला **प्रतिक्रमण** ह्मणतात. सर्वार्थसिद्धि ग्रथात प्रतिक्रमणाचे लक्षण ' **मिथ्यादुष्कृताभिधानादभिव्यक्तप्रतिक्रियम् प्रतिक्रमणम्** ' असें सांगितलें आहे. **प्रतिक्रमणाची** कल्पना फार उदात्त पायावर रचलेली आहे. आपल्यामध्यें काही उपजतच दुर्गुण असतात आणि आपण जन्मल्यावर आपल्या अज्ञानामुळे किंवा दुर्बलतेमुळे काही दुष्कृत्ये आपल्या हातून होतात **ह्या संचित दुर्गुणांपासून आणि क्रियमाण दुष्कृत्यांपासून जर आपली खरी खरी सुटका व्हावयाची असेल तर हे दुर्गुण आणि तीं दुष्कृत्यें आपण होऊनच उघडकीस आणलीं पाहिजेत. यासाठींच कित्येक धर्मांमध्यें स्वकृत पापनिवेदनाची** ( Confession ) **आणि प्रायश्चिताची योजना असते आणि ही अवश्य आहे. जैनधर्मांत ह्यालाच प्रतिक्र-**

**मण असें नांव दिलें आहे.** अशा रीतीने आपणच आपल्या दुर्गु-णाचा आणि दुष्कृत्यांचा पुकारा केल्यास दुसऱ्यांस तीं उघडकीस आणण्यास वावच उरणार नाहीं. आणि उभयपक्षी बरीच तळमळ निवारली जाईल. हा एक सामायिकाचाच प्रकार आहे. व वाईट गोष्टी आतां पुन. करणार नाहीं असे अत.करणपूर्वक ह्मणणें ह्याला **प्रत्याख्यान** ह्मणतात. हेहि सामायिकापैकींच आहे. सामायिकाने अतरगशुद्धि होते. प्रभूच्या गुणाचे स्तवन करणें, चौहीं दिशेला तीन वेळा नमस्कार करणे; आणि शरीरावरील ममत्व सोडणे, हे सामायिकाचे सहा विभाग आहेत. ह्याला षडावश्यक ह्मणतात. सामायिकाचे पाच[1] दोष आहेत. मन वचन काया ह्याची एकाग्रता नसणे, वचन वशीभूत न ठेवणे, सामायिकाविषयी अनादर ठेवणे, सामायिकाच्या क्रिया किंवा पाठ विस-रणें, व सामायिकाच्या वेळीं मन सकल्पविकल्परूप होऊ देणे. असें पाच अतिचार टाळल्याने निर्दोष सामायिकव्रत पाळले जाते.

तिसरें **प्रोषधोपवास** शिक्षाव्रत आहे. ते असे:— प्रत्येक अष्टमी चतुर्दशीच्या दिवशी चार प्रकारच्या आहाराचा त्याग करावा. त्या दिवशीं सारा वेळ एकातजागी धर्मशास्त्रे वाचण्यात व वैराग्य-चिंतनात घालवावा, हिसादि पच पातकाचा त्याग करावा; पापारभ करू नये. ह्या पर्वतिथींच्या आदले दिवशी दोनप्रहरानतर व दुसरे दिवशी दोनप्रहरपर्यत उपोषित राहणे, ह्मणजे सोळा प्रहरांचा उपवास करणे हा उत्कृष्ट **प्रोषधोपवास** होय. उपवासाबद्दल ह्मटले आहे:-

**कषायविषयाहारत्यागो यत्र विधीयते ।**
**उपवासः स विज्ञेयः शेषं लंघनकं विदुः ॥**

**अर्थः**—कषाय ( क्रोध, मान, माया व लोभ ), विषय, व आहार याचा त्याग करणे यालाच उपवास ह्मणावे. नुसत्या अन्न-त्यागाला **उपवास** हे नांव नसून **लंघन** अशी सज्ञा आहे. उपवास या शब्दावरूनहि हाच अर्थ दिसतो की, उप ह्मणजे जवळ व

---

१ **योगदुःप्रणिधानानादरस्मृत्यनुपस्थानानि ॥ —(त. सू. ३३ अ. ७).**

वास ह्मणजे राहणें अर्थात् आत्म्याच्या ठिकाणीं जें राहणे किंवा आत्म-चिंतन करणे याचे नाव **उपवास** आहे.

चवथें शिक्षाव्रत **दान** किंवा **वैयावृत्य** होय. 'दाना' बद्दल रयणसारग्रथांत कुंदकुंदाचार्य ह्मणतात:—

**सप्पुरिसाणं दाणं कप्पतरूण फलाण सोहं वा ।**
**लोहीणं दाणं जइ विमाण सोहा सव्वस जाणेह ॥**

**संस्कृतछायाः–सत्पुरुषां दानं कल्पतरूणां फलानि शोभा वा ।**
**लोभीनां दानं यथा विमानशोभा शवस्य जानीहि ॥**

**अर्थः**—सत्पुरुषांनी केलेले दान कल्पवृक्षासमान आहे. त्याने शोभा ( कीर्ति ) होते, व मनोवांछित फळहि प्राप्त होते. परंतु, या उलट लोभी माणसानें दिलेलें दान 'महाडासारखें' ( प्रेता-करितां 'महाड' बांधण्याची चाल आमच्या वीरशैवबंधूत आहे ) आहे. कारण त्या 'महाडा' मुळे कीर्ति होते. परंतु त्या घरधन्याला मात्र छाती कुटीत बसावे लागते. अर्थात् लोभी पुरुषानें दिलेल्या दानामुळे त्याची वाहवा होते. परंतु त्या दानाची फलप्राप्ति त्याला काहीं होत नाहीं. लोभी द्रव्य गेल्यामुळे झुरणीस मात्र लागतो. दानाला **अतिथिसंविभागहि** ह्मणतात. **विधिद्रव्यदातृपातृविशेषात्तद्विशेषः ।** ह्मणजे विधि, दाता, द्रव्य व पात्र, ही जर उत्तम (विशेष) असलीं तर दानहि विशेष प्रकारचेच होते. योग्य पात्राला आहारदान, औष-धदान, अभयदान, आणि ज्ञानदान ह्यापैकीं ज्याला ज्याची जरूरी असेल तें देणे ह्याला दान ह्मणतात. संयमी मुनीच्या गुणावर प्रीति ठेवून त्यांच्या विपत्ति नाहींशा करणे, त्याचे हातपाय रगडणे वगैरे आणखी मुनीवर जितकी उपकार करण्याचीं कृत्ये असतील त्या सर्वास वैयावृत्त्य ह्मणावे. ज्याला दान द्यावयाचे त्यापासून प्रतिदान किंवा प्रत्युपकार मिळण्याची इच्छा नसावी.

अशीं हीं बारा व्रतें श्रावकाचीं सांगितलीं आहेत. तीं निर्दो-षपणे, तीन शल्यरहित व्रती श्रावकानें पाळलीं पाहिजेत. 'निःशल्यो

व्रती ' असें ह्मटले आहे. तीन शल्यें ह्मणजे मायाशल्य, मिथ्यात्व-शल्य, व निदानशल्य. चारित्रमोह कर्माच्या उदयानें परकलत्रादिवांछारूपरागविकार आणि परबधछेदादिरूपद्वेषविकार हे प्राप्त झाले असतांना ते नाहींसे करून आपली निंदा करून घेऊन तत्क्षणी आत्मभावना करण्यास प्रवृत्त होऊन समरसभावरूपी निर्मलजलानें ते दुर्विकार धुऊन टाकून शुद्ध होण्याच्या उद्योगास न लागता, आपल्या मनाचे हे दुर्विकार कोणास कळूं नयेत ह्मणून सन्यासवृत्तीचे ढोंग करून आतून बकवृत्ति ठेवून लोकांस फसविणें हे '**मायाशल्य**' होय. मनांत अयथार्थ श्रद्धान करणे हे '**मिथ्यात्व**' **शल्य** होय. तपश्चर्या करून त्याचे फळ कोणत्या तरी ससारसबधी विषयभोगाची इच्छा करणे हे निदानशल्य होय. थोडक्यात, सोप्या भाषेत सांगावयाचें ह्मणजे मनात कपट टोचणे हे मायाशल्य. मिथ्यात्वशल्याचे लक्षण वर सागितलेच आहे. आणि ह्या कृतींनी मला अमुक फळ मिळाले पाहिजे असे मनात टोचणें हे निदानशल्य. अशी तीन शल्ये जो सोडतो तो व्रतीश्रावक ह्मणावा.

व्रतीश्रावकाने मरणसमयीं **अंतसल्लेखना** करावी. सल्लेखनाधर्म गृहस्थ व मुनी या दोघांकरिता आहे. मी समाधिमरणाकरिता यथाशक्ति प्रयत्न करीन. आपण वाचत नाहीं, आपणाला मृत्यु खचीत येणार अशी खात्री झाली ह्मणजे सल्लेखना धारण करणाऱ्यानें शुद्ध मनानें इष्टमित्रावरील मोह सोडावा. कोणाविषयी मनात वैर असल्यास तेहि सोडावे, ससारातील सुखाचे ममत्व सोडावे, परिग्रहाचा त्याग करावा, आपल्या आणि परकीय माणसाच्या अपराधाची क्षमा करावी. व गोड भाषणानी आपण त्यांजपासून क्षमा मागावी. राग व द्वेष सोडून देऊन भय, शोक, स्नेह, खेद हेहि सोडून द्यावेत. आणि धैर्य प्रकट करून ज्ञानरूपी अमृताचे पान करून आपले मन प्रसन्न ठेवावे. क्रमाक्रमाने आहार कमी करून दूध पिऊन रहावें. व शेवटी उपवास करून व पंचनमस्कारांमध्ये लक्ष्य देऊन व्रत, सयम, चारित्र, ध्यान

ह्यांविषयीं सावधान राहून देहत्याग करावा. क्रोध, मान, माया, लोभ हे चार कषाय; आर्तध्यान व रौद्रध्यान; स्पर्शरसगंध वगैरे विषयभोग, हिंसादि पांच महापातके वगैरे सर्व पापास्रवाची कारणे टाकून देऊन त्यानें परिमित वस्त्रपरिग्रह धारण करून आणि खाद्य, पेय, लेह्य, चोष्य या चार प्रकारच्या आहारांचा त्याग करून गुरूपुढे आपले दोष मोठ्याने उच्चारून मनाने, वाचेने, व कायेने सल्लेखना करावी. सल्लेखना व समाधिमरण या दोन्हींचा अर्थ एकच आहे. आणि ह्मणू-नच बारा व्रते सांगितल्यानंतर सल्लेखनेचें निरूपण केले आहे. **सर्वार्थसिद्धि** ग्रथांत सल्लेखनेचे लक्षण असे सांगितलें आहे:—

**सम्यक्काय कषायलेखना सल्लेखना । कायस्य बाह्यस्याभ्यंतराणां च कषायाणां तत्कारण हापनया क्रमेण सम्यग्लेखना सल्लेखना ।**

ह्मणजे सम्यग्दर्शनाकरिता शरीर आणि क्रोधादि कषाय क्रमानें कृश करीत करीत धर्मध्यानात सावधान चित्त ठेवून प्राणत्याग करणे हिला सल्लेखना ह्मणतात. हेहि गृहस्थी श्रावकाला अंतसमयीं परमोपकार करणारे शुभगतीला कारण असे सर्वोत्तम व्रत आहे ह्मणून अतीशय प्रीतीने ह्याला धारण करावे. सल्लेखनेचे लक्षण समंतभद्राचार्यांनीं आपल्या रत्नकरंड श्रावकाचारामध्ये असे सांगितलें आहे:—

**उपसर्गे दुर्भिक्षे जरसि रुजायां च निःप्रतीकारे ।**
**धर्माय तनुविमोचनमाहुः सल्लेखनामार्याः ॥**

ह्मणजे उपसर्ग, दुष्काळ. म्हातारपण आणि रोग हे मिटण्यासारखे नसतील अशा प्रसंगीं रत्नत्रय धर्माला साधण्यासाठीं शरीराचा त्याग करणे यास गणधरदेव सल्लेखना ह्मणतात. ह्या सल्लेखनाव्रताचे पांच[१] दोष आहेत. १ मरण येऊ नये अशी इच्छा ठेवणे, २ मरण यावे असे इच्छिणे, ३ दुःखाला आणि मरणाला भिणे, ४ इष्टमित्र

---

१ **जीवितमरणाशंसामित्रानुरागसुखानुबन्धनिदानानि ।**
—( त. अ. ७. सू. ३७. )

व आप्तवर्ग यांची आठवण करणें. ५ आणि आपल्या कृतीबद्दल पुढे अमुक फळ मिळावे अशी इच्छा ठेवणे. हें पाच अतिचार टाळल्याने सल्लेखनाव्रत निर्दोष घडते. साराश जो शुद्ध ह्मणजे अतिचाररहित पाच अणुव्रते, तीन गुणव्रते व चार शिक्षाव्रतें धारण करितो, व माया, मिथ्यात्व व निदान अशी तीन शल्ये सोडतो, व मरणसमयीं अतसल्लेखना करतो तो व्रतिक प्रतिमेचा श्रावक जाणावा. ह्मणून ह्या प्रतिमेला **व्रतप्रतिमा** ह्मणतात.

## ३ सामायिकप्रतिमा.

आता तिसरी **सामायिक** प्रतिमा सागतो. शिक्षाव्रतामध्ये जे सामायिक सांगितले ते ( प्रभात, माध्यान्ह, व सायकाल ) त्रिकाळीं बाह्याभ्यतर परिग्रह सोडून अतिचाररहित करणे हीच सामायिक प्रतिमा होय. आर्तध्यान व रौद्रध्यान सोडून मनाची समता ठेवणें, त्रिकाल जिनेश्वरास वदना करणे, त्रिकाली दोन्ही हात जोडून तीन तीन वेळा चार **नमस्कार** चारी दिशेला करणे, याचे नाव सामायिक होय.

## ४ प्रोषधोपवासप्रतिमा.

ह्या प्रतिमेमध्ये श्रावक असा नियम घेतो की मी प्रत्येक अष्टमी व चतुर्दशी अशा पर्व तिथीच्या दिवशी सोळा प्रहरपर्यंत शक्तीप्रमाणें उपवास करीन, ब्रम्हचर्यव्रत घेईन, व शुभध्यानामध्यें तत्पर राहीन. ह्याला चवथी प्रोषधोपवासप्रतिमा ह्मणतात.

## ५ सचित्तत्यागप्रतिमा.

सस्कृतमध्ये 'चित्त' शब्दाचा अर्थ जीव असा होतो. ह्मणून जो पदार्थ जीवसहित असतो त्यास 'सचित्त' व जो जीवरहित असतो त्यास 'अचित्त' असे ह्मणतात. सचित्ताचा पर्यायवाची शब्द 'अप्रासुक' व 'अचित्त' शब्दाचा पर्यायवाची शब्द 'प्रासुक' असा आहे. पाचवा सचित्तत्यागप्रतिमाधारी श्रावक हरित अर्थात् सचित्त कदमूळादि पदार्थ खात नाहीं; अचित्त पदार्थ खातो. अर्थात् मूळ, फळ, भाजी डाहाळी, बीं ही न पिकलेली अथवा न शिजविलेली खात नाहीं.

'सचित्त' पदार्थ 'अचित्त' कसे होतात, अर्थात् कोणती अवस्था प्राप्त झाली असता 'सचित्त' पदार्थांना अचित्त ह्मणता येते याबद्दल **स्वामी कार्तिकेयानुप्रेक्षा**ग्रंथाच्या संस्कृत टीकेमध्ये **श्रीशुभचंद्राचार्य** ह्मणतात.

**सुक्कं पक्कं तत्तं अंबिललवणेहिं मिस्सियं दव्वं।**
**जं जंतेण य छिण्णं तं सव्वं फासुयं भणियम्॥**

**अर्थः**-जे पदार्थ वाळलेले असतात, पिकलेले असतात, शिजविलेले असतात, अथवा ज्या पदार्थांचे आंबट अथवा खारट पदार्थांशी मिश्रण झाले असते, तसेच जे पदार्थ यंत्राने छिन्नभिन्न केलेले असतात ते सर्व पदार्थ प्रासुक अथवा जीवरहित होतात. ह्मणून ह्या प्रतिमेचा श्रावक अशा प्रकारे, पदार्थांना प्रासुक अवस्था प्राप्त झाली ह्मणजे खाऊ शकतो. ह्याला फक्त प्रासुकजल पिता येते.

### ६ रात्रिभोजनत्यागप्रतिमा.

सहाव्या प्रतिमेचा श्रावक सूर्यास्त झाल्यापासून तो सूर्योदय होईपर्यंत (रात्री) चार प्रकारच्या आहाराचा त्याग करण्याचा नियम घेतो. अथवा स्वस्त्रीशींहि दिवसा संभोग करणार नाही असा नियम घेतो. ह्याला दिनमैथुनत्यागप्रतिमाहि म्हणतात.

### ७ ब्रह्मचर्यप्रतिमा.

हा देह मलमूत्र, रक्तमांस वगैरे वाईट पदार्थांचा पिंड असून कृमिजीवांनी भरलेला आहे, याच्या सातहि द्वारातून नित्य दुर्गंध वाहतो हे मनांत आणून स्वस्त्रीशी देखील संभोग करण्याचा त्याग करणे, कामविकारास वश न होणे ह्याला ब्रह्मचर्यप्रतिमा ह्मणतात.

### ८ आरंभत्यागप्रतिमा.

व्यापार, हिंसेचे कारण शेतकी व नोकरी इत्यादि संसार आरंभाचा त्याग करणे हिला आरंभत्यागप्रतिमा म्हणतात.

### ९ परिग्रहत्यागप्रतिमा.

नवव्या प्रतिमेचा श्रावक वस्त्र तेवढे ठेवून बाकीच्या दहा प्रकारच्या धनधान्यादि बाह्य परिग्रहांचा व चौदा प्रकारच्या अंतरंग परिग्र-

हांचा त्याग करितो. अंतरंग परिग्रह चौदा आहेत.– १ **मिथ्यात्व, २ वेद (स्त्री, पुरुष, नपुंसक), ३ राग, ४ द्वेष, ५ हास्य, ६ रति, ७ अरति, ८ शोक, ९ भय, १० जुगुप्सा, ११ क्रोध, १२ मान, १३ माया, १४ लोभ**. दहा प्रकारचे बाह्य परिग्रह – **१ क्षेत्र, २ वास्तु, ३ हिरण्य, ४ सुवर्ण, ५ धन, ६ धान्य, ७ दासी, ८ दास, ९ कुप्य, १० भाण्ड.** अशा चोवीस प्रकारच्या परिग्रहांचा त्याग करणे ह्याला परिग्रहत्यागप्रतिमा म्हणतात.

### १० अनुमतित्यागप्रतिमा.

'मी आरंभ म्हणजे शेतकी व्यापारादिक, परिग्रह म्हणजे धन-धान्यादिक आणि लग्नकार्य इत्यादि कृत्यात आपले मन घालणार नाही तसेच कोणी विचारले तरी धर्मोपदेशावाचून दुसरी कोणतीच गोष्ट सांगणार नाही अथवा त्याला अनुमतिहि देणार नाहीं.' असा नियम करणे ह्याला दहावी अनुमतित्यागप्रतिमा म्हणतात.

### ११ उद्दिष्टविरतिप्रतिमा.

**अमितगति** आचार्यांनीं आपल्या श्रावकाचारामध्ये अकराव्या प्रतिमाधारी श्रावकाचे लक्षण असे सांगितले आहे:—

**कामासूयामायामत्सरपैशून्यदैन्यमदहीनः ।**
**धीरः प्रसन्नचित्तः प्रियंवदो वत्सलः कुशलः ॥९॥**
**हेयादेयपटिष्ठो गुरुचरणाराधनोद्यतमनीषः ।**
**जिनवचनतोयधौतस्वान्तकलंको भवविभीरुः ॥१०॥**
**सम्यक्त्वरत्नभूषो मन्दीकृतसकलविषयकृतगृद्धिः ।**
**एकादशगुणवर्ती निगद्यते श्रावकः परमः ॥११॥**

**अर्थः**–काम, असूया (दुसऱ्याच्या गुणाला दोष मानणे), माया (कपट), द्वेष, चहाडी, दैन्य व उरमटपणा हे दोष ज्याच्यामध्ये नाहीत, व धीर असून प्रसन्नमनाचा, प्रिय (मधुर) भाषण करणारा, दुसऱ्यावर वात्सल्य करणारा आणि शहाणा असा आहे, ग्राह्य काय व त्याज्य काय ह्याचे ज्याला उत्तम ज्ञान आहे, गुरुचरणाची सेवा कर-

ण्याविषयीं ज्याला इच्छा उत्पन्न झाली आहे, जिनवचनरूपी जलानें ज्याने आपल्या मनाचा मल धुऊन टाकिला आहे, जो ससारभीरु आहे, व सम्यक्त्वरत्नाने विभूषित असून ज्यानें सर्व विषयांचा उपभोग कमी केलेला आहे, असा अकराव्या प्रतिमेचे धारण करणारा जो श्रावक तो उत्तम श्रावक होय असे सागितले आहे. जो घर सोडून मुनि राहतात अशा वनात जाऊन गुरूजवळ महाव्रते घेतो, भिक्षेने आहार घेऊन तपश्चरणांत निमग्न असतो, आणि फक्त लगोटी व अपुरते वस्त्र ठेवितो तो उत्कृष्ट अकरावी प्रतिमाधारी श्रावक होय. अकराव्या प्रतिमेचा श्रावक प्राय: साधुसमान होतो. ह्याचे दोन भेद आहेत. वस्त्रधारी उत्कृष्ट श्रावकास क्षुल्लक श्रावक ह्मणावे, व कौपीन (लंगोटी) धारी जो असतो त्याला ऐलक श्रावक ह्मणावे. क्षुल्लक श्रावक केवळ लगोटी, चादर व कमडलु एवढाच परिग्रह ठेवतो. व एखाद्या मडपामध्ये, मठामध्यें, किंवा मदिरामध्ये वास करितो. उद्दिष्ट पिड ह्मणजे त्याच्याकरिता म्हणून मुद्दाम तयार केलेला आहार, तसेच अयोग्य व सचित्त आहार तो घेत नाहीं. क्षुल्लकाला आपले दाढी, मिशा, मस्तक वगैरेचे केश कात्रीने किंवा शस्त्राने काढण्यास मोकळीक आहे. अर्थात्, ऐलकाने लोच (केश उपटणे) केला पाहिजे. ऐलक हा नियमाने केशलुंचन करितो, पिंछी धरितो व धातूच्या वगैरे पात्रात न जेवता आपल्या हातात दाता जे अन्न देईल ते जेवतो. क्षुल्लक हा बसून भिक्षापात्रातले अन्न आपल्या हातानें घेऊन जेवतो. ऐलक श्रावक प्राय' जगलांमध्यें साधूबरोबर राहतात. व तेथे तपश्चरण करितात व लगोटी असलेल्या साधूच्या हातानें निर्दोष असा आहार ग्रहण करितात. या प्रतिमेला उद्दिष्टत्यागप्रतिमा म्हणतात. ह्याप्रमाणे श्रावकाच्या अकरा प्रतिमा सागितल्या आहेत. वरच्या प्रतिमेमध्ये असणाऱ्याने खालच्या सर्व प्रतिमात सांगितलले गुण पाळलेच पाहिजेत व क्रमानें चढत गेले पाहिजे. पहिल्यापासून सहा प्रतिमांचे जघन्य श्रावक होत. सात, आठ आणि नऊ या तीन प्रतिमांचे मध्यम; आणि दहा व अकरा या दोन

प्रतिमांचे उत्कृष्ट श्रावक होत. ह्या सर्व अकरा प्रतिमा पांचव्या देश-विरत नांवाच्या गुणस्थानात मोडतात. येथपर्यंत एकादशप्रतिमावर्णन झाले. आता दशलाक्षणिकधर्म थोडक्यांत सांगतों.

### दशलक्षणीधर्म.

आता वर्णन केलेल्या श्रावकाच्या चारित्राच्या अकरा प्रतिमांशिवाय प्रत्येक गृहस्थी जैनाने यथाशक्ति दशलक्षणी धर्म पाळला पाहिजे अशी शास्त्राज्ञा आहे.

**उत्तमक्षमामार्दवार्जवशौचसत्यसंयमतपस्त्यागा-**
**किंचन्यब्रह्मचर्याणि धर्मः ॥** (त. अ. ९. सू. ६).

१ उत्तम क्षमा, २ उत्तम मार्दव, ३ उत्तम आर्जव, ४ उत्तम सत्य, ५ उत्तम शौच, ६ उत्तम सयम, ७ उत्तम तप, ८ उत्तम त्याग, ९ उत्तम आकिंचन्य, १० उत्तम ब्रह्मचर्य, असा दशलक्षणरूपी धर्म आहे. आता ‘ उत्तम क्षमा ’ धर्माचे वर्णन करितो.

### १ उत्तम क्षमा.

**नरस्यऽऽभरणं रूपं रूपस्याऽऽभरणं गुणः ।**
**गुणस्यऽऽभरणं ज्ञानं, ज्ञानस्यऽऽभरणं क्षमा ॥**

क्रोधरूपी वैऱ्यास जिकणे, आपल्यापेक्षा कमी दर्जाच्या माणसाने जरी आपले नुकसान अथवा अपमान केला तरी तो शातपणे सहन करणे व त्यावर न रागावणें ह्यास उत्तम क्षमा ह्मणतात. उत्तम क्षमा रत्नत्रयाला धारण करणारी आहे.

### २ उत्तम मार्दव.

**जात्यादिमदावेशादभिमानाभावो माननिर्हरणं मार्दवम् ॥**

उत्तम कुल, जाति, रूप, ज्ञान, ऐश्वर्य, इत्यादि प्राप्त झाले असताहि गर्व न करणे अथवा दुसऱ्यानी आपला तिरस्कार केला असतां देखील त्याबद्दल अभिमान उत्पन्न न होऊ देणे, नम्रता धरणे यास उत्तम मार्दव ह्मणतात.

## ३ उत्तम आर्जव.

**योगस्यावक्रता आर्जवम् ॥ ( सर्वार्थसिद्धि )**

मन, वचन कायेची कुटिलता नाहीशी करून सरळ परिणाम ठेवणें यास उत्तम आर्जवधर्म ह्मणतात. अथवा कपटरहित वर्तन ठेवणे, दांभिकता न ठेवणे यासहि आर्जव ह्मणतात. आर्जवधर्माचे जे उपासक ते मित्रद्रोही, धर्मद्रोही, स्वामिद्रोही व देशद्रोही असणे शक्य नाही. त्याच्या अंतःकरणामध्ये परनिंदा किंवा आत्मप्रशंसा ( Back-biting and self praise ) यांना अवसर मिळत नाही. सम्यग्दर्शनज्ञानचारित्र ही आर्जवधर्मानेच प्राप्त होतात. ह्मणून इहलोकीं शत्रु वगैरेपासून रक्षण करणाऱ्या व संसारसमुद्रातून पैलतीरी नेणाऱ्या आर्जवधर्माचे साधन करा.

## ४ उत्तम सत्य.

**सत्सुप्रशस्तेषु जनेषु साधु वचनं सत्यमित्युच्यते**
**-( सर्वार्थसिद्धि )**

समस्त प्राणीमात्राशी हितमित मुंदर खरे वचन बोलणे यास उत्तम सत्य ह्मणतात. जेव्हा जेव्हा लोभामुळे किंवा क्रोधामुळें अमुक प्रकारची वाईट किंवा असत्य गोष्ट करावयास आह्मी सिद्ध होतों, आणि विवेक तर असे ह्मणतो की. असे करू नको. आणि मनाचे आवरण करणे मोठें दुर्घट होऊन जाते तेव्हा तेव्हा जर दृढ निग्रह करून विवेकाप्रमाणें वागून असत्य गोष्टीचा त्याग केला तर आपल्या इच्छेचे पक्षपाती न होतां **सत्याचे** पक्षपाती होऊ, लोभाचे व क्रोधाचे दास न होता अरहंताचे दास होऊ. व '**सर्वं सत्ये प्रतिष्ठितं**' आणि '**सच्चेण जिसोहई मनुजन्म**' ह्या ह्मणण्याची सार्थकता होईल.

## ५ उत्तम शौचधर्म.

**प्रकर्षप्राप्तलोभान्निवृत्तिः शौचम् ॥ ( सर्वार्थसिद्धि )**

लोभ नसणे ह्याचें नाव शौच. शौच ह्मणजे पवित्रपणा असाहि अर्थ आहे. दुसऱ्याचे धन, स्त्री, इत्यादिक हरण करण्याची इच्छा न

करणे यास उत्तम शौचधर्म ह्मणतात. मनाला मायाचारापासून आणि लोभादिकापासून रहित करणे तसेच वैराग्यभावनेनें अंत:करण शुद्ध ठेवणें यांसहि शौचधर्म ह्मणतात. शौचधर्म हा आत्म्यास उज्वल केल्यानेंच होतो. तसेंच स्नान करून आपले शरीर निर्मल व पवित्र राखणे, ब्रह्मचर्य धारण करणे हा शौचधर्म होय.

## ६ उत्तम संयम.

**धर्मोपबृंहणार्थं समितिषु प्रवर्तमानस्य प्राणेंद्रिय परिहारस्संयमः ॥** —( **सर्वार्थसिद्धि** )

पाच इंद्रियें व मन यास ताब्यात ठेवणे, सहा प्रकारच्या जीवांचे रक्षण करणे, व पाच अणुव्रते, पाच समिति, व तीन गुप्ती पाळणे यांस संयमधर्म ह्मणतात. संयमधर्म दोन प्रकारचा आहे. एक प्राणसंयम व दुसरा इंद्रियसंयम. ईर्यासमिति इत्यादि क्रिया करणाऱ्या मुनींनीं जीवरक्षणार्थ एकेंद्रियादि प्राण्यांना पीडा करण्याचा त्याग करणे यास **प्राणसंयम** ह्मणतात. व शब्द, रूप, रस, गंध आणि स्पर्श याच्या विषयांचे ठिकाणीं प्रीति उत्पन्न न होणे यास **इंद्रियसंयम** ह्मणतात.

## ७ उत्तम तप.

**कर्मक्षयार्थं तप्यत इति तपः ॥** ( **सर्वार्थसिद्धि** )

कर्मांचा क्षय करण्याकरितां अनशनादि तप करणे, अथवा इच्छेचा निरोध करणे यास उत्तम तप ह्मणतात. विषयकषाय जिकण्याकरितां देह कृश करणे व ध्यानाध्ययन करणे याचे नाव तप. श्री पद्मनंदि स्वामींनी असे ह्मटले आहे–**'कर्ममलविलयहेतो बोधदृशा तप्यते तपः प्रोक्तम्'** कर्मरूपी मळाचा नाश व्हावा ह्मणून **ज्ञानदृष्टीनें** जे तप करणे तेंच तप होय. तप हे चारी आराधनामध्यें प्रधान आहे. हीं तपे बारा आहेत. आत्मा ह्या बारा तपाच्या प्रभावाने कर्ममलरहित होऊन शुद्ध होतो.

## ८ उत्तम त्याग.

**संयतस्य योग्यं ज्ञानादिदानं त्यागः ।** ( **सर्वार्थसिद्धि** )

दुष्ट विचारास फांटा देऊन, धनधान्यादिक संपत्तीवरील मोह सोडून चार प्रकारचें दान देणें यास त्यागधर्म ह्मणतात. संयमी मुनीला योग्य असे ज्ञान वगैरे दान देणे त्याचें नांव त्याग आहे. धनसंपदादिक परिग्रह हे कर्मोदयानें प्राप्त होतात असे जाणून व ते पराधीन, मानकषाय उत्पन्न करणारे, तृष्णेला वाढविणारे, रागद्वेषादि दुष्ट मनोविकार तीव्र करणारे आहेत असे जाणून सोडून देणें यांस उत्तम त्याग ह्मणतात.

### ९ उत्तम आकिंचन्य.

**उपात्तेष्वपि शरीरादिषुसंस्कारापोहाय ममेदमित्यभिसंधिनिवृत्तिराकिंचन्यम् । नास्ति किंचनास्याकिंचनः तस्यभावः कर्म वा आकिंचन्यम् ॥** —( **सर्वार्थसिद्धि** )

चेतन अचेतनरूपी परिग्रहांचा त्याग करणे यास उत्तम आकिंचन्य ह्मणतात. आपल्या ज्ञानदर्शनमयस्वरूपाशिवाय अन्य किंचित्मात्रहि माझे नाहीं, मीहि कोणत्या अन्य द्रव्याचा नाही, माझे कोणतेंहि अन्य द्रव्य नाही अशा अनुभवास ( आत्मज्ञानास ) आकिंचन्य ह्मणतात.

### १० उत्तम ब्रह्मचर्य.

**अनुभूतांगनास्मरणकथाश्रवणस्त्रीसंसक्तशयनासनादिवर्जनाद्ब्रह्मचर्यं परिपूर्णमवतिष्ठते । स्वतंत्रवृत्तिनिवृत्यर्थो वा गुरुकुलावासो ब्रह्मचर्यम् ॥** —( **सर्वार्थसिद्धि** )

स्वस्त्रीचा व परस्त्रीचा त्याग करणे, व समस्त विषयांवरील अनुराग सोडून देऊन, ब्रह्म ह्मणजे ज्ञायकस्वभाव आत्मा, त्याची जी चर्या ह्मणजे प्रवर्ती—अर्थात् आत्म्याच्या ठायीं रममाण होण्याची इच्छा करणें यास उत्तम ब्रह्मचर्य ह्मणतात. अथवा स्वेच्छाचार घडूं नये ह्मणून गुरूजवळच वास करणे यालाहि ब्रह्मचर्य ह्मणतात.

असे हे दशलक्षणिक धर्माचे संक्षेपतः वर्णन केलें. ह्या धर्माला **उत्तम** हें विशेषण का दिले आहे याचे कारण सर्वार्थसिद्धि ग्रंथात असें सांगितले आहे. **'दृष्टप्रयोजनपरिवर्जनार्थमुत्तमविशेषणम् ।'**

ह्मणजे हे धर्म धारण केल्यापासून आपली प्रतिष्ठा, ख्याति, लाभ, पूजा व्हावी ह्या हेतूनें नव्हे तर यापासून लाभ, पूजा, सन्मान कशाचींहि इच्छा न करितां फक्त आत्मकल्याणाकरितां धारण करावें ह्या हेतूनें उत्तम हें विशेषण आहे.

## द्वादश अनुप्रेक्षा.

प्रत्येक जैनानें खाली दिलेल्या बारा विषयांचें वरचेवर चिंतवन करावें. ह्याला बारा अनुप्रेक्षा अथवा भावना असे ह्मणतात.

### १ अनित्यानुप्रेक्षा.

इंद्रियें, विषय, धन, यौवन, जीवितव्य, स्त्री पुत्र वगैरे सर्व पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें अस्थिर, विद्युल्लतेप्रमाणे चंचल व इंद्रधनुष्याप्रमाणें क्षणभंगुर व नाशवंत आहेत, जगांत नित्य असे काहीं नाहीं, असे वारंवार चिंतवन करणे यास अनित्यानुप्रेक्षा ह्मणतात. अनित्यतेची भावना करणाऱ्या भव्य जीवाला शरीर, पुत्र, कलत्र, व भोगोपभोगाचे पदार्थ याविषयी प्रीति जडत नाही, आणि त्याचा वियोग झाला तरी दु:ख होत नाही. कारण तो स्वतःच्या शरीराला सुद्धा अनित्य मानून विरक्त असतो. शुद्ध, बुद्ध, ज्ञानरूपी, ज्योतिर्मय आत्माच तेवढा स्थिर आहे हें तो जाणतो.

### २ अशरणानुप्रेक्षा.

**सिंहस्यक्रमेपतितं सारङ्गं यथा न रक्षते कोऽपि ।**
**तथा मृत्युना च गृहीतं जीवमपि न रक्षते कोऽपि ॥२४॥**

—( श्री स्वामीकार्तिकेयानुप्रेक्षा )

**अर्थः**—ज्याप्रमाणे एखाद्या अरण्यात सिंहाच्या तांवडींत सांपडलेल्या हरणाला कोणीहि शरण नाहीं त्याचप्रमाणें ह्या जीवाला संसारिक दु:खांपासून सोडविण्यास अथवा मृत्युमुखांतून ओढून काढण्यास एक धर्मच कायतो समर्थ आहे त्याशिवाय कोणीहि समर्थ नाहीं, आपण जसे कर्म करू तसें फळ भोगू असे चिंतन करणे ह्याला अशरणानुभावना ह्मणतात.

### ३ संसारानुप्रेक्षा.

**कर्मविपाकवशादात्मनो भवान्तरावाप्तिः संसारः ।** ह्मणजे कर्माचा विपाक झाल्यामुळें अनेक प्रकारचे जन्ममरण करीत करीत परिभ्रमण करणे यास ससार ह्मणतात. हा जीव ह्या ससारांत कर्माच्या योगाने एखाद्या नाटक्याप्रमाणे अनेक वेष धारण करून अनतकालांपासून फिरत आहे, ह्याने अनत वेळां जन्ममरण केलें, अनेक वेळा नरकात जन्म घेतला, अनेकवेळा स्वर्गात जन्म घेतला, अनेकवेळा पशुयोनींत जन्मला, अनेक वेळा मनुष्य झाला, परतु जन्ममरणाच्या दुःखातून पार पडला नाही वगैरे चितन करणे यास ससारानुप्रेक्षा ह्मणतात. साराश ससारात कोठेंहि सुख नाही, ससार असार आहे, चारी गतींमध्ये अतिशय दुःख व यातना सहन कराव्या लागतात, व यातून मुक्त होण्याकरितां झटले पाहिजे असे चितन करणें यास **संसारभावना** ह्मणतात. ह्या ससारानुप्रेक्षेच्या भावनेने ससाराचा तिटकारा येतो: ह्मणजे वैराग्य प्राप्त होते, त्यायोगाने ते दुःख चुकविण्याकरितां मोक्षमार्गामध्यें श्रद्धा बळकट होते.

### ४ एकत्वानुप्रेक्षा.

माझ्या कर्माप्रमाणे सुखदुःख भोगणारा मी एकटाच आहे, पुण्य व पाप कर्माची जी बरी वाईट फळे आहेत ती माझी मलाच भोगिली पाहिजेत, जिनधर्माशिवाय आपली स्त्रीपुत्र वगैरे कोणीहि सुखदुःखामध्ये सार्थीदार नाहीत, पुत्रदारादिक सर्व आपापल्या मतलबाचे आप्त आहेत असे चितन करणें, अर्थात् जन्मजरामरणरोगवियोगादि दुःखांमध्ये आपणाला असहाय एकाकीं असे चितन करणें, तसेच कुभाराच्या चक्रावर फिरत असणाऱ्या मोघ्याप्रमाणे चतुर्गतिरूप ससारचक्रात फिरणारा हा प्राणी एकटाच आहे असे चितणे याला एकत्वानुप्रेक्षा ह्मणतात.

### ५ अन्यत्वानुप्रेक्षा.

आम्यापासून शरीर हे वेगळें आहे. मोहाने मी त्याला माझें,

माझे असे ह्मणतो, तसेच स्त्री, पुत्र धनादिक हेहि मजपासून वेगळे आहेत, या जगात दिसणाऱ्या सगळ्या जड वस्तु आपणाहून भिन्न आहेत असे चिंतवन करणे यास **अन्यत्वभावना** ह्मणतात.

### ६ अशुचित्वानुप्रेक्षा.

हें शरीर सप्त धातुमय अत्यंत दुर्गंधी आहे, हें रुधिर, मांस व वसा ह्यांनी व्याप्त आहे, व नवद्वारांमधून नेहमीं यांतून दुर्गंधमय असा मैला बाहेर येत असतो, ह्याला किती जरी स्नाने घातली व किती जरी कस्तुरी, चंदन, केशर ह्यांसारखे सुगंध पदार्थ चोळलें, व उटणी लाविली तरी ते कधीं पवित्र होणार नाही, उलट त्याच्या संसर्गाने सुगंधी पदार्थाचा सुगंध नाहीसा होतो इतके हे शरीर अशुचि आहे, याचा अभिमान तो काय धरावयाचा? असे चिंतवन करणे यास अशुचित्वानुप्रेक्षा ह्मणतात.

### ७ आस्रवानुप्रेक्षा.

मिथ्यात्व, अविरत, कषायापासून, व मनवचनकाय यांच्या चांचल्यामुळे कर्माचे आस्रव होतात. "**मनस्तनुवचःकर्मयोग इत्यभिधीयते स एव आस्रवः**" व हा आस्रव संसाराला कारण, दुःखाचे मूळ, व आत्मगुणाचा घातक आहे असे चिंतवन करणे. अर्थात् ज्याच्या योगाने नवीन कर्मे उत्पन्न न होतील असे विचार, उच्चार, व आचार यांचे चिंतन करणे यास आस्रवानुप्रेक्षा ह्मणतात. शुभयोगजन्यकर्माच्या आस्रवाला शुभास्रव, व अशुभयोगजन्यकर्माच्या आस्रवाला अशुभास्रव ह्मणतात. अशुभास्रवाच्या योगाने बंध होतो, व बंध संसाराचे मूळकारण आहे. ह्मणून मुमुक्षूंनी ह्यापासून विमुख असावे.

### ८ संवरानुप्रेक्षा.

हे जीवा, तू समिति व गुप्ति यांचे रक्षण करून अनुप्रेक्षांची भावना कर. आणि तप व संयम पाळून परिग्रहाचा जय कर! असें तू केलेंस ह्मणजेच आस्रवाचा निरोध (**संवर**) होईल. संवराच्या स्वरूपाचे चिंतवन करणे, ह्मणजे मला होत असलेले आस्रव कोणत्या

उपायांनीं रोकले जातील याचें चिंतन करणें, नव्या कर्मांनीं आत्मा बद्ध होऊ नये ह्मणून उपाय योजणे ही संवरानुप्रेक्षा होय. ज्या जीवानें पुण्य अथवा पाप केलें नाही, व आत्म्याचे चिंतवन करण्यामध्ये आपले मन घातलें त्यानेच येणाऱ्या कर्मांना रोकिलें; व संवराची प्राप्ति करून सुख मिळविले. ही आठवी संवरभावना होय. सवरानुप्रेक्षेच्या भावनेने नवीन कर्मे न येऊन क्रमाने मुक्ति होते. समिति हें ज्याचें मूळ आहे, सयम हे ज्याला स्कध आहेत, यम आणि प्रशम गुण ह्या ज्याला शाखा आहेत, दशधर्म ही ज्याचीं पुष्पें आहेत, शुद्ध चिद्रूपभाव हे ज्याचे फळ आहे असा हा सवररूपी वृक्ष आहे.

### ९ निर्जरानुप्रेक्षा.

गतकर्मांपासून मुक्तता मिळण्याचे उपाय योजणें, अर्थात् झालेले कर्मबध त्याची स्थिति पुरी होण्याच्या पूर्वीच कोणत्या तपश्चरणानें तुटतील, ह्मणजे कर्माची निर्जरा कोणत्या प्रकारानें होते याचें चिंतवन करणे ह्यास निर्जरानुप्रेक्षा ह्मणतात. सम्यक्त्व ग्रहण करणे, व्रतें पाळणे, कषाय सोडणे, तपश्चर्या करणें, परमात्म्याचें ध्यान करणें हीं व आणखी अशींच पुष्कळ कारणें निर्जरेची होत.

### १० लोकानुप्रेक्षा.

**अनादिनिधनः सोऽयं स्वयं सिद्धोऽप्यनश्वरः ।**
**अनिश्वरोऽपि जीवादि पदार्थैः संभृतोऽनिशम् ॥**

**—शुभचन्द्राचार्य ( ज्ञानार्णव ).**

हें जग अनादिनिधन आहे, स्वयसिद्ध आहे, अविनाशी आहे, याचा कोणी ईश्वर स्वामी नाही, हे जीवादि पदार्थांनीं निरतर भरलेलें आहे, व अन्यमति ह्या लोकाची अनेक प्रकारच्या रचनेसबधानें कल्पना करितात तें मिथ्या आहे. असे चितवन करणे यास लोकानुप्रेक्षा ह्मणतात.

**निःपादितः स केनापि नैव नैवोद्धृतस्तथा ।**
**न भग्नः किं त्वनाधारो गगने स स्वयं स्थितः ॥**

**—( शुभचन्द्राचार्यकृत ज्ञानार्णव. लोकानुप्रेक्षा. )**

हें जग कोणी निर्माण केलें नाहीं, अन्यधर्मी ब्रह्मदेवानें ही सृष्टि निर्माण केली असे जें ह्मणतात तें चुकीचे आहे, तसेंच हें जग कासवाच्या पाठीवर अथवा शेषाच्या पाठीवर आहे हें ह्मणणें खोटे आहे. हें कोणी उचलून धरलें नाहीं. हें निराधार आहे. तरी पण हें भग्न होणार नाहीं. आकाशामध्यें स्वयं राहिलें आहे.

**किनहू न करो न धरै को । षटद्रव्यमयी न हरै को ।**
**सो लोकमाहिं बिन समता । दुःख सहै जीव नित भ्रमता ॥**

—(**दौलतरामकृत छः ढाला.**)

हें जग अर्थात् हा लोक कोणी निर्माण केला नाहीं, किंवा ह्याला कोणी उचलून धरले नाहीं. हा लोक जीव, पुद्गल, धर्म, अधर्म, आकाश, काल अशा सहा द्रव्यानीं प्रत्येक ठिकाणीं भरलेला आहे. '**लोक्यन्ते जीवदयो यस्मिन् स लोकः**' अशी ' लोक ' शब्दाची व्याख्या जैनागमात केली आहे. कोणी ह्या जगाचा नाश करू शकत नाहीं. ह्मणजे याचा कोणी हर्ता नाही. ह्या जगाच्या चारी बाजूला तीन प्रकारचे वायु आहेत त्या तीन प्रकारच्या वायूनीं तें त्रैलोक्य वेढलेले आहे. ते त्रैलोक्य असख्यप्रदेशीं असून ते सर्व असंख्यप्रदेश जन्ममरणांची स्थाने आहेत. त्या त्रैलोक्यात असा एकहि प्रदेश नाहीं की ज्यांत हा जीव अनतवार जन्मून मरण पावला नाहीं ह्मणजे हा जीव समताभावाशिवाय अर्थात् वीतरागतेशिवाय त्रैलोक्यांत नित्य भ्रमण करीत आहे. हें त्रैलोक्य[१] एखाद्या मनुष्याने आपल्या कंबरेवर दोन्ही हात ठेवून उभे राहून दोन्ही पाय पसरले असतां जो आकार होतो त्या आकाराचे आहे. ह्मणून वर सागितलेल्या गोष्टींचा विचार करणें– हें जग कोणत्या द्रव्यांनी भरलेलें आहे, याचीं तत्वे काय आहेत, तसेच ह्यांत अधोलोक, मध्यलोक व ऊर्ध्वलोक असे विभाग आहेत, यांत किती जातींचे जीव राहतात, हे सादि आहे कीं अनादि

---

१ जैनधर्मांतील पुरुषाकार लोकाचें स्वरूप जाणण्याकरिता **त्रैलोकसार, जम्बूद्वीपप्रज्ञप्ति, सूर्यप्रज्ञप्ति, चन्द्रप्रज्ञप्ति** आदि मोठमोठाले ग्रंथ पहावेत.

आहे, वगैरे विषयांचे चिंतवन करणे–ह्यास 'लोकानुप्रेक्षा' ह्मणतात.

## ११ बोधिदुर्लभानुप्रेक्षा.

सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, सम्यक्चारित्र ह्या रत्नत्रयीला 'बोधि' ह्मणतात. याची प्राप्ति होणे फार दुर्लभ आहे. ह्या ससारांत मी अनतकाळ परिभ्रमण केले परतु मला आत्म्याची खरी ओळख कधीं झाली नाहीं, माझें हिताहित मला कळलें असते तर मीं आपलें कल्याण करून घेतलें असतें, व मग मला पुनः जन्ममरण करावे लागले नसतें. परतु ती बोधि ह्मणजे रत्नत्रयी फार दुर्लभ आहे. यासबधानें शुभचन्द्राचार्यविरचित ज्ञानार्णवामध्ये द्वादशानुप्रेक्षाचे वर्णन करताना आचार्यांनी असें ह्मटले आहे:—

**सुलभमिह समस्तं वस्तुजातं जगत्या-**
**मुरगसुरनरेन्द्रैः प्रार्थितं चाधिपत्यम् ।**
**कुलबलसुभगत्वोद्दामरामादि चान्यत्**
**किमुत तदिदमेकं दुर्लभं बोधिरत्नम् ॥**

**अर्थः**—या जगामध्ये तिन्ही लोकामधील समस्त वस्तूचा समूह मिळणें सुलभ आहे. किंबहुना धरणीन्द्र, सुरेन्द्र, नरेन्द्र यांनीं सुद्धा प्रार्थना करण्या योग्य असा अधिपतिपणा मिळणेहि सुलभ आहे. इतकेच नव्हे पण कर्मोदयाने कुल, बल, सुभगता, सुदर स्त्री इत्यादि सर्व वस्तु मिळणेहि सोपे आहे. परतु सम्यग्दर्शनज्ञानचारित्रस्वरूप बोधिरत्न मिळणे, अतिशय दुर्लभ आहे असे चिंतवन करणें ह्यासच बोधिदुर्लभानुप्रेक्षा ह्मणतात.

## १२ धर्मानुप्रेक्षा.

रत्नत्रयी ह्मणजे सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, व सम्यक्चारित्र हाच खरा धर्म आहे, आत्म्याचा शुद्ध निर्मल स्वभाव हा आपला धर्म आहे, असे चिंतवन करावे. तसेंच हा अहिंसामय–दयामय–जो धर्म आहे तो निर्ग्रंथ अशा जिनेन्द्रभगवानानें सांगितला आहे. तो दशलक्षणयुक्त आहे व त्याची प्राप्ति मला ह्यावेळपर्यंत न झाल्यामुळेच मला

संसारांत जन्ममरणाच्या फेऱ्यांत परिभ्रमण करावें लागत आहे. धर्माची प्राप्ति झाल्यानें इंद्रधरणींद्रचक्रवर्त्यादिक पद सहज मिळून चार पुरुषार्थांतील शेवटचा पुरुषार्थ जो मोक्ष त्या सुखाची प्राप्ति होते. ह्मणून कल्याण करणाऱ्या ह्या जैनधर्माचे ठिकाणीं तुझें निर्मल असे श्रद्धान मोक्षप्राप्ति होईपर्यंत असले पाहिजे असे चिंतवन करणे ही **धर्मानुप्रेक्षा** होय.

याप्रमाणे बारा अनुप्रेक्षा जाणाव्यात. ह्या बारा भावनांचे जो निरंतर चिंतवन करील त्याला रोगादिबाधारहित, अतीन्द्रिय व अविनाशी सुख मिळेल अर्थात् केवलज्ञानानंद सुख होईल. मुमुक्षुजनानीं ह्या अनित्यादि बारा भावनाचे निरंतर चिंतवन करावे. संसारामध्ये वैराग्य उत्पन्न करण्याला जैनधर्मामध्यें ह्या बारा भावना सांगितल्या आहेत. ह्याचे वारवार चिंतवन केल्याने संसारदेहभोगांमधील ममत्व कमी होऊन कषायांची मंदता होईल व आत्महित साधण्याची प्रवृत्ति होईल.

**विध्याति कषायाग्निर्विगलति रागो विलीयते ध्वान्तम् ।**
**उन्मिषति बोधदीपो हृदि पुंसा भावनाभ्यासात् ॥**

**अर्थः**—ह्या बारा भावनाचा अभ्यास केल्यानें कषायरूपी अग्नि विझून जाऊन, ज्ञानरूप दीपकाचा प्रकाश पडतो. अर्थात् हा योगा-(ध्यान) धिकार आहे. तेव्हां ध्यानामुळे केवलज्ञान होऊन मोक्ष मिळतो येथपर्यंत द्वादशानुप्रेक्षाचे वर्णन झाले. आता श्रावकांच्या **'त्रेपन क्रिया'** सांगतों—आठ मूळगुण, बारा व्रतें, बारा तपें, एक साम्यभाव, अकरा प्रतिमा, चार दाने, एक पाणी गाळून पिणे, एक रात्री भोजनत्याग, एक सम्यग्दर्शन, एक सम्यग्ज्ञान, एक सम्यक्चारित्र, मिळून त्रेपन क्रिया होतात.

## गृहस्थी श्रावकांचीं षट्कर्में.

**गृहस्थांचीं** दररोज **षट्कर्मे** सांगितली आहेत. ती अशीं—१ इज्या ( पूजन करणे ), २ वार्ता ( असिमासिआदि सहा प्रकारचे

धंदे करून निर्वाह करणें ), ३ दत्ति, ४ स्वाध्याय, ५ संयम, आणि ६ तप.

**देवपूजा गुरूपास्ति स्वाध्यायः संयमस्तपः ।**
**दानं चेति गृहस्थानां षट्कर्माणि दिनेदिने ॥**

जिनागमांत गृहस्थाचीं अशीं सहा कर्में सांगितलीं आहेत. ह्या अवसर्पिणी कालामध्यें कर्मभूमीच्या प्रारंभीं जेव्हां कल्पवृक्षांचा अभाव झाला तेव्हां सर्व मानवजात उपजीविकेचें साधन न राहिल्यामुळें घाबरून गेली; व श्री आदिनाथ महाराजांची त्याबद्दल प्रार्थना केली; त्यावेळीं श्री **आदिब्रह्मा ऋषभदेवानें** उपजीविकेप्रीत्यर्थ षट्कर्म स्थापन केले.

**असिमषिःकृषिर्विद्या वाणिज्यं शिल्पमेवच ।**
**कर्माणीइमानि षोढा स्युः प्रजाजीवनहेतवे ॥७९॥**

**—( श्री आदिपुराण पर्व १६ )**

**अर्थः**—असि, मसि, कृषि, वाणिज्य, शिल्प, आणि पशुपालन असे सहा प्रकारचे धंदे करून निर्वाह करणें; असि ह्मणजे तरवार, बंदूक वगैरे हत्यारें बाळगून राज्यव्यवस्था करणे, मषि ह्मणजे अध्ययन व अध्यापक याचा धंदा करणे. कृषि ह्मणजे शेतकी करणे, वाणिज्य ह्मणजे व्यापार करणे. शिल्प ह्मणजे सुतारकाम, लोहारकाम, चित्रकाम, यंत्रकाम वगैरे करणे. आणि पशुपालन ह्मणजे गवळीपणा वगैरे धंदा करणें. असे सहा प्रकारचे धंदे करून उदरनिर्वाह करावा. उद्योगधंदा करावा. आळसानें बसू नये. आपल्या उदरनिर्वाहाचें ओझें होईल तेथवर दुसऱ्यावर पडूं देऊं नये. ह्यावरून जैनशास्त्र स्वावलंबनाचें तत्व शिकवितें राज्य करणारानें आत्मपालन ह्मणजे स्वतःच्या प्राणाचें रक्षण करावें. मतिपालन ह्मणजे आपली बुद्धि शुद्ध ठेवावी. कुलपालन ह्मणजे राजकुलाला सांभाळून त्याचा नांवलौकिक ठेवावा आणि प्रजापालन ह्मणजे पुत्राप्रमाणें प्रजेचें रक्षण करावें व दुष्टाचा संहार करावा. **दत्ति** ह्मणजे चार प्रकारचें **दान** द्यावें. स्वाध्याय ह्मणजे धर्मग्रंथ वाचावेत, शिकवावेत. संयम ह्मणजे मनोनिग्रह करणें. आणि

तप ह्मणजे इच्छेला रोकणे ह्मणजे शरीरावरील ममत्व कमी करण्याकरितां कायक्लेश करणे. संयमासबधाने एका गाथेत ह्मटले आहे.

**गाथाः**—सजमु अणुकपकुणतएण । सजमु परमत्थवियारणेण ॥
सजमु पोसइ दसण हु पथु । संजमु निच्छय णरुमोक्ख पथु ॥१॥
सजमु विणुणरभव सयलु सुण्ण । सजमु विणु दुग्गइ जियउपण्ण ॥
सजमु विणु घडिय मइच्छ जाउ । सजमु विणु विहलिय अत्थि आऊ ॥२॥

**अर्थः**—दया केल्यामुळे सयम होतो, परमार्थाचा विचार केला ह्मणजे सयम होतो. हा सयम सम्यक्दर्शनाच्या मार्गाला पुष्ट करतो. व निश्चयनयाने मनुष्याला सयम हाच मोक्षमार्ग होय. सयमाशिवाय मनुष्यजन्महि व्यर्थ आहे. अर्थात् इद्रादिक देव देखील सयमाकरिता ह्मणून मनुष्यजन्माची इच्छा करतात. सयमाच्या अभावी हा जीव नेहमी दुर्गतीमध्ये उत्पन्न होतो. ह्मणून सयमाशिवाय मी एक पळहि खर्च करणार नाही असे आपण चितवन केले पाहिजे. कारण सयमाच्या अभावीं हे आयुष्यहि व्यर्थ होय. तपाचे वर्णन वर केलेंच आहे. येणेंप्रमाणे गृहस्थाच्या षट्कर्माचे वर्णन करून ‘ सस्कारा ’ कडे वळतो.

## संस्कार अथवा क्रिया.

हिंदुधर्मीयांमध्यें जसे १६ सस्कार सागितले आहेत तसेच जैनलोकांत गर्भाधानादि त्रेपन ५३ क्रिया गृहस्थ-श्रावकाने कराव्यात असे सागितले आहे. ह्याचे सविस्तर वर्णन महापुराणात सागितले आहे. त्यातील कांहीं क्रियांची नांवे व लक्षणे येथे सक्षिप्तपणे सागतो. पहिली गर्भाधानक्रिया. स्त्री ऋतुमति झाल्यावर सहावे दिवशी तिने स्नान करून पतीबरोबर देवपूजा करावी व सतानप्राप्तीसाठी उभयतानीं रात्री सभोग करावा. ऋतुकालाशिवाय सभोग करू नये. तेरावी क्रिया लिपिसख्यानसग्रह. मुलाला पाचवे वर्ष लागले ह्मणजे मग त्याला गुरुगृही ( उपाध्याकडे ) नेऊन “ॐ नमः सिद्ध” ह्मणजे ओंकार लिहिण्यास शिकवावा. १४ वी उपनीति. आठवे वर्षी गुरूकडून त्याला

अणुव्रते देववावीत. गळ्यात यज्ञोपवीत घालावें. आणि कबरेस कड-दोरा बांधावा. ४६ वी व्रतचर्या. अणुव्रते पाळावीत. व ब्रह्मचर्यानें वागून विद्याभ्यासात काळ घालवावा. त्रेचाळिसावी क्रिया स्वराज्य. ह्मणजे पृथ्वीचें राज्य करणे. ४७ साम्राज्य. त्यांत असे सांगितले आहे.

**पार्थिवान् प्रणतान् यूयं न्यायैः पालयत प्रजाः ।**
**अन्यायेषु प्रवृत्तिश्चेद् वृत्तिलोपो ध्रुवं हि वः ॥२५९॥**
**न्यायश्च द्वितयो दुष्टनिग्रहः शिष्टपालनम् ।**
**सोऽयं सनातनः क्षात्रोधर्मो रक्ष्यः प्रजेश्वरैः ॥२६०॥**

आपल्या माडलिक राजाना प्रजा पालन करण्याविषयीं ताकीद देतांना परमेष्ठी ह्मणतो –'तुह्मी नीतीनें प्रजेचे सरक्षण करा. अनीतीकडे तुमची प्रवृत्ति झाल्यास तुह्मांस खचित अन्न मिळणार नाही. नीति दोन प्रकारची आहे. एक दुष्टांना शासन करणे व दुसरें साधूचें पालन करणें. हा दोन प्रकारची नीति हाच **क्षत्रियांचा धर्म** आहे.' पुढे ४८ वी निष्क्रांतिक्रिया आहे.

**त्वया न्यायधनेनाङ्ग भवितव्यं प्रजाधृतौ ॥**
**प्रजा कामदुधा धेनुर्मता न्यायेन योजिता ॥२७०॥**
**राजवृत्तमिदं विद्धि यन्न्यायेन धनार्जनम् ॥**
**वर्धनं रक्षणं चास्य तीर्थे च प्रतिपादनम् ॥२७१॥**
**असमंजसवृत्तो हि निजैरप्यभिभूयते ॥२७९॥**
**समंजसत्वमस्येष्ठं प्रजास्वविषमेक्षिता ॥**
**आनृशंस्यमवाग्दण्डपारुष्यादिविशेषितम् ॥२८०॥**

ह्मणजे परमेष्ठी आपल्या पुत्राला दीक्षेच्या वेळी असा उपदेश करितात, 'बा पुत्रा, तू न्यायधन ह्मणजे न्याय हेच ज्याचे द्रव्य आहे असे व्हावेस. कारण न्यायानें वागविलेली प्रजा ही कामधेनू होय. न्यायाने द्रव्य मिळविणें, तें न्यायानें वाढविणे, त्याचें न्यायाने सरक्षण करणे व त्याचा सत्पात्रीं खर्च करणे हा राजाचा सदाचार होय. असमजसतेने वागणाऱ्या राजाचा आपल्या प्रजेकडून पराभव होतो.

राजाच्या ठिकाणी समजसपणा ह्मणजे भयकर दण्ड करणें, फाजील कर बसविणे, अथवा सत्पुरुषाचा छळ करणे हा नसून प्रजेविषयीं समदृष्टि असणे हा होय.' इत्यादि वर्णन आहे. ४९ दिशाजय–सहा खड पृथ्वी जिकण्यास निघणें. ह्यांतील बहुतेक क्रिया (सस्कार) सध्यां आपल्यामध्ये करीत नाहीत. मुख्य तेवढ्या मानतात. ह्या त्रेपन क्रिया श्रावकांच्या गुणाला वाढवीत मोक्षपदाला पोहोचवितात. ह्याप्रमाणें **श्रावकधर्म** आहे. जैनधर्मामध्ये उच्चतम व सर्वोत्कृष्ट नीतितत्वे व सदाचार गोविलेला आहे. तसेच जैनधर्मातील नियम पुनःपुन. आपणाला कठरवाने असे सांगतात की, हा ससार आपले मनोरथ पूर्ण करणार नाही. ह्यावर प्रीति करू नको. फक्त आपल्या आत्म्याचे ध्यान कर. होईल तितके करून ह्या ससाराशी आपला सबध कमी ठेवून कसाहि आणीबाणीचा प्रसग आला तर तू स्वत्व (आत्मस्वरूप) विसरू नकोस. आपणाला हे नियम योगी अथवा मुनि होण्याचा उपदेश करून क्रमाक्रमाने स्वतः परमात्मा बना असे सागतात. आमच्या धर्मातील तत्वें उदात्त असून त्यावरच नीतीची इमारत उभारली ही गोष्ट यावरून कोणाच्याहि ध्यानांत येईल. इतर धर्मांच्या तत्वांशी जैनधर्माची तुलना केली असता कोणालाहि असे दिसून येईल की, आमचीं धर्मतत्वे त्रिकालाबाधित आहेत, सत्य आहेत, उदात्त आहेत, व निसर्गाला अनुसरून आहेत. जैनधर्मात मानवी कर्तव्यासबधाने जितका चागला खुलासा झाला आहे तितका इतर कोणत्याहि धर्मात झालेला नाही. अतींद्रिय गोष्टीचा खुलासा आमच्या धर्मापेक्षा इतर धर्मात सांपडणे शक्य नाहीं. चर्मचक्षूना दृग्गोचर होणाऱ्या बाह्य सृष्टीशिवाय करून या त्रैलोक्यांतील अज्ञेय वस्तूचें ज्ञान जर कोठे मिळणें शक्य असेल तर ते आमच्या धर्मातच होय. आमचा धर्म आज हजारों वर्षे अनेक जीवावरचे दुखणे येऊन देखील टिकला आहे यांतीलहि बीज हेंच होय. आजपर्यंत अनेक धर्म आपल्यापरीने जैनधर्मावर वर्चस्व स्थापन करण्याचा प्रयत्न करून गेले, परतु कोणत्याहि एका धर्मानें

जैनधर्म आत्मसात् करून घेतला आहे असें झाले नाहीं. उलट या धर्मांच्या झगड्यामध्यें आमच्या जैनधर्माचा संस्कार इतर धर्मांवर पुष्कळ अशानें झाला असल्याचे लो० टिळकप्रभृति विद्वानांनीहि प्रांजलपणे कबूल केले आहे. जैनधर्म हा एक वेगळाच स्वतंत्र असा योग्याचा व गृहस्थांचा धर्म आहे. जे ह्या संसाराला व त्यांतील वस्तूंना तुच्छ मानतात, जे ह्या जगाशीं आपला फार थोडा संबंध ठेवितात, जे एका प्रतिमेपासून ते दुसऱ्या प्रतिमेपर्यंत वाढत वाढत शेवटीं संसाराचा त्याग करून निर्ग्रंथ बनून परमात्मस्वरूपामध्ये तन्मय होतात अशा लोकांचा हा धर्म आहे. जे लोक ह्या संसाराकरितां जन्मास आले आहेत, व ज्यांना खाणेपिणे व चैन करणे इतकेंच आपलें आयुष्यांतील इतिकर्तव्य वाटते अशा लोकांकरिता जैनधर्म नाहीं. असो. श्रावकाच्या ज्या काहीं क्रिया वर सांगितल्या आहेत त्यामध्ये " स्नान करूं नका. दंतधावन करू नका. मलिन रहा. " असा कोठेंहि उपदेश केलेला नाहीं. उलट प्रत्येक श्रावकाने आपले शरीर स्नान करून पवित्र व निर्मल राखावे असाच उपदेश केलेला आहे. दशलक्षणी धर्मांतील ही एक आज्ञा आहे. शौचधर्म हाच उपदेश कठरवाने सांगत आहे. कर्मठ जैनीसुद्धा नित्य स्नान करितात. फक्त एकदाच स्नान करितात एवढेंच नव्हे तर ज्या ज्या वेळीं मलमूत्र विसर्जन करून येतात त्या त्या वेळीं स्नान करणारेहि बरेच लोक आह्मामध्ये दिसून येतात. जे लोक जैनांना मलीन ह्मणतात ते अक्षम्य अशी चूक करितात. ह्या बाबतींत ते जैनांशीं अन्यायानें वागतात. जैनशास्त्रामध्ये आपले शरीर स्वच्छ व निरोगी ठेवण्याबद्दल स्पष्ट आज्ञा आहे. पंडित **आशाधरकृत सागारधर्मामृत** ग्रंथामध्यें ह्मटले आहे कीं, स्नानाने देह शुद्ध करून स्वतः जिनपूजा करावी; अथवा इतराकडून करविल्यास तोहि स्नानानें पवित्र झाला असावा.

**स्त्र्यारम्भसेवासंक्लिष्टः स्नात्वाऽऽकण्ठमथाऽऽशिरः ॥**
**स्वयं यजेतार्हत्पादान्स्नातोऽन्येन याजयेत् ॥३४॥**

**अर्थः—** स्त्रीसंग व उदरनिर्वाहाचे उद्योग करून थकलेला

जो प्रापंचिक मनुष्य त्यानें कंठापर्यंत किंवा मस्तकावरून स्नान करून शुद्ध होऊन नंतर स्वहस्ते जिनेंद्राची पूजा करावी. स्नान झाले नसल्यास जो स्नानानें शुद्ध झाला आहे अशा इतर श्रावकांकडून पूजा करवावी. ' नित्य स्नान गृहस्थस्य ' असेंहि ह्मटलें आहे. यावरून जनलोक अमंगळ अथवा घाणेरडे असतात असा मिथ्या दोषारोप करणे मूर्खपणाचे आहे. येथपर्यंत श्रावकधर्माचे थोडक्यांत वर्णन केले.

## मुनीचें चारित्र.

**विषयाशावशातीतो निरारंभोऽपरिग्रहः ।**
**ज्ञानध्यानतपोरक्तस्तपस्वी स प्रशस्यते ॥ समंतभद्राचार्य.**

**अर्थः**—ज्याला विषयाची आशा नाहीं, जो आरंभ व परिग्रह सोडून देऊन ज्ञान, ध्यान, आणि तप यामध्ये सदा निमग्न झाला आहे तो तपस्वी अथवा मुनी होय. श्रावक आपले आचरण सुधरीत अकराव्या प्रतिमेपर्यंत गेला ह्मणजे त्याने गुरूपाशी साधुदीक्षा घ्यावी. साधूचे अठ्ठावीस मूळगुण आहेत ते असे–(५) अहिंसा, सत्य वगैरे पांच महाव्रतें (५) ईर्या, भाषा वगैरे पांच समिति पाळणे, (६) सामायिक, प्रतिक्रमण वगैरे सहा आवश्यक पाळणे, (५) शब्द, स्पर्श, रूप, रस, व गंध या पांच इंद्रियांचे विषय सोडणे, (१) वस्त्रत्याग (१) केशलोच करणे ह्मणजे डोक्यावरील केस, दाढी व मिशा स्वहस्ताने उपटून काढणे, (१) एक वेळ भोजन करणे, (१) उभे राहून भोजन करणे, (१) पाणिपात्रात भोजन करणे, (१) स्नान न करणे, (१) दंतधावन न करणे. असे अठ्ठावीस मूळगुण पाळणारा तोच मुनी होय. दिगंबर मुद्राधारी साधूनी आत्मध्यानाकरिता निर्जन ठिकाणीं लहान मुलाप्रमाणे विकाररहित व नग्न असले पाहिजे. जमिनीवर निजलें पाहिजे. आपल्या समोर चार हात जमिनीपर्यंत दृष्टि ठेवून सावधानानें जीवजंतु पाहून चालले पाहिजे. व तसेंच ४६ दोष व ३२ अंतराय टाळून श्रावकाच्या येथे तो जे देईल तेवढे खाऊन बाहेर निघावें. दिगंबर यतींचें पात्र हस्तच होय. १ क्षुधा, २ तृष्णा, ३

शीत, ४ उष्ण, ५ दशमशक, ६ नाग्न्य, ७ अरति, ८ स्त्री, ९ चर्या, १० आसन, ११ शयन, १२ दुर्वचन, १३ वध, १४ याचना, १५ अलाभ, १६ रोग, १७ तृणस्पर्श, १८ मल, १९ सत्कारपुरस्कार, २० प्रज्ञा, २१ अज्ञान, व २२ अदर्शन असे बावीस प्रकारचे परिषह सहन करावेत. ज्या साधूमध्ये हे बावीस प्रकारचे परिषह सहन करण्याची शक्ति नाहीं ते कधींहि साधू होऊ शकत नाहींत. साधूची **अयाचकवृत्ति** असली पाहिजे. ह्मणून त्यांनीं चौदा प्रकारचा अतरग व दहा प्रकारचा बहिरग परिग्रहांचा त्याग केला पाहिजे व निर्ग्रंथ झाले पाहिजे. उन्हाळ्यात पर्वतशिखरी, हिवाळ्यात नदीच्या काठीं, आणि पावसाळ्यांत झाडाच्या खाली तपश्चरण करावे. सर्वदा ध्यान व स्वाध्याय यामध्यें निमग्न असावे. प्रो. हरमिन जेकोबी यांनीं जैनमुनीसबधाने ह्मटले आहे:—' The munis of the Jains, it appears, very fond of seclusion and nature's beauty.' जैनमुनीना एकातवास व सृष्टिसौंदर्य फार आवडते. दौलतरामजींनी आपल्या छःढालेमध्यें मुनीच्या चारित्रासबधानें असे ह्मटले आहे.—

**अरिमित्र महल मसान कंचन, कांच निन्दन थुतिकरण ।**
**अर्घावतारण असि प्रहारण, में सदा समता धरण ॥**
**तप तपें द्वादश धरें वृष दश, रतन त्रय सेवें सदा ।**
**मुनि साथमें वा एक विचरें चहै नहिं भवसुख कदा ॥**

**अर्थः**—मुनींना शत्रु व मित्र, राजमहाल व स्मशान, सुवर्ण व कांच, निंदा व स्तुति, त्याची पूजा करणे व त्यांना असिप्रहार करणे ह्यामध्ये काहींएक भेद दिसत नाहीं. कोणत्याहि स्थितीमध्यें त्याच्या मनाची समता असते. बारा प्रकारचें तप करणे, दशलक्षणी धर्म पाळणें, रत्नत्रयीची सदा सेवा करणें, स्वतः एकटे विहार करणें, अथवा मुनीसघाबरोबर विहार करणे, व ससारसुखाचा कधींहि अभिलाष न करणें, अशा प्रकारचें मुनीचे चारित्र्य असलें पाहिजे. तसेच मुनींनीं सघांत राहणें जास्त चांगलें. मुनीचें मरण सन्निध

# पदस्थ ध्यानाची माहिती.

हा आकार नाभीकमळावर स्थापन करून त्याचें चिंतन करावें. ह्या सोळा पाकळ्यांपैकीं आठ पाकळ्यांवर बारा बारा पुज्यें आहेत. आणि मध्यें चार दिशेला चार व विदिशेला आठ मिळून त्या बारा आहेत. एकूण सर्व १०८ पुज्यें जाहलीं. अगोदर वरच्या पाकळीच्या पहिल्या पुज्यांवर ध्यान ठेऊन मध्यें स्थापन केलेल्या पंचपरमेष्टीचें चिंतन करावें. नंतर दुसऱ्या पुज्यांवर ध्यान ठेवावें. अशा प्रमाणें ८ पाकळ्यां वरील ९६ व मधल्या बारा मिळून १०८ पुज्यांवर ध्यान ठेवीत णमोकार मंत्राचा जप करावा. आणि मध्यंतरी स्थापन केलेल्या मूर्तिचें चिंतन करावें. नंतर सोळा स्वर आणि छत्तीस व्यंजनेंयांवर ध्यान ठेऊन चिंतन करावें. प्रथमतः वरच्या बाजूंनीं डावीकडे वळावें. मध्यभागीं अष्टप्रातिहार्यसहीत अर्हंत. वरच्या भागीं सिध्द, डावीकडे आचार्य, खालच्या बाजूस उपाध्याय. आणि उजवीकडे साधू होत.

चित्रशाळा प्रेस पुणेंशहर.

आलें असतां श्रावकाप्रमाणे त्यानेहि समाधिमरण साधावें ( सल्ले-खना करावी). मरण सन्निध आलें असता संघाचार्यांनीं परगणचर्या करावी. ह्मणजे पहिल्या संघातून दुसऱ्या मुनींच्या संघात जावें. कारण ज्या संघाचे आपण धुरीण असतो त्यामध्ये आपणास अशक्तता आली असतां, अथवा शरीरांत व्याधि झाली असतां, अथवा इतर कोणत्याहि कारणानें आपल्या शिष्यांस आपण आज्ञा केली असतां ती जर संघातील इतर मुनींनीं ऐकिली नाहीं तर त्यापासून परिणामांत क्रोध वगैरे उत्पन्न होतो. व समाधिमरण साधत नाहीं. करिता दुसऱ्या संघात गेले ह्मणजे आज्ञाभंगादिकांपासून होणारे जे दुष्परिणाम ते न घडल्यामुळें परिणाम शांत राहून मरण साधता येते. कारण पहिल्या संघात राहिल्यापासून आज्ञाकोप, कठोरवचन, कलहपरितापन, निर्भयता, स्नेह, कारुण्य, ध्यानविघ्न आणि असमाधि असे दोष उत्पन्न होतात, व दुसऱ्या संघांत ह्या दोषाची निवृत्ति होते. सबब संघाचार्यांनीं दुसऱ्या संघात जावें. हा यतिधर्म असिधाराव्रताप्रमाणें कठीण आहे. यतींनीं आपला सर्व वेळ शुक्लध्यान व धर्मध्यान यामध्यें घालवावा. श्वेतांबर जैनयति हे शुभ्रवस्त्रे परिधान करितात. ते शहरांत राहतात. व बिछान्यावर निजतात. दिगंबर यति नग्न राहतात. असो. येथपर्यंत 'यत्याचाराचे' वर्णन केले. आतां ध्यानाचे वर्णन करितों.

## ध्यान.

**चित्तविक्षेपत्यागो ध्यानम्** । ह्मणजे ज्ञेयवस्तूमध्यें आपल्या चित्ताची एकाग्रता करणे, ह्याला ध्यान ह्मणतात. ज्ञेय ह्मणजे जी जाणण्यायोग्य वस्तु आहे ती. ध्यान हा एक मोक्षाला जाण्याचा प्रधान ( राज ) मार्ग आहे. ह्याच्या योगाने आमची कर्मबंधनें एकदम तुटून जातात. ह्मणजे कर्माची निर्जरा होत जाते. ध्यानाचे चार प्रकार आहेत. दोन शुभ व दोन अशुभ. दोन अशुभ अथवा खोटीं ध्यानें आहेत. तीं अशीं:–एक आर्त व एक रौद्र.

## आर्तध्यान.

**दुःखके कारण आवते, दुःखरूप परिणाम ।**
**भोग चाहि यह ध्यानदुर, आर्त तजो अघधाम ॥**

—( ज्ञानार्णव. अ. २५. )

आर्त ह्मणजे दुःखी होणे. अर्थात् ज्यायोगाने परिणाम (भाव) दुःखी होतात त्याला आर्तध्यान ह्मणतात. परिणाम दुःखी होण्याची चार कारणें आहेत. (१) **इष्टवियोग**—ह्मणजे आपल्या आवडत्या माणसाचा, अथवा इष्ट वस्तूचा वियोग होणे. व त्यामुळे शोक करणे. (२) **अनिष्टसंयोग**—ज्या अचेतन अथवा चेतन वस्तु नावडत्या आहेत त्याचा सयोग झाल्यास त्या दूर करण्याकरिता चिंता करणे, दुःख करणे. (३) **पीडाचिंतवन**—रोगादि दुःख झाले ह्मणजे चिंता करणे. (४) **निदान** दुसऱ्याची विभूति ह्मणजे संपत्ति धन दौलत पाहून आपल्याला दुःख होणें. व आपणासहि असण्याविषयींची इच्छा करणे. आर्तध्यानाने तिर्यग्गतीचे आयुष्य बाधते. मूर्च्छा ( परिग्रहासक्ति ), दुष्टस्वभाव, लुब्धपणा किंवा कृतघ्नपणा, आळस, अधिकाभिलाष, भय, अंतःकरणाचा चंचलपणा, पश्चाताप हीं आर्तध्यानाची चिन्हे आहेत. याप्रमाणे आर्तध्यानाचे निरूपण करून रौद्रध्यानाचे निरूपण करितो.

## रौद्रध्यान.

**पंच पाप में हर्ष जो, रौद्र ध्यान अघ खानि ।**
**आर्तकह्यो दुःख मगनता, दोऊ तजनिज जानि ॥**

पापामध्ये आनंद मानण्याचे परिणाम (भाव) असणे, क्रूरपणा करणे ह्याला रौद्रध्यान ह्मणतात. असे परिणाम होण्याची मुख्य चार कारणें आहेत. (१) **हिंसानंद**—आपल्या मन, वचन, कायेनें दुसऱ्याचा स्वतः प्राण घेणे, अथवा प्राण घ्यावयास लावणें, अथवा दुसरा कोणी जीव घेत असतांना ते ऐकून आनंद मानणे, एखाद्या अवयवाचा छेद करणे. (२) **मृषानंद**—खोटे बोलणे, बोलावयास लावणे. अथवा बोललेले ऐकून आनंदित होणें. (३) **चौर्यानंद**—चोरी करणे,

अथवा करविणे. अथवा दुसऱ्या कोणी केली असे ऐकून आनद मानणे. ( ४ ) **परिग्रहानंद**-ससारिक सामग्री वाढविणें, वाढवावयास लावणे. अथवा वाढली असे ऐकून आनद पावणें. रौद्रध्यानाचे वर्णन वाचताना महापुराणांत एक अत्यत बोधप्रद अशी गोष्ट आमच्या वाचण्यांत आली ती आह्मी आमच्या वाचकाकरिता खालीं देतो.

**सिक्थमत्स्यः किलैकोऽसौ स्वयंभूरमणाम्बुधौ ।**
**महामत्स्यसमान्दोषानवाप स्मृतिदोषतः ॥**

**अर्थः**—स्वयभूरमण समुद्रामध्ये सिक्थमत्स्य नावाचा (तांदळा इतका मोठा) मासा महामत्स्याच्या व्यापाराचे स्मरण करून त्या दोषाने महामत्स्यासारख्या दोषाना प्राप्त झाला. तात्पर्य, पूर्वी स्वयभूरमण समुद्रामध्ये शिशुमार नांवाचा एक फार मोठा मत्स्य होता; तो इतका मोठा होता कीं, तो चालू लागला ह्मणजे पूर्वी ज्या जागेवर त्याचे तोंड होते त्या जागेवर त्याचे शेपूट येण्यास सहा महिने लागत असत. अशा त्या माशाच्या डोळ्यांत एक लहान मासा होता, ज्यावेळी तो शिशुमार मत्स्य निजत असे त्यावेळी त्याच्या श्वासोच्छ्वासाबरोबर कितीएक प्राणी बाहेर पडत व आतहि जात असत. तो त्याच्या नेत्रात असलेला मासा बाहेर पडलेल्या जीवाना पाहून मनात चिंतन करी की, माझे तोंड जर याच्या तोंडाप्रमाणे विस्तृत असते तर मी हे सगळे जीव सहज भक्षण करून टाकले असते. अशा निरतर **रौद्रध्याना**मुळे त्या शिशुमार नावाच्या महामत्स्याला प्राप्त झालेले हिंसादोष या सिक्थमत्स्यासहि प्राप्त होत गेले; त्यामुळे तो सातव्या नरकात गेला हें प्रसिद्ध आहे. व तो महामत्स्य मरणपावल्यावर पहिल्या नरकासच गेला. तात्पर्य पातकाचे बध मनाच्या योगाने जास्त होतात. असो. हे रौद्रध्यान नरकगर्तीला कारण होय. हे आर्त व रौद्रध्यान केल्याने कोणत्याहि प्राण्याचे कल्याण होणार नाही. उलट दुहेरी हानि मात्र होते. एकतर इहलोकी दुःख होते. व दुसरे हा प्राणी ज्याचें फल दुसऱ्या जन्मी सुद्धा भोगावे लागते अशा अशुभ कार्मांणपर-

माणूना खेचून घेतो. ह्मणून कर्मांचा संवर व निर्जरा व्हावी असे इच्छि-णाऱ्याने ह्या दोन्ही अशुभ ध्यानाचा त्याग केला पाहिजे. ध्यान कर-णाऱ्यांनी दोन शुभध्यानांचा विचार करावा. एक धर्मध्यान, एक शुक्ल-ध्यान. आता धर्मध्यानाचे वर्णन करितों.

## धर्मध्यान.

ध्यानामध्ये मुख्य चार गोष्टी आहेत. १ ध्याता-ध्यान करणारा. २ ध्यान काय आहे ? व कशाने होते. ३ ध्येय-ध्यान कोणाचे करावे ? ४ ध्यानाचें फळ काय ?

### ध्याता.

**जो गृहत्यागी होय, सम्यक् रत्नत्रय विना ।**
**ध्यान योग नहीं सोय, गृहवासी की काकथन ॥**
**—( ज्ञानार्णव. ४. )**

**रत्नत्रयको धारि जे, शम दम यम चितदेय ।**
**ध्यान करैं मन रोंकि कैं, धनिते मुनि शिवलेय ॥**
**—( ज्ञानार्णव. अ. ५ )**

रत्नत्रयधारक, समता अर्थात् वीतराग स्वरूपी, पचेंद्रियांना वशी-भूत करण्याची इच्छा करणारा माणूसच ध्यान करण्यास योग्य आहे. कषायकलुषित किंवा कषायरहित असा आत्मा तो **ध्याता.** जेथे मना-मध्यें अन्य मनोविकार येणार नाहींत असे ध्यान करण्याचे एकांत स्थळ असावे. ध्यान करीत असताना मनाची एकाग्रता झाली पाहिजे. ज्याचें ध्यान करावयाचें तें **ध्येय** होय. ह्मणजे प्रशस्त किंवा अप्र-शस्त परिणाम होण्याला कारण होणारा पदार्थ तो **ध्येय** होय. जेव्हां आपणाला आत्म्याचें खरे स्वरूप ( स्वस्वरूप ) कळतें तेव्हां आपल्या आत्म्यामध्ये व सिद्धात्म्यामध्यें कांहींएक भेद राहत नाहीं. सिद्ध पर-मात्मा शुद्ध, बुद्ध, चिदानंदरूपी आत्मा आहे. ध्यान करणारा माणूस शेवटी संपूर्ण कर्मांचा नाश करून आत्मस्वरूपामध्यें लीन होऊन जातो. अर्थात् त्याला अक्षय्य मोक्षसुख मिळतें. ह्मणजे संसारदुःखापासून तो

मुक्त होतो. येथें हीहि गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे की, आत्मा व परमात्मा ह्या दोन्हींचे स्वरूप निराकार आहे. व ह्मणूनच ते समोर आणून दाखविता येत नाही. व ह्यामुळे एकदम मन (चित्त) आत्म्याचें व परमात्म्याचें स्वरूपामध्यें लीन होण्याला फार कठीण जातें. व याकरिताच काहीतरी साकार चिन्हाची अवश्यकता आहे. कारण त्याच्या साह्याने तरी आह्माला आमच्या आत्म्याचे व परमात्म्याचे ध्यान करितां येईल. व ह्मणूनच मूर्तिपूजेची अवश्यकता आहे. कारण सर्व विश्व आपल्या डोळ्यापुढे ठेवितां येत नाही ह्मणून त्यांतील एक भाग आपल्यापुढे ठेवावयाचा; व अशा रीतीनेच मूर्तीची कल्पना आली असावी. व्हाइसराय हे जसे बादशाहा नव्हेत पण बादशाहाचे प्रतिनिधि आहेत, त्याचप्रमाणे परमात्म्याच्या अथवा ईश्वराच्या स्वरूपाची मूर्ति ही प्रतिनिधि आहे. मूर्तिपूजेमध्ये कांही सूचक चिन्हेंहि आहेत. जुन्या पैशावरील तराजू हें जसे ईस्टइंडिया कंपनीचे चिन्ह आहे तसेच चोवीस तीर्थकरांची चोवीस लांछने हींहि होत. मूर्ति ईश्वराचे चित्र किंवा प्रतिनिधि आहे, अशी खात्री झाल्यावर तिची पूजा करण्यात काही पातक नाही. असो. जैनागमांमध्ये धर्मध्यानाचे चार प्रकार सांगितले आहेत. १ **आज्ञाविचय**— अरहंतांची आज्ञा शास्त्रद्वारा ओळखून वागणें. ह्याने परिणाम शुभ होतात. २ **अपायविचय**— कर्मांना नाश करण्याचा उपाय शोधित राहणें, अथवा मिथ्यादर्शनज्ञानचारित्र यांचा अपाय ( नाश ) हे जीव कधी करतील याची चिंता करणे याचे नांव अपायविचय. ३ **विपाकविचय**–कर्मांच्या फलाविषयीं विचार करावा की, संसारामध्ये जीव हा आपल्या पुण्य अथवा पापानुसार वेगवेगळी सुखदु:खे भोगतो. ४ **संस्थानविचय**–तीन लोकाचे स्वरूप व तसेंच नरकादिसंबधानें विचार करावयाचा. हें धर्मध्यान वीतराग परिणाम होण्याचे कारण आहे. असे चार प्रकारचे धर्मध्यान परमानंदाचे कारण आहे. ह्याप्रमाणें संसारातून मन काढून आपल्या आत्म्याला सिद्ध मानून जे ध्यान करितात ते अभ्यासानें संपूर्ण कर्मांचा

नाश करून तद्रूप होतात. मनाचे परिणाम शुद्ध होण्याला अर्थात् वीतरागस्वरूपी होण्याला धर्मध्यानाची अत्यंत आवश्यकता आहे. द्वादशानुप्रेक्षांच्या रसस्वादामध्यें तल्लीन होतात त्यानाच धर्मध्यान होतें. व जसजसे शुद्ध परिणाम होत जातात तसतशी कर्मांची निर्जरा होत जाते. आणि हीच शुद्धता जेव्हा अधिक होते तेव्हां शुक्लध्यान होते.

## शुक्लध्यान.

शुक्लध्यान ह्मणजे आत्मध्यान. अथवा कषाय ह्मणजे रागद्वेषादि दोष, तोच जो मळ त्याचा ज्यात अगदी संबंध नाही अशा, निर्मल अशा आत्मपरिणामाला शुक्लध्यान ह्मणावे. धर्मध्यानामध्यें दशलक्षणीधर्म, बारा प्रकारचे तप, तेरा प्रकारचे चारित्र, सामायिक, वंदना, स्तवन, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान व कायोत्सर्ग ह्या षडावश्यकता व बारा अनुप्रेक्षा यांचा समावेश होतो. शुक्लध्यान चार प्रकारचे आहे. ते साक्षात् मोक्षपदाची प्राप्ति करून देणारें आहे. त्याचे भेद—पृथक्त्ववितर्कविचार, एकत्ववितर्कविचार, सूक्ष्मक्रियाप्रतिपाति आणि व्युपरतक्रियानिवृत्ति—ह्या नावाचे आहेत.

**पृथक्त्वेन वितर्कस्य वीचारो यत्रतद्विदुः ।**
**सवितर्कं सवीचारं पृथक्त्वादि पदाव्हयम् ॥**

**अर्थः**—जीवाजीवादि सर्व पदार्थ एकमेकांपासून अगदी भिन्न आहेत, असा जो विचार त्यास पृथक्त्ववितर्कविचार ह्मणतात.

**एकत्वेन वितर्कस्य स्याद्यत्राविचरिष्णुता ।**
**सवितर्कमवीचारमेकत्वादि पदाभिधम् ॥**

**अर्थः**—सर्व वस्तु एकरूप आहेत असा विचार ज्यात नसतो ते एकत्ववितर्कविचार नावाचे शुक्लध्यान होय.

**मनोवचनकायाँश्च सूक्ष्मीकृत्य च सूक्ष्मिकाम् ।**
**क्रियां ध्यायेत्परं ध्यानं प्रतिपात्पराङ्मुखम् ॥**

**अर्थः**—मन, वाणी व शरीर यांस सूक्ष्म करून न बिघडूं देतां एकाग्रतेनें जे सूक्ष्मक्रियेचें ध्यान कोणीहि करील तें सूक्ष्मक्रियाप्र-

तिपाति नावाचे शुक्लध्यान समजावे. हें ध्यान सयोगकेवली मुनि करितात.

**ततो निरुद्धयोगः सन्नयोगी विगतास्रवः ।**
**समुच्छिन्न क्रियाध्यानमनिवृत्ति तदा भवेत् ॥**

**अर्थः—**मग ( सूक्ष्मक्रियाप्रतिपाति नावाचे शुक्लध्यान केल्यानतर ) मनोयोग, काययोग आणि वचनयोग ह्या तिन्ही योगाचा निरोध करून ज्याचे आस्रव बद झाले आहेत असा अयोगकेवली सर्व क्रियेच्या उपरमाचे जे ध्यान करितो ते व्युपरतक्रियानिवृत्ति नांवाचे शुक्लध्यान समजावे. आत्मध्यानी महात्म्याची अवस्था कशी असते याचे सुंदर वर्णन पण्डित दौलतरामकवींनी आपल्या छःढाला नामक पुस्तकात केले आहे. ते ह्मणतातः—

**जहँ ध्यान ध्याता ध्येय को न विकल्प वच भेद न जहाँ ।**
**चिद्भाव कर्म चिदेश कर्ता चेतना किरिया तहाँ ॥**
**तीनो अभिन्न अखिन्न शुध उपयोगकी निश्चल दशा ।**
**प्रगटी जहाँ दृगज्ञानब्रह्म ये तीन धा एकै लशा ॥**

**अर्थः—** आत्मध्यानअवस्थेमध्ये ध्यान, ध्याता व ध्येय यांमध्ये कसलाहि भेद राहत नाही. शब्दानी सांगण्यासारखा कांही भेदच उरत नाही. आत्माच कर्म, आत्माच कर्ता व आत्म्याचा भाव हीच क्रिया. येथे कर्ता, कर्म व क्रियाभाव यामध्ये बिलकुल फरक नाही. एक दुसऱ्यापासून तोडण्याजोगे नाही. येथे तर शुद्धभावाची स्थिर अवस्था आहे. दर्शन, ज्ञान, चारित्राची जी रत्नत्रयी आहे तीहि एक होऊन प्रकाशमान होते. असो. त्याचप्रमाणे **पदस्थ, पिंडस्थ, रूपस्थ** व **रूपातीत** असेहि ध्यानाचे चार प्रकार आहेत. पवित्र मत्रवाक्यांचे जे चिंतवन करणे त्याला **पदस्थ[१]ध्यान** ह्मणतात. आपल्या आत्म्याचे चितवन करणे त्यास **पिंडस्थध्यान** ह्मणतात. पिंडस्थध्यानाचा अभ्यास

---

१ पदस्थध्यानाच्या कमळाचें चित्र पहा. त्यातील सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, सम्यक्चारित्र व सम्यग्तप या पांकळ्यांवरील पूज्ये चुकून पडलीं असल्यामुळें तीं धरू नयेत.

केल्यानें ह्या आत्म्याला थोड्याच अवधींत मोक्षसुख प्राप्त होतें. सर्व चिद्रूपाचे अर्थात् अरहताचें चिंतवन करणे यास **रूपस्थध्यान** ह्मणतात. संपूर्ण कर्मांपासून दूर, अमूर्त, अनंतगुणाचा भांडार असा जो ज्ञानरूपी सिद्धपरमात्मा त्याचें ध्यान करणे यास **रूपातीतध्यान** ह्मणतात. ह्याप्रमाणें जेव्हां मुनि आपल्या आत्मध्यानामध्ये लीन होतात तेव्हांच शुक्लध्यानरूपी अग्नीने कर्मरूपी वनाचा नाश होऊन केवलज्ञान प्राप्त होते. ह्मणजे त्याना रूपी पदार्थांचे ज्ञान होतें. व ते अरहंत होतात. सारांश, जैनमुनींचा सर्व वेळ पूर्वी बांधिलेल्या कर्मांचा नाश करण्यांत व नवीन कर्मांच्या द्वाराना रोंकण्यांत व आत्म्याला कर्मरहित करण्यांत खर्च होतो. असो. आपणाला येथे ' निर्ग्रंथ नग्न कां असतात ? व जैनलोक नग्न मूर्तींची पूजा का करितात ? ' यासंबधानें मात्र चार शब्द सांगतों.

## जैनसाधु नग्न कां असतात व जैनलोक नग्न मूर्तींची पूजा कां करितात ?

जोपर्यंत एखाद्या माणसाला आपण नग्न आहोत असे वाटत असते तोंपर्यंत त्या माणसाला मोक्ष मिळत नाहीं असे जैनधर्मांत सांगितलें आहे. आणि जैनमुनी ह्याच कारणामुळे नग्न असतात. ' मी नग्न आहे ' अशी भावना जोंपर्यंत आमच्याप्रमाणें मुनींच्याहि मनामध्ये वास करीत असते तोंपर्यंत तो मोक्षाला पात्र नाहीं असे जैनधर्मांत ह्मटले आहे. 'मी नग्न आहे' ही गोष्ट जेव्हां तो विसरून जातो, तेव्हांच त्या माणसाला ह्या संसारार्णवांतून तरून जातां येईल. ' मी नागवा आहे ' ही भावनाच आह्माला स्वर्गाला अथवा मोक्षाला जाऊं देत नाहीं. ह्मणून जेव्हां हा विचार आमच्या मनाला शिवणार नाहीं. तेव्हांच आह्माला निर्वाण—अर्थात् मोक्ष मिळेल. जैनधर्मांमध्यें परिणाम व ज्ञान ह्याला अतिशय महत्व दिले आहे. परिणाम व ज्ञान ह्या दोन्हींवरच जैनधर्मीयांचा मोक्ष अवलंबून आहे. Good actions done with bad motives are bad & bad actions done with good motives are good

हें जसें कायद्याचें तत्व आहे तसेच पुण्य व पाप हेहि परिणामावर अवलंबून असतात. असे महापुराणांतहि ह्मटलें आहे:-**'कारणं परिणामः स्याद्बंधने पापपुण्ययोः'** अर्थात् पुण्य व पाप यांच्या बंधनाला चित्ताचे शुभाशुभ परिणाम कारण आहेत. याबद्दल जैनपुराणात एक अत्यंत बोधप्रद अशी कथा सांगितली आहे. शिवभूति मुनींनीं आपल्या आईला उडदाची दाळ धूत असतांना पाहिले. व त्यांनी असा विचार केला की, ज्याप्रमाणे उडदाची दाळ त्यावरील टरफलाने झाकली आहे त्याचप्रमाणें आपला आत्माहि अनादिकालापासून कर्मांनी आच्छादित आहे. व त्यांनी हें आवरण (पडदा) नाहींसे करण्याकरितां ध्यान धरिलें. व 'तुषमाषभिन्न, तुषमाषाभिन्न' ह्मणजे आत्मा हा उडदाच्या दाळीप्रमाणे आहे, व कर्मे ही त्यावरील टरफलाप्रमाणें भिन्नाभिन्न आहेत, असे चिंतवन करूं लागले. अर्थात् शरीर व आत्मा भिन्न आहे अशा तऱ्हेने ध्यान करीत असतांनाच शिवभूतिमुनी केवली (सर्वज्ञ) होऊन मोक्षाला गेले. ह्या गोष्टीवरून आपल्या हें ध्यानात आले असेल कीं, जैनधर्मामध्यें मनाच्या परिणामाला अतिशय प्राधान्य दिले आहे. चित्ताच्या परिणामांनीच आह्माला मोक्षहि मिळतो. व त्यानेच आह्मी नरकालाहि पण जातो. हिंदुधर्मांतील भगवद्गीतेमध्येंहि असेच ह्मटले आहे की -**मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः** । अर्थात् मनुष्याच्या बंधमोक्षाचे कारण मनच होय. 'मी नग्न आहे' असें जोपर्यंत माणसाला वाटते, तसेच मी नग्न असल्यामुळे लोक मला बेंन्वाईट ह्मणतील असे जोपर्यंत तो जाणतो तोपर्यंत त्याला मोक्ष मिळत नाही. मोक्ष मिळण्याला हा विचारच मनांतून समूळ निघून गेला पाहिजे. बायबलमधील आदाम आणि ईव्ह याना स्वर्गातून खाली इहलोकीं यावे लागले अशी जी सुप्रसिद्ध गोष्ट आहे त्यावरून देखील हेच तत्व शाबित होते. ईश्वराने अगदी पहिलें जे मानवमिथुन निर्मिले त्याचे नाव आदाम व ईव्ह. आदम आणि इव्ह हे दोघेजण नग्न आणि पवित्र होते. ते एडन येथील उद्यानामध्ये संपूर्ण सुखाचा अनुभव घेत होते.

तसेच चांगले आणि वाईट काय आहे या गोष्टींसंबधानेंहि ते अनभिज्ञ होते. त्यांचा शत्रु जो सेटन त्याला ह्या दोघांच्या सुखामध्ये विघ्न आणावे अशी इच्छा उत्पन्न झाली. सेटन हा बायबलातला दुरात्मा होय. हा दुरात्मा पृथ्वीवर येऊन Eden ह्मणजे आदन बागांत किंवा पृथ्वी-वरच्या नदनवनात शिरतो. व तेथें सर्पाचें रूप धारण करून ईव्हचा बुद्धिभेद करितो. ह्या ईव्हला फसवून तिच्याकडून सेटन हा ईश्वराने निषिद्ध ठरविलेल्या झाडाचे फळ तोडवितो. पुढें ती ते फळ आपल्या पतीलाहि देते. चांगले आणि वाईट यांतील भेद दाखविणारा जो ज्ञानवृक्ष होता त्याचे फळ त्या दोघानीहि खाल्यामुळे (अर्थात् ईश्वराच्या आज्ञेचा भग केल्यामुळे) एकदम त्यांना आपल्या नग्नावस्थेचे ज्ञान झाले. त्याचा परि-णाम असा झाला की ते स्वर्गातून पतित झाले. ईश्वर त्याना त्या नंदनवनातून हाकलून देतो. ती पॅराडाइसला मुकतात. साराश, चागले आणि वाईट यामधील **भेदज्ञानामुळें** व तसेंच **नग्नावस्थेच्या भाव-नेमुळें** ( ज्ञानामुळे ) आदम आणि इव्ह या दोघाना त्या नदनवनांतून ( स्वर्गातून ) इहलोकी यावे लागले. जैनलोकहि हेंच ह्मणतात. कीं चागले आणि वाईट याचे ज्ञान, तसेच नग्नावस्थेचा विचार (ज्ञान), हेंच आह्माला मोक्षाला जाण्याला आडवे येतात. मुक्तिपदाकरितां आह्मी नग्नावस्थेची भावना विसरली पाहिजे. जैनांतील निर्ग्रंथ हे चागल्या-तील आणि वाईटांतील सर्व भेदभाव विसरून जातात. मग त्याना आपली नग्नावस्था झाकण्याकरिता वस्त्रांची काय आवश्यकता आहे ? आत्मारूपी उद्यानामध्यें अनतसुखाचा अनुभव घेत जैननिर्ग्रंथांनी नग्न व पवित्र का असू नये ? व चागले आणि वाईट यांचें व नग्नावस्थेचें ज्ञान झाल्यामुळें त्यानी आपल्या शाश्वत व अविनाशी सुखामध्यें खड पाडून पुन: या ससारांत परिभ्रमण करावे काय ? हिंदुशास्त्रामध्यें देखील दिगबरपणाला काहीं कमी महत्व दिले नाही. परिक्षितीच्या सभेमध्ये जेव्हा शुकाचार्यांचे आगमन झाले तेव्हा हजारो मोठमोठे ऋषी व खुद्द शुकाचार्यांचे पिता व पितामह हे सर्व आदरसत्कारार्थ उभे राहिले. हे

शुकाचार्य दिगंबर होते. शिव व तसेच विष्णु हेहि दिगंबर होते.

**दत्तात्रयो महायोगी योगीशश्चामरः प्रभुः ।**
**मुनिर्दिगम्बरो बालो मायामुक्तो यदापरः ॥**

—( **दत्तात्रयसहस्रनाम पृष्ठ २१४.** )

**अर्थः**—महायोगी, योगीश, अमर, प्रभु, मुनि, दिगम्बर, बाल, मायामुक्त, यदापर हीं दत्तात्रयाचीं नावे आहेत. अवधूताचा पथ हा दिगम्बर अथवा जातरूपच होता. विष्णूच्या चोवीस अवतारातले ऋषभ जे जैनधर्माचे संस्थापक होते हेहि दिगम्बरच होते.—

**एवमनुशास्यात्मजान् स्वयमनुशिष्टानपि लोकानुशासनार्थं महानुभावः परमसुहृद् भगवानृषभोपदेश उपशमशीलानामुपरत-कर्मणाम् महामुनीनां भक्तिज्ञानवैराग्यलक्षणं पारमहंस्यधर्ममु-पशिक्षमाणः स्वतनयशतज्येष्ठं परमभागवतं भगवज्जनपरायणं भरतं धरणपालनायाभिषिच्य स्वयंभवनस्वोर्वरितशरीरमात्रपरि-ग्रह उन्मत्त इव गगनपरिधानः प्रकीर्णकेश आत्मन्यारोपिताहव-नीयो ब्रह्मावर्तात् प्रवव्राज ॥** –(**भागवत ५ अ. ५ श्लोक २८.**)

**अर्थः**—महाप्रभाववान्, सर्वांचे आवडते, संपूर्ण कर्मापासून विरक्त व अतिशय शीलवान् असे भगवान् ऋषभदेव, यानीं ह्याप्रमाणें आपल्या पुत्राला उपदेश करून त्या सर्वांपैकीं महाभाग्यवान्, भगवज्ज-नाची सेवा करण्यामध्ये तत्पर असा जो श्रीभरत त्याला पृथ्वीचा सां-भाळ करण्याकरिता राज्यतिलक दिला. व आपण महामुनींची भक्ति, ज्ञान आणि वैराग्य या लक्षणानीं युक्त असा जो परमहंसधर्म त्या ध-र्माची दीक्षा घेतली. संसारामध्ये केवळ शरीर हाच ज्याचा परिग्रह आहे असे होऊन, एखाद्या उन्मत्ताप्रमाणे ज्याचे केश विखरले आहेत असे दिगंबर होऊन, व आपले कर्तव्य काय आहे याचा विचार करून ब्रह्मावर्त ह्मणजे बिठूर देशातून संन्यास घेऊन निघाले. भर्तृ-हरी आपल्या **वैराग्यशतका**मध्ये शिव अर्थात् महादेव याची प्रार्थना करितो. तो ह्मणतो:—

**एकाकी निस्पृहः शान्तः पाणिपात्रो दिगम्बरः ।**
**कदा शम्भो भविष्यामि कर्मनिर्मूलने क्षमः ।।७२।।**

**अर्थः**—हे शंभो! असा दिवस केव्हां येईल की ज्या दिवशी मी एकटा, निस्पृह व शांत असा होऊन हस्त हेच ज्याचे पात्र आहे, व दिगबर होऊन सपूर्ण कर्माचा नाश करण्याला समर्थ होईन' ज्या लोकांच्या मनाला 'आपण नग्न आहोंत' अशी भावना सुद्धा शिवत नाहीं त्यांना नग्नता ह्मणजे नग्नता नव्हे ! हिदुशास्त्रामध्ये अशी एक गोष्ट आहे.—एका सरोवरामध्ये काही नग्न स्त्रिया स्नान करीत होत्या. शुकाचार्य त्याच्या जवळूनच गेले, परतु त्या स्त्रियांनी आपली नग्नावस्था झाकली नाही. पुढे जेव्हां व्यास त्या मार्गाने जाऊ लागले तेव्हा ताबडतोब त्या स्त्रियांनी आपली नग्नता झाकली. व्यासांनी त्या स्त्रियांना 'असे का' ह्मणून विचारले. त्यावर त्या स्त्रियांनी उत्तर दिले कीं, व्यास नग्नतेला पाहतात व जाणतात, परतु शुकाचार्यांना ते कांहीं कळत नाही. व्यासाचे नेत्र त्याच्या नग्नावस्थेला पाहतात अर्थात् व्यासाच्या डोळ्याला त्याची नग्नावस्था दिसते. परतु शुकाला दिसत नाही. व्यास आपल्या सभोवतालच्या सर्व वस्तूकडे पाहतात. परतु शुक पहात नाहींत. तसेच हिदुशास्त्रामध्ये दुसरी एक अशीच गोष्ट आहे.—हनुमान जेव्हां लकेमध्यें रामाचे दूत (गुप्तचर) ह्मणून गेले तेव्हां त्याला रावणाच्या महालामध्यें रात्रीच्या वेळी काही नग्न अशा निजलेल्या स्त्रिया दिसल्या. त्याला पहिल्याने असे वाटले कीं, 'मी महापाप केलें' परतु विचाराच्या दुसऱ्या लाटेबरोबर त्याला वाटले कीं, 'छे! मी निरपराधी आहे. कारण की मी पवित्र आहे, आणि ह्मणूनच नग्न असणे अथवा नसणे ह्या दोन्ही गोष्टी मला सारख्याच आहेत.' वरील दोन्ही गोष्टी **जैनधर्मातील दिगंबरपणाचें पुष्टीकरण करितात.** ज्या लोकांची दृष्टि मुनींच्या नग्नावस्थेकडे वळते, अथवा जे लोक मुनि वस्त्र परिधान करीत नाहीत, तसेच त्याना चागले आणि वाईट यामधील भेदभाव कळत नाही ह्मणून त्याना दूषण देतात ते लोक खरोखर विलक्षण असले

पाहिजेत. आपली दृष्टि मुनींच्या गुणांवर असली पाहिजे. आपणाला त्यांच्या नग्नावस्थेशीं काय करावयाचें आहे? 'राजा रणजितसिंग एक डोळ्याने आंधळा आहे काय?' ह्मणून एकाने प्रश्न विचारिला असता रणजितसिंगाच्या मुख्य प्रधानाने उत्तर दिले, 'मला ही गोष्ट माहीत नाही' यावर त्या माणसाने पुनः विचारिले, 'ह्याचे कारण काय?' त्यावर मुख्य प्रधानाने अतिशय मार्मिकपणाचे, समर्पक व चुरचुरीत असें उत्तर दिले. "महाराजाच्या तोंडाकडे पाहण्याची कोणाची छाती आहे? सर्वांचे नेत्र महाराजाच्या चरणारविंदाकडे लागले असतात. तर मग राजाला एक डोळा आहे किंवा दोन आहेत हे कळणे कसे शक्य आहे?" आमची दृष्टीहि सदासर्वकाळ मुनीच्या गुणावर असली पाहिजे. आपणाला त्यांच्या नग्नावस्थेशीं घेऊन काय करावयाचे आहे? आह्माला त्याच्या शरीराकडे पाहण्याचे काय प्रयोजन आहे? ह्यावरून दिगंबरपणाचे महत्व आपल्या ध्यानात आलें असेलच.

ह्यावरूनच जैनलोक नग्नमूर्तींची पूजा कां करितात ह्या गोष्टीचाहि उलगडा लागतो. कारण ज्या महात्म्यांच्या या मूर्ति आहेत ते महात्मे नग्न होते. ज्यावेळीं आह्मी देवालयात पाऊल ठेवितो त्यावेळी आह्मी त्या मूर्तीच्या शरीराकडे केव्हांहि पाहत नाहीं. आमचे लक्ष्य त्यांच्या ध्यानाकडे जातें. आह्मी असा विचार करतो "आह्मालाहि ज्या महात्म्याच्या या मूर्ति आहेत त्या तीर्थंकराप्रमाणे झाले पाहिजे. त्या तीर्थंकराच्या मूर्ति ज्याप्रमाणे आत्मध्यानामध्यें तल्लीन झाल्या आहेत. त्याप्रमाणे आह्मीहि आत्मध्यानामध्ये तल्लीन व्हावयास पाहिजे." असे विचार मंदिरामध्ये पाय ठेवल्याबरोबर आमच्या मनात येतात. सारांश आमचें लक्ष्य मूर्तीच्या ध्यानाकडे असते. कायेकडे नसते. आपण आमच्या मूर्ति पहा. आपणाला आमच्या मूर्ति आत्मध्यानामध्ये तल्लीन होऊन गेल्या आहेत, त्यामध्ये त्यांची एकतानता झाली आहे. तत्त्वरूपी झाल्या आहेत असेच दिसून येईल. आह्मी त्या ध्यानाची पूजा करितो. त्या ध्यानाची आह्माला आठवण व्हावी ह्मणूनच आह्मी

मूर्तींची पूजा करितो. आह्मा जैनांमध्ये वस्तुतः मूर्तिपूजा नाही, तर मानसिक पूजा आहे. आपल्या प्रेमपात्राची आठवण व्हावी. ह्मणून ज्याप्रमाणें प्रेमीजन आपल्या जवळ मुद्रिका ठेवितात त्याप्रमाणे ह्या मूर्ति केवळ आह्माला आमच्या इष्टदेवतेचे स्मरण करून देतात. आह्मी हा पाषाण आहे असे समजून त्या प्रतिमेला केव्हाहि नमस्कार करीत नाहीं. पाषाण हें आमचे आराध्यदैवत नव्हे. आणि ह्मणूनच आह्मी पाषाणाची पूजा करीत नसून फक्त त्या मूर्तीच्या सहाय्याने आमच्या इष्टदेवतेची पूजा करितो. आह्मी ह्या पाषाणाच्या मूर्तींची जी काही भक्ति करितो त्याचे कारण असे आहे की, ह्या मूर्ति ह्मणजे आमच्या आराध्य देवतेच्या प्रतिनिधि होत. ह्या मूर्ति तीर्थकरांच्या असतात. ज्या महात्म्यानी परमवैराग्य धारण करून एका ध्यानाच्या योगाने उन्नतीचा मार्ग शोधून काढिला, व जे सम्यग्दर्शनज्ञानचारित्र या रत्नत्रयींच्या योगाने कर्मबंधाचा नाश करून आत्मस्वरूपास जाऊन पोंहचले अर्थात् जन्म-मरणापासून मुक्त झाले त्याच्या ध्यानाची मुद्रा आपणांस पाहवयास मिळावी, व त्यांच्यासारखे पवित्र आचरण ठेवण्याची प्रेरणा आपणास व्हावी एतदर्थ आह्मी **ह्या मूर्तींची पूजा करितों.** व तसे करणे अव-श्यहि पण आहे. आणि आह्मी आमच्या इष्टदेवतेची भक्ति का करू नये ? कारण ह्याना चागले आणि वाईट यामधील भेदभाव दिसत नाहीं. ह्यानीं आपल्या नग्नावस्थेला विसरून जाऊन मोक्षसुखाची प्राप्ति करून घेतली. व त्यानी त्यांच्या पश्चात् त्यांचे उदाहरण आप-णाला मार्गदर्शक (कित्ता) ह्मणून आपलें वळण आमच्या समोर ठेविले आहे. ह्मणून हा कित्ता गिरवून आह्मीहि आपल्या जीवाचे त्याच्या-सारखें सार्थक करून लॉंगफेलोच्या ह्मणण्याची सत्यता दाखवावी.

> " Lives of great man all remind us
> We can make our lives sublime.
> And departing leave behind us
> Footprints on the sands of time!"

महान् पुरुषांच्या आयुष्यक्रमावरून आह्माला ह्या गोष्टीची आठवण होते कीं, आह्मालाहि आमचें आयुष्य उत्कृष्ट रीतीने नेतां येऊन आमच्या जीविताचें सार्थक्य करितां येईल, आणि हे महात्मे परलोकवासी झाल्यावर आपल्या पाठीमागें काळरूपी वालुकेवर आपलें पादचिन्ह ठेवून जातात. आमचा उद्धार करणाऱ्या नग्न तीर्थकरांच्या मूर्तीची पूजा आह्मी आपल्या आत्मिक उन्नतीकरिता केली तर त्यात काय हानि आहे? कारण ह्या मूर्तीमध्ये आमच्या आराध्यदेवतेचे ध्यान दाखविलेले असते व आह्माला प्रत्यहीं सकाळीं आमच्या इष्ट देवतेचे स्मरण होण्याला ह्याच मूर्ति कारणीभूत होतात. जैनलोक नग्न मूर्तीची पूजा का करितात ह्मणून प्रश्न विचारणारे जे लोक आहेत त्याना हे उत्तर पुरेसें आहे असे आह्माला वाटते. 'आमच्या मूर्ति नग्न आहेत, आमचे मुनि नग्न असतात.' ह्या गोष्टी सुद्धा आह्मा जैनाच्या प्राचीनतेला पुष्टीच देणाऱ्या आहेत हीहि गोष्ट आपण ध्यानात ठेविली पाहिजे. ज्यावेळीं मानवजात अगदी बाल्यावस्थेमध्ये होती, लोक पवित्र व निरपराधी अर्भकाप्रमाणे नग्न राहत होते, व ज्यावेळी आपण आपल्या मुलावर ज्याप्रमाणे प्रीति करितो त्याप्रमाणे लोक एकमेकावर नग्न असूनहि प्रीति करीत होते अशा अत्यत प्राचीनकाळी जैनधर्म प्रचलित होता. जैनधर्म ज्याकाळी अस्तित्वात आला त्याकाळीं 'नग्नावस्था' ह्मणजे काय चीज आहे याची कल्पना सुद्धा मानवजातीला झाली नव्हती. येथपर्यंत जैनाच्या मूर्ति व साधु नग्न का असतात याचें विवेचन केले. आतां जैनमताचा प्राण अथवा सर्वस्वभूत अशा सप्तभगीनयाचे सक्षेपत. स्वरूप सांगतों. जैनधर्मातील हा सप्तभगीनय अतिशय महत्वाचा आहे.

## सप्तभंगीनय.

सप्तभग ह्मणजे सात वाक्यांचा समूह. "**प्रश्नवशादेकस्मिन्वस्तुन्यविरोधेनविधिप्रतिषेध विकल्पना सप्तभंगी**" ह्मणजे प्रश्नवशात् कोणत्या तरी एका वस्तूमध्ये विरोध न येतां विधिप्रतिषेधाची कल्पना करणें असे सप्तभगीचे लक्षण पूर्वाचार्यांनी सागितले आहे.

**स्यादस्ति नास्त्युभयमवक्तव्यं पुनश्च तत्रितयम् ।**
**द्रव्यं खलु सप्तभङ्गमादेशवशेन सम्भवति ॥१४॥**

—( पंचास्तिकायसमयसार. )

**अर्थः**—द्रव्य हें एका अपेक्षेने अस्तित्वयुक्त आहे. दुसऱ्या अपेक्षेनें नास्तित्वयुक्त आहे. एका अपेक्षेने अस्तित्व व नास्तित्व ह्या दोहींनीं युक्त असे आहे. एका अपेक्षेने अवक्तव्य ( सांगता न येण्यासारखें ) आहे. हे चार प्रकार आणि पुनः पहिलेच तीन प्रकार (आहे असे ह्मणतां येत नाही असे आहे; नाही असे ह्मणतां येत नाही असे आहे, व आहे नाही हे दोन्हीही ह्मणता येत नाही असे आहे हे तीन प्रकार ) असे सात प्रकार एका द्रव्याविषयींच बोलताना निरनिराळ्या अपेक्षेमुळे होतात. ह्याप्रमाणे सर्व वस्तूविषयी समजावें. याप्रमाणे सर्व पदार्थांचे सात भेद होतात. ह्या गाथेत वक्त्याच्या निरनिराळ्या अपेक्षेमुळें द्रव्याविषयींच्या बोलण्यात होत असलेले सात प्रकार सांगितले आहेत. ते असे:-

**१ स्यादस्ति द्रव्यं**—कांहीं एका अपेक्षेने द्रव्य अस्तिरूप आहे.

**२ स्यान्नास्ति द्रव्यं**—दुसऱ्या अपेक्षेनें नास्तिरूप आहे. प्रथम भगांत अस्तित्व धर्माचा प्रयोग आहे ह्मणून त्याठिकाणीं तो धर्म प्रधान आहे पण इतर नास्तित्वादि धर्म गौण आहेत. तसेंच दुसऱ्या भंगामध्ये नास्तित्व धर्म प्रधान आहेत पण इतर दुसरे धर्म गौण आहेत. याचप्रमाणे सर्व भगांत जाणावें. यावरून सर्व भगाचे प्रयोग सार्थ आहेत. आतां तिसऱ्या भगाकडे वळू.

**३ स्यादस्ति च नास्ति च द्रव्यं**—तसेंच काही अपेक्षेने द्रव्य अस्ति व नास्ति असे उभयरूप आहे.

**४ स्यादवक्तव्यं द्रव्यं**—जेव्हा तुह्माला एक वस्तु एकाच वेळीं त्याच अपेक्षेने आहे व नाही असे वाटेल, तेव्हां बोलतां येण्यासारखी नाही असे ह्मणाल ह्मणजे कांही एका अपेक्षेने द्रव्य ज्याच्याबद्दल काहीच सांगतां येत नाही असे आहे.

**५ स्यादस्ति चावक्तव्यं च**–काहीं अपेक्षेने वस्तूचें अस्तित्व सांगतां येणे शक्य नसेल तेथे कथंचित् अस्तित्व सांगता येण्यासारखे नाही असे ह्मणाल, ह्मणजे एका अपेक्षेने द्रव्य अस्तिरूप आहे पण सांगतां येत नाही असे आहे असे ह्मणाल.

**६ स्यान्नास्ति चावक्तव्यं च**— वस्तूचे नास्तित्व सांगतां येण्याजोगे नसेल तेथे कथंचित् वस्तूचें नास्तित्व सांगता येण्यासारखे नाही असे ह्मणाल, अर्थात् एका अपेक्षेनें द्रव्य नास्तिरूप आहे पण सांगता येत नाही असे आहे असे ह्मणाल.

**७ स्यादस्ति च नास्ति चावक्तव्यं च**--जेथें वस्तूचें अस्तित्व व नास्तित्व दोन्हीं सांगता येण्याजोगीं नसतील तेथे दोन्ही सांगतां येण्यासारखीं नाहीत असेच ह्मणाल, अर्थात् एका अपेक्षेने द्रव्य अस्ति-नास्ति उभयरूप आहे पण सांगता येत नाही असे आहे असेच ह्मणाल. ह्याप्रमाणे द्रव्यासंबंधी बोलण्याचे सात प्रकार झाले. हे प्रकार निरनिराळ्या अपेक्षेने प्राप्त होतात. ह्या सात प्रकारच्या नयाने असे समजावयाचे की, एक वस्तु प्रत्येक ठिकाणी, सर्वकाळी, सर्व पद्धतीत, आणि प्रत्येकाच्या आकाराने आहे असे मानू नये. ती वस्तु एक जागीं असू शकेल परंतु दुसऱ्या जागीं नसेल, एकेवेळीं असेल परंतु दुसऱ्यावेळीं नसेल, इत्यादि. ह्यावरून काही विद्वानांची अशी समजूत झाली आहे की, ह्यामध्ये खरें एकहि नाहीं. अथवा आपणास फक्त संभवनीय अमुक ह्मणूनच घेऊन चालावें लागेल तर तसें नाही. प्रत्येक ह्मणणें जें वेगवेगळ्या स्थितीमध्ये व वेगवेगळ्या वेळेला वगैरे अनुलक्षून खरें आहे तें त्या अपेक्षेने खरेंच आहे. हाच ह्यांतील सारांश आहे. ह्याच्यायोगाने द्रव्यसामान्य–किंवा सामान्यपणें द्रव्याचें–विवेचन होतें.

वरील विवेचनांत ' स्यात् ' असा शब्द आहे तो 'द्रव्य सर्वथा अमुक प्रकारचें आहे असे ह्मणता येत नाही' एवढ्या अर्थाचा द्योतक आहे. अर्थात् 'स्यात्' हा शब्द अनेकांतार्थकाचा द्योतक आहे. 'स्यात्' ह्या शब्दाचा शास्त्रकारानी हा जो अर्थ केला आहे तो योग्यच आहे.

कारण द्रव्य हें अनंतधर्मसमुदायात्मक असल्याने तें अमुक एक प्रकारचें आहे असें ह्मणणे योग्य नाही. तर त्याच्या अनेक प्रकारापैकीं हा एक प्रकार द्रव्यासंबधाने संभवनीय आहे इतकेच ह्मणणे योग्य आहे. आणि हें दाखविण्याकरितांच प्रथम ' स्यात् ' ह्या शब्दाचा प्रयोग प्रत्येक प्रकारांत केला आहे. आता हे सात प्रकार द्रव्याचे ठिकाणी कसे संभवतात ह्याचें थोडें दिग्दर्शन करू.

'**स्यादस्ति**' हा पहिला प्रकार आहे. ह्यानें द्रव्य एका अपेक्षेने अस्तिरूप आहे असे सांगितले आहे. ही अस्तिरूपता द्रव्याला स्वकीयचतुष्टयीच्या अपेक्षेने येते. स्वकीयचतुष्टय ह्मणजे १ आपले द्रव्य, २ आपले क्षेत्र, ३ आपला काल, ४ आणि आपला भाव अर्थात पर्याय ह्याला स्वकीयचतुष्टय किंवा स्वरूपचतुष्टय असे ह्मणतात. तेव्हां ह्या स्वकीयचतुष्टयाच्या अपेक्षेने केव्हांहि कोणतेहि द्रव्य अस्तिरूपच असणारे आहे. ह्मणजे स्वकीयचतुष्टयाच्या अपेक्षेने जर द्रव्याविषयीं निरूपण करावयाचे झाले तर त्यात द्रव्याचें अस्तिरूपच दिसणारे आहे.

"**स्यान्नास्ति द्रव्यं**" हा दुसरा प्रकार आहे. हा प्रकार परकीय चतुष्टयाच्या अपेक्षेने संभवतो. परद्रव्य, परक्षेत्र, परकाल, व परभाव ह्याना परकीयचतुष्टय किंवा पररूपचतुष्टय असे ह्मणतात. तेव्हां हें जें परकीयचतुष्टय त्याच्या अपेक्षेने केव्हांहि कोणतेहि द्रव्य 'नाहीं' ह्या रूपानेच असणारे आहे.

"**स्यादस्ति च नास्ति च द्रव्यं**" हा तिसरा प्रकार आहे. ह्यांत स्वकीयचतुष्टय आणि परकीयचतुष्टय ह्या दोहोंचा एकाच अपेक्षेच्या क्रमाने उपयोग केला आहे. ह्मणून द्रव्य आहे आणि नाहीं ह्या दोन्ही स्वरूपाचे आहे असे ह्या प्रकारांत दाखविले आहे.

"**स्यादवक्तव्यं द्रव्यं**" हा चौथा प्रकार आहे. ह्या प्रकारांत स्वकीयचतुष्टय आणि परकीयचतुष्टय ह्याचा उपयोग तिसऱ्या प्रकाराप्रमाणें क्रमाने न करिता एकदम केला आहे. तेव्हा स्वकीयचतुष्टय आणि परकीयचतुष्टय ह्या दोहोंचा जर एकदम उपयोग केला तर द्रव्या-

संबधाने कांहींच बोलता यावयाचे नाहीं. उदाहरण—जिनदत्ताचा पुत्र यज्ञदत्त आहे; आणि यज्ञदत्ताचा पुत्र देवदत्त आहे. ह्यांत मधला जो यज्ञदत्त ह्याच्यासंबधाने गोष्ट चालली असता जर कोणी यज्ञदत्त देवदत्ताचा कोण आहे? असे विचारील तर त्यास 'पिता' हे उत्तर देतां येईल. तसेच यज्ञदत्त हा जिनदत्ताचा कोण आहे? असे जर कोणी विचारील, तर त्यास ' पुत्र ' हें उत्तर देतां येईल. तसेंच जिनदत्त आणि देवदत्त ह्याचा यज्ञदत्त हा क्रमाने कोण आहे? असें विचारल्यास 'पुत्रपिता' असेहि उत्तर देता येण्यासारखें आहे. परतु जिनदत्त आणि देवदत्त ह्या दोघाचा यज्ञदत्त हा एकदम कोण होतो? ह्मणजे दोघांचे यज्ञदत्ताशी एकच नाते कोणतें? असें जर कोणी विचारिलें, तर ह्याचें उत्तर देता यावयाचें नाही. कारण, पूर्वीच्याप्रमाणें ' पुत्रपिता' असे जरी सागितले, तथापि ते शब्द जोड असल्याने दोघाचें मिळून एक नातें सांगितलें असे होत नाही. ह्मणून दोघांचे यज्ञदत्ताशीं एक नाते कोणते? असे विचारल्यास काही सांगता येणार नाही. ह्याकरिता, 'अवक्तव्य' आहे, असेच ह्मटलें पाहिजे. त्याप्रमाणे स्वकीयचतुष्टय आणि परकीयचतुष्टय या दोहोचा एकदम उपयोग केला असता द्रव्याबद्दल काहीच बोलता येणार नाही. ह्मणून 'अवक्तव्य' आहे.

"**स्यादस्ति चावक्तव्यं**" हा पांचवा प्रकार आहे. ह्यांत स्वकीयचतुष्टय आणि स्वकीयपरकीयचतुष्टय ह्याचा क्रमानें उपयोग केला आहे. तेव्हां स्वकीयचतुष्टयाने द्रव्य अस्तिरूप आहे. आणि स्वकीयपरकीयचतुष्टयानें द्रव्य हे पूर्वीप्रमाणें अवक्तव्य आहे. ह्मणून, ' आहे आणि अवक्तव्य आहे' असा ह्याचा अर्थ होतो.

"**स्यान्नास्ति चावक्तव्यं च**" हा सहावा प्रकार आहे. ह्यांत परकीयचतुष्टय व स्वकीयपरकीयचतुष्टय ह्याचा क्रमानें उपयोग केला आहे. ह्मणून परकीयचतुष्टयाच्या संबधाने द्रव्य नास्तिरूप आहे, आणि स्वकीयपरकीयचतुष्टयाच्या संबधानें द्रव्य ' अवक्तव्य ' आहे असे ह्या प्रकारांत दाखविले.

"**स्यादस्ति नास्ति चावक्तव्यं**" हा सातवा प्रकार आहे. ह्यांत स्वकीयचतुष्टय व परकीयचतुष्टय ह्याचा एकदम क्रमाने उपयोग केला आहे. आणि एकदा एकदम उपयोग केला आहे. त्यामुळे पूर्वी-प्रमाणे, 'द्रव्य अस्तिनास्तिस्वरूप आहे आणि अवक्तव्य आहे' असा ह्याचा अर्थ होतो.

ह्या सात प्रकारानाच शास्त्रांत '**सप्तभंगी**' '**सप्तभंगीनय**' अशीं नांवे आहेत. हे सात प्रकार सभवत नाहीत असे जर कोणी ह्मणेल तर ते ह्मणणे योग्य नाही. कारण, प्रत्येक वस्तु स्वकीयचतु-ष्टयाच्या अपेक्षेने सत्तारूप आहे. परकीयचतुष्टयाच्या अपेक्षेनें शून्य-रूप आहे. क्रमानें स्वकीयचतुष्टय व परकीयचतुष्टय ह्याच्या अपेक्षेनें सत्तारूप आणि शून्यरूप अशी आहे. स्वकीयचतुष्टय आणि परकी-यचतुष्टय ह्या दोहोचा एकदम उपयोग करण्याच्या अपेक्षेनें अवक्तव्य आहे. ह्याप्रमाणे चार प्रकार तर सिद्धच आहेत. आतां पहिल्या तीन प्रकारांपैकीं एक एक घेऊन त्या प्रत्येकाच्या पुढे चवथा अवक्तव्य हा प्रकार जोडिला असतां आणखी तीन प्रकार होतात. ते असेः– १ सत्तारूप आहे आणि अवक्तव्य आहे. २ शून्यरूप आहे आणि अ-वक्तव्य आहे. ३ सत्ताशून्य उभयरूप आहे आणि अवक्तव्य आहे. ह्या पुढल्या तीन प्रकारांत पहिल्या तीन प्रकारांपैकीं प्रत्येकाची एक अपेक्षा आणि अवक्तव्य ह्या प्रकारची अपेक्षा मिळून जोडून एकच अपेक्षा होते ह्मणजे स्वकीयचतुष्टय आणि स्वकीयपरकीयचतुष्टय ह्या दोहोच्या अपेक्षेनें कोणतीहि वस्तु सत्तारूप आणि अवक्तव्य अशी आहे. स्वकीयचतुष्टय आणि स्वकीयपरकीयचतुष्टय ह्या दोहोच्या अपे-क्षेने कोणतीहि वस्तु शून्यरूप आणि अवक्तव्य अशी आहे. स्वकी-यचतुष्टय, परकीयचतुष्टय आणि स्वकीयपरकीयचतुष्टय ह्यांच्या अपेक्षेनें कोणतीहि वस्तु सत्तारूप, शून्यरूप आणि अवक्तव्यरूप आहे. असे अपेक्षेचे आणि वस्तूच्या स्वरूपाचे तीन प्रकार होतात.

अशा रीतीने जैनशास्त्रांमध्यें आचार्यांनी सप्तभंगीनयाचे स्वरूप

सांगितले आहे. आता ह्यासंबधानें शंकराचार्यांचे मत काय आहे, व तें कसे चुकीचे आहे, तसेच इतर विद्वानाचें मत काय आहे हे पाहू.

**शांकरभाष्यांत '** **नैकस्मिन्नसंभवात्** " या सूत्रावरचे भाष्य लिहिताना जैनमतातील अनेकांत स्याद्वादाचे खंडन केले आहे. ते अनेकांत स्याद्वादाचे स्वरूप शंकराचार्यास नीट न समजल्यामुळे व स्वपक्षाच्या अभिमानामुळेच झालेले दिसून येते. पूर्वाचार्यांनी अनेकांताचा विग्रह चार प्रकारानी केला आहे. " **अनेके अंताः धर्माः यस्मिन् भावे सोऽयमनेकांतः** " ह्मणजे ज्या पदार्थामध्ये अनेक धर्म असतात त्यास **अनेकांत** ह्मणतात. संसारांत जितके पदार्थ दिसून येतात ते सर्व **अनेकांतात्मक** आहेत. अनेकांत ह्मणजे एका वस्तूवर अनेक धर्म असणे. जसे-एकाच माणसाला कोणी बाबा, कोणी काका, कोणी मामा, कोणी सासरा, कोणी जावई अशा निरनिराळ्या संबधाने ओळखतो ते तितक्या वेगवेगळ्या अपेक्षेने ओळखतो. मुलाच्या अपेक्षेने बाबा, पुतण्याच्या अपेक्षेनें काका, भाच्याच्या अपेक्षेने मामा, जावयाच्या अपेक्षेने सासरा, व सासऱ्याच्या अपेक्षेने जावई असे त्याला ओळखता येते. अथवा एकाच माणसाला शहाणा ह्मणतो व त्यालाच अडाणीहि ह्मणतो. जेव्हा त्याच्यापेक्षा अधिक शहाण्या माणसाच्या अपेक्षेने बोलतो तेव्हा त्याला अडाणी ह्मणतो व त्याच्यापेक्षा अधिक अडाणी माणसाच्या अपेक्षेने त्याला शहाणा ह्मणतो. ह्मणून जरी हे धर्म परस्परविरुद्ध आहेत असे दिसते तरी वस्तुतः त्यांत विरोध नाही. कारण हे धर्म अपेक्षारहित नाहीत. याना अपेक्षा आहेत. व त्या वेगवेगळ्या आहेत. यामुळे कोठेच विरोध येत नाहीं. आणि वस्तूचे स्वरूपहि असेच आहे. याप्रमाणे संसारात जीवादि वगैरे सर्व पदार्थ आहेत ते सर्व अनेकांत स्वरूपाचे आहेत. स्वचतुष्टयापेक्षेने एक वस्तु कथंचित् 'सत्' आहे. आणि परचतुष्टयापेक्षेने तीच वस्तु कथंचित् 'असत्' आहे. सर्वथा 'सत्हि' नाही. आणि 'असत्हि' नाही. खुद्द **शंकराचार्यांनीमुद्धां** असा विरोध दूर करताना " **परमार्थतः** " व " **व्यवहारतः** "

ह्मणजे परमार्थदृष्टीने असे आहे व व्यवहारदृष्टीनें असे आहे असे सांगितलें आहे. उदाहरणार्थ—**भगवद्गीतेंतील** काहीं ठिकाणीं असलेला विरोध अशाच दृष्टीने दूर केला आहे

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ॥**
**न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १ ॥**
**नादत्ते कस्यचित्पापं न कस्य सुकृतं विभुः ॥**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः ॥ २ ॥**

**अर्थः**—परमेश्वर लोकाचे कर्तृत्व किंवा कर्में उत्पन्न करीत नाहीं. तसेच कर्माच्या फळाची योजनाहि करीत नाही. स्वभावानेच सर्व काहीं घडून येतें. परमेश्वर कोणाचें पापहि घेत नाही. व पुण्यहि घेत नाही. अज्ञानाचें ज्ञानावर आच्छादन पडल्यामुळें प्राणीमात्र मोहात पडतात. ह्याच्याच विरोधी असा श्लोक गीतेत दुसरा आहे. तो असा.

**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।**
**भ्रामयन् सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥**

**अर्थः**—हे अर्जुना, परमेश्वर सर्व प्राण्यांच्या हृदयांत बसला आहे. आणि आपल्या अद्भुत करणीच्या ( मायेच्या ) योगानें सर्व प्राण्यांना सूत्रयंत्रामध्ये घालून नाचवीत आहे. ह्या दोन श्लोकांत मोठा विरोध आहे. एका ठिकाणी ईश्वर काही करीत नाही असें ह्मटलें आहे व दुसऱ्या ठिकाणीं ईश्वरच सर्व काही करतो असे ह्मटले आहे. अशा तऱ्हेच्या परस्पर विरोधी वाक्यांचा "परमार्थतः" " व्यवहारतः " अशा भिन्नभिन्न दृष्टीने विचार करूनच त्यांतील विरोध शंकराचार्यांनी दूर केला आहे. हल्लीं सुद्धा कोणत्याहि विषयाचा विचार करतांना नैतिकदृष्ट्या, राजकीयदृष्ट्या, आरोग्यदृष्ट्या, अर्थशास्त्रदृष्ट्या, व्यवहारदृष्टीनें परमार्थदृष्टीने असे वेगवेगळ्या दृष्टीने विचार करूनच आपण त्याचा निर्णय करतों. असेच तेंहि आहे. ह्या विषय **डॉक्टर रामकृष्ण गोपाळ भांडारकर एम्. ए.** यानी नीट समजून घेऊन डेक्कन कॉलेजांतील पुस्तकावर अभिप्राय देताना रिपोर्टात उल्लेख केला आहे तो असा.

There are two ways of looking at things one called Dravyaarthikanyaya (द्रव्यार्थिकनय) and the other Paryayarthikanaya (पर्यायार्थिकनय). The production of a jar is the production of some thing not previously existing if we take the latter point of view *i e.* as a Paryaya or modification, when it is not the production of some thing not previously existing, when we look at it from the former point of view *i. e.* as a Dravya or sutstance So when a soul becomes through his merits or demerits, a God, a man, or a denizen of hell, from the first point of view, the being is the same, but from the second, he is not the second *i. e.* different in each case. So that you can affirm or deny something of a thing at one and the same time This leads to the celebrated Saptabhangi-Naya (सप्तभंगिनय) or the seven modes of assertion ( 2 ) You can affirm existence of a thing from one point of view ( Syad asti ); deny it from onother (Syad nasti), and affirm both existence and nonexistence with reference to it at different times (Syad asti nasti). If you should think of affirming both existence and non existence at the same time from the same point of view you must say that thing cannot be spoken of ( Syad avaktavya ), similary under certain circumstances the affirmation of existence is not possible ( Syad asti avaktavya); of non existence ( Syad nasti avaktavya) and also of both (Syad asti nasti avaktavya). What is meant by these seven modes is that a thing should not be considered as existing every where, at all times in all ways and in the form of every thing. It may exist in one place and not in another, at one time & not at another, & &c It is not meant by these modes that there is no certainty or that we

have to deal with probabilities only, as some scholars have thought. All that is implied is that every assertion which is true is true only under certain conditions of space time & &c. This is the substance of the section which treats of Dravya Samanya or Dravya generelly."

**अर्थः**—पदार्थाचा विचार करण्याचे दोन मार्ग आहेत. एक **द्रव्यार्थिकनय** आणि दुसरा **पर्यायार्थिकनय**. मूळ पदार्थाचे बाहेरले स्वरूप पूर्वी नसलेले उत्पन्न होते त्याचा जेव्हा आपण पर्यायार्थिकनयानें विचार करतो तेव्हा त्याला पर्याय किंवा पलटणी असे ह्मणतो. पूर्वी नसलेलें व नवीनहि उत्पन्न झाले नाहीं त्याचा जेव्हां आपण द्रव्यार्थिकनयाने विचार करितो तेव्हा त्याला द्रव्य अथवा पदार्थ ह्मणतो. जसे, आत्मा जेव्हां त्याच्या पुण्यपापामुळे देव, मनुष्य आणि नरकवासी असतो, तेव्हा त्याला द्रव्यार्थिकनयाने तोच आत्मा असे ह्मणावयाचें आणि पर्यायार्थिकनयाने त्याच आत्म्याला देव, मनुष्य किंवा नारकी असे प्रत्येक स्थितीत वेगवेगळे ह्मणावयाचे. असेच एका वस्तूला एखादेवेळीं किंवा त्याचवेळी ती अमुक वस्तु आहे, असे तुह्मी ह्मणू शकाल, तसेच ती वस्तु नाही, असेहि ह्मणू शकाल. ह्याप्रमाणेंच सप्तभगीनयाने किंवा सात प्रकाराने वस्तुस्वरूप सागण्याचे धोरण आहे. दुसऱ्या पॅरिग्राफचे भाषातर विषयाचे विवेचन करिताना आलेच आहे तेव्हा तेच चर्वितचर्वण पुनः नको. अशा रीतीने स्याद्वाद अनेकांताविषयी डॉक्टर भाडारकरांचा अभिप्राय आहे. डॉक्टर भाडारकरांनी जैनधर्माचे बरेच ग्रथ वाचले आहेत असे वेगवेगळ्या ग्रथावर त्यानीं त्या क्याटलागामध्ये दिलेल्या अभिप्रायावरून दिसून येते. ह्याप्रमाणे जो जैनधर्माच्या पुस्तकाचे आपल्या मनाची समता कायम ठेवून विकारवश न होता परिशीलन करील त्याला त्यांतील यथार्थता भासल्याशिवाय राहणार नाही. असो. आता हें बरेच विस्तृत झालेलें सप्तभगीनयाचे विवेचन पुरे करतो.

## उपसंहार.

जैनधर्मादर्शातील दोन्ही भागांचा थोडासा उपसहार लिहून आतां हा ग्रंथ पुरा करतो. जगांतील अत्युत्तम व सर्वोत्कृष्ट धर्मांपैकी जैनधर्म हा एक आहे. जैनधर्म हा रागद्वेषादिविकारांनी मलीन झालेल्या आत्म्याचे रागद्वेषादिविकार नाहींसे करून त्याला वीतरागी, व परमानंदित करणारा आहे. हा जैनधर्म क्षणिकसुखापासून सोडवून अविनाशी, अनुपम, आत्मस्वभावी, व अतीन्द्रियसुख देणारा आहे. जैनधर्म हा आत्म्यामध्ये रागद्वेषादि विकार उत्पन्न होणे यालाच हिंसा समजतो. व जेथे रागद्वेषादिकाचा प्रादुर्भाव होत नाही त्यालाच 'अहिंसा' मानतो. कारण अशा स्थितीत वीतरागभावामुळे हिंसा घडावयाची नाहीच.

**अप्रादुर्भावः खलु रागादीनां भवत्यहिंसेति ।**
**तेषामेवोत्पत्तिर्हिंसेति जिनागमस्य संक्षेपः ॥**

जैनधर्मात 'अहिंसे' चे व हिंसेचे लक्षण आपल्या पुरुषार्थसिध्युपाय ग्रंथात अमृतचंद्रसूरी आचार्यांनी थोडक्यात असें सांगितले आहे. वुइल्सन कालेजमधील संस्कृत भाषेचे प्रोफेसर **एच्. एम्. भडकमकर बी. ए.** यानी ता. २ फेब्रुवारी १९१० रोजीं **'जैनधर्म'** या विषयावर एक सुंदर व्याख्यान दिले होतें. त्यात ते ह्मणाले, "जैनधर्म हा परमपवित्र, आत्मकल्याणकारी, व अहिंसा धर्माचा प्रचारक आहे." त्याच्या भाषणाचा वाचकाकरिता येथे थोडासा उतारा देतो.

"Jainism teaches that the *highest moral life* is the only sure means of the elevation of soul and its eventual emancipation and with it the central truth of morality lies in complete abstenance from injury to any one else.

It is a painful confession that the sacred animal sacrifice though it has to be allowed as being enjoined by the *Sruti*-the basis of all the superstructure of the Vedic faith, does in fact startle the heart of even the most faithful follower of the Vedas. This

effect, I believe could not have been brought about by the purely militant materialistic doctrine, but must have been the slow and silent effect of the steady self relying teachers who brought the wealth of their metaphysical thought to bear on all questions of humane life and constructed a doctrine which would satisfy all the yearnings of the humane soul."

याप्रमाणें प्रोफेसरसाहेब वेदप्रतिपादित हिंसेचा निषेध करितात. असो. जैनधर्माप्रमाणे, "अहिंसा परमोधर्मः" हे तत्व पूर्णपणे पाळणारे जगाच्या पाठीवर जितके धर्म होतील तितके थोडेच आहेत. प्रत्येक धर्माने बकरी, मेंढ्या, आदिकरून जी जनावरें आहेत व ज्यांच्या माना प्रत्यहीं मांसभक्षक लोकांकरिता करकर कापण्यांत येतात अशा प्राण्यांचा वध न होऊ देता बचाव केला पाहिजे. त्याप्रमाणेच कोणत्याहि धर्माच्या माणसाने गरीब बिचारीं हरणे, कोंबड्या आदि इतर कोणत्याहि पशुपक्षांची शिकार करू नये. तसेंच दसरा अथवा इतर कोणत्याहि सणाच्या वेळीं जीवांची हिंसा करण्याची प्रत्येक धर्मानें सक्त मनाई करून या मूक प्राण्यांना जीवदान द्यावें. किती ह्मशी आणि गाई यांची बलिदाने देण्याकरितां हिंसा होत असते!! ह्याप्रमाणेच ही हिंसा अशी जर चालू राहील व असेच ह्या निरपराधी प्राण्यांच्या माना जर कापल्या जातील तर जे आह्मी भारतवासी हिंदूलोक मांसापासून अलिप्त आहोत व ज्यांची शक्ति मुख्यतः दूध, व तूप यांवर अवलंबून आहे ते आह्मी थोड्याच अवधीत निरसत्व, निर्बल, निर्वीर्य होऊ यांत मुळींच संदेह नाहीं. पहा, सध्या दुध व तूप किती महाग आहे. आणि तें पूर्वी किती स्वस्त होते! तर मग ही जीवहिंसा आपण बंद केली पाहिजे व आपण गरीब बिचाऱ्या जनावराचा पक्ष उचलून धरला पाहिजे. ह्या गरीब प्राण्यावर दया करा. आमच्या या हिंदुस्थानदेशात सार्वजनिक रीतीने जो असंख्यात प्राणीमात्रांचा वध प्रतिदिवशीं करण्यात येतो तो पाहून व ऐकून कोणाहि सहृदय माणसास किळस येऊन दुःख झाल्याविना राहणार नाहीं! आज जितक्या बकरीं, मेंढरे, अथवा

गायी आपणाला दिसतात तितक्या उद्यां ह्या पृथ्वीतलावर दिसत नाहींत. तीं जनावरें कोठें जातात? मांस भक्षण करणाऱ्या लोकांकरितां त्या प्राण्यांचा वध केला जातो! ह्यांच्या भक्ष्याकरिता त्यांना आपल्या प्राणास मुकावें लागते! प्राण हा सर्वांना अतिशय प्यारा आहे. **दुर्बळांचा प्रबळानें घात करणें, किंवा पिडितांवर अनुकंपा न करणें हें कांहीं मानवजातीचें ब्रीद नव्हें हें ध्यानांत ठेवा.** मृत्यूच्या वेळीं सर्वांना दुःख होते ही गोष्ट त्या निर्घृण मांसभक्षकांनीं विसरू नये. त्यांनी सहृदय होऊन दयेचे महत्व ध्यानात आणावे. असे ह्मटले आहेः—

**दयामूलो भवेद्धर्मो दया प्राण्यनुकम्पनम् ।**
**दयायाः परिरक्षार्थं गुणाः शेषाः प्रकीर्तिताः ॥**

**—( महापुराण. पर्व. ५ श्लोक २१ )**

**अर्थः**—दया हें धर्माचे मूळ आहे. ह्मणजे सर्व जीवांवर दया करणे यालाच धर्म ह्मणतात. प्राणिमात्रावर कृपा करणे याचें नांव दया. दयेच्या रक्षणाकरितांच इतर सर्व गुण (चारित्र पाळणें, क्षमाभाव वगैरे धरणे) सांगितले अहेत.

**धर्मस्य तस्य लिङ्गानि दमः क्षान्तिरहिंस्रता ।**
**तपो दानं च शीलं च योगो वैराग्यमेवच ॥ २२ ॥**

**अर्थः**—इद्रियदमन करणे, क्षमाभाव धरणे, हिंसा न करणे, तप करणें, दान देणें, शील पाळणे, योग धारण करणें (ध्यान करणें) आणि ससारसुखापासून विरक्त होणे, ही सगळीं त्या **अहिंसाधर्माचीं** चिन्हे आहेत. ह्मणून मी ह्मणतो जर आमच्यामध्ये करुणा असेल तर आह्मी गरीब बिचाऱ्या पशुपक्षांचाच पक्ष उचलला पाहिजे. इग्लड देशामध्यें देखील ए, एफ्, हिल्स साहेब, डी. एल् ( A. F. Hiles Eq D L ) आणि प्रोफेसर मेयर, डॉक्टर जोशिया ओल्डफिल्डादि सद्गृहस्थ हीच चळवळ करीत आहेत. त्यांच्या चळवळीचा मुख्य उद्देश प्राणिहिंसा होऊं नये व लोकांमध्यें वनस्पत्याहाराचा प्रसार करावा हाच आहे. मांसाहार वर्ज करण्याविषयीं ख्रिस्तीशास्त्रांत आधार

आहे. मुक्तिफोजेचा मुख्य जनरल बुथ ह्यानें मांसाहाराचा त्याग केला आहे व तो आपल्या शिष्यवर्गाला मासाशन करूं नये असा उपदेश करीत आहे. यूरोप आणि अमेरिका खडांत जागोजागी मांसाहार वर्ज करणाऱ्या मडळ्या स्थापन झाल्या आहेत. स्वामी विवेकानदप्रभृति अमेरिका इग्लड वगैरे देशात जाऊन हाच प्रयत्न करीत आहेत. हे महात्मे आरोग्यदृष्ट्या, अर्थशास्त्रदृष्ट्या, नीतिशास्त्रदृष्ट्या व धर्मशास्त्रदृष्ट्या मासाहार वर्ज करण्याचा उपदेश करीत आहेत. हिंसेची मनाई जैनधर्मांतच आहे असें नाही तर जगांतील प्रत्येक धर्माने मांसाहाराचा निषेधच केला आहे. पारशी, मुसलमान व ख्रिश्चियन ह्याच्या पुस्तकातून हिंसा, मांसाहार व मद्यपान हे त्याग करण्याचे आधार सांपडतात. पारशी-धर्मपुस्तक शाहनामाचा कर्त्ता फेरदोसी लिहितो —

**नीस्तझन्द खुरो ने जानवर जु ॥**
**चनीन अस्त दीने झरदुस्तनेकु ॥ १ ॥**

**अर्थः**—महमदपैगबराचा जावई अल्ली हा मास खाण्यास मनाई करीत असे. अकबर बादशहा देखील दर शुक्रवारीं, रविवारीं, ग्रहणाच्या दिवशी व सगळा फरवरदिन महिना मास खात नसे. खुद्द महमद पैगबराने देखील मक्काशहरांत कयाबापुढे कोणत्याहि प्राण्याचा वध करू नये असा सक्त हुकूम केला आहे. हल्ली सुद्धा एक मुसलमान 'सालेकशरयत' मधून 'तरीकत' मध्यें गेला ह्मणजे मास खाण्याचे सोडून देतो. खिस्तधर्मांतहि "Dont kill" ह्मणजे हत्या करू नको अशी स्पष्ट आज्ञा आहे. मांसाहार वर्ज करण्याविषयीहि ख्रिस्ती-शास्त्रात ह्मटले आहे. येशूच्या उपदेशांतहि दयेचाच अश गोविला आहे.

Behold, I have given you every herb bearing seed, which is upon the face of all the earth, and every tree in which is the fruit of a tree yielding seed; to you it shall be for meat.

( Genesis chap I 29. )

**अर्थः**—पहा, अखिल पृथ्वीच्या पाठीवर धान्य उत्पन्न कर-

णारी प्रत्येक वनस्पति आणि फळें उत्पन्न करणारें प्रत्येक झाड हीं मी तुला दिली आहेत. हीं धान्ये, फळे तुला मांसाच्या ऐवजीच आहेत.

While the flesh was yet between their teeth, ere it was chewed, the wrath of the Lord was kindled against the people and the Lord smote the people with a very great plague.

( See verse 33 and also verses 19 and 20 )

**अर्थः**—मास दातामध्ये चावीत आहेत इतक्यात परमेश्वराचा कोप लोकावर प्रज्वलित झाला. आणि मोठी भयकर रोगाची साथ आणून परमेश्वराने लोकांस पीडा केली.

( पहा. न. ११–१९–२० ओवी **३१** ).

हिंदूंच्या महाभारत आदि ग्रथांमध्ये ह्मटले आहे:—

**सर्व जीव दयार्थं तु येन हिंसंति प्राणिनम् ।**
**निश्चितं धर्मसंयुक्तास्ते नरा स्वर्गगामिनः ॥**

अर्थात् सर्व जीवांच्या दयेकरिता जे कोणी हिंसा करणार नाहीत ते निश्चयाने अहिंसाधर्माने स्वर्गास जातात. याच प्रकारचे अहिंसा-धर्माबद्दलचे वर्णन बऱ्याच ग्रथांत आढळून येते. उपदेशरत्नमालेत ह्मटले आहे— कित्येक करूनी जीववधकर्म । ह्मणती हाच आमचा धर्म ॥ न कळे शुभाशुभवर्म । तेणेच दुःख भोगिती ॥ १ ॥ अशाच तऱ्हेचें हिंसेचे निषेधात्मक वर्णन प्रत्येक धर्मग्रथात आढळून येते. 'अहिंसालक्षणो धर्मो ह्यधर्म प्राणीना वध.' असें भागवतात लिहिले आहे. **श्रीगौतमबुद्धांनीं** आपल्या **पिनयपीटका**मध्ये जें ह्मटले आहे त्यामध्यें सुद्धा अहिंसेचे तत्व चागल्या रीतीने गोविले आहे हें स्पष्टपणे दिसून येते ते ह्मणतात.—

**अतृपमाय सब्बेस सत्ताम सुखकामतम् ।**
**पंसित्वा कमतो मेत्तं सब्बसत्तेसु भावये ॥**

**अर्थः**—आपल्या प्रमाणेच सर्व प्राणीमात्र सुखाची इच्छा करि-तात, असे जाणून क्रमाक्रमानें त्या सर्वांविषयीं प्रेमभाव उत्पन्न करावा.

**सुखी भवेय्यं निदुक्खो अहं निच्चं अहं विय**
**हिताच मे सुखीहोन्तुं मज्झता चथ वैरिनो ।**

**अर्थः**— सदासर्वदा मी सुखी असावें, मी निर्दुःखी असावे, माझ्याप्रमाणे माझे मित्रहि सुखी होवोत, मध्यस्थहि सुखी होवोत, आणि माझे वैरीहि सुखी होवोत.

**इमन्हि गामक्खेताहि सत्ता होन्तु सुखी सदा ।**
**ततो परंच रज्जेसु चक्कवाळेसु जंतुनो ॥**

ह्या आसपासच्या देशांतील आणि ह्या गांवातील सर्व प्राणी सर्वकाळ सुखी होवोत. ह्या राज्यातील प्राणी सुखी होवोत. ह्या विश्वांतील ( सर्व ) प्राणी सुखी होवोत.

**तथा इत्थी पुमाचेव अरिया अनरियापिच ।**
**देवा नरा अपायट्ठा तथा दसादिसासुच ॥**

त्याचप्रमाणे स्त्रिया व पुरुष, आर्य व अनार्य, देव व मनुष्य हे सर्व सुखी होवोत. दुर्गतीप्रत गेलेले प्राणीहि सुखी होवोत. दाही दिशाला सर्व प्राणी सुखी होवोत. गौतमबुद्धानीं वर सांगितल्याप्रमाणे मनुष्यमात्रांनीं या जगामध्ये आपली सुखाची आणि मैत्रीची भावना सदोदित ठेवावी. ह्याच भावनेच्या पायावर अहिंसेची इमारत उभारली आहे. असो. वेदप्रतिपादित यज्ञयागादिकात होणाऱ्या पशुहिंसेच्या निंद्य चालीवर पूर्वीच्या साधूसतांनीं कोरडे ओढण्यास कमी केलें नाही याबद्दल हा दयामय जैनधर्म त्या महात्म्याचें अभिनंदन करतो. उदाहरणार्थः–' **अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः** ' या श्लोकावर टीका करिताना ज्ञानदेवांनीं ह्मटले आहे, ' या याज्ञिकांचा धिवसा मोठा विलक्षण आहे. हिंसेमुळे स्वर्ग मिळेल ही कल्पनाच मुळीं चुकीची आहे. कारण, यज्ञयागादिकांत केलेली हिंसा हें पापात्मक पुण्य होय, त्याचे पर्यवसान शेवटी अधःपातातच व्हावयाचें. '

**' मुख बांधुनि मेंढा मारा । ह्मणती सोमयाग करा ॥**
**कोण जाणें खरें खोटें । भजन चालिलें उफराटे ॥ '**

अशा प्रकारचें आश्चर्याचे उद्गार तुकाराम महाराजांनी हिंसेसंबधानें काढिले आहेत. ‘ **दर्भमुष्टिच्या गर्भि धरुनियां निर्भर पशुंच्या वपा । जाळिसी तिळा तांदुळा तुपा** । असे रामजोशीबुवानी ह्मटलें आहे. यज्ञयागांमधील हिंसेचे मडन करणारे व जुन्या पद्धतीनें वागणारे गृहस्थ पशुवधाचा निषेध करण्यास आज धीटपणें पुढे येऊ लागले आहेत हीहि मोठी आनदाची गोष्ट होय.

ह्यावरून आपल्या ध्यानांत आले असेल कीं, अहिंसेच्या बाबतींत सर्व धर्मांचें सगनमत आहे. ह्याकरितां वनस्पतिआहार सर्व धर्मी यामध्यें सुरू करण्याची चळवळ आपण केली पाहिजे. भारतवर्षामध्यें ह्याच चळवळीच्या शाखा आपण काढून लोकांना मांसाहारापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. एक ‘भारतवर्षीय शाकभक्षणी सभा ’ ( Indian vegeterian Federal union ) स्थापन केली पाहिजे व बिचाऱ्या निरपराधी प्राण्याचे सरक्षण केले पाहिजे. प्राणीमात्रांची हिंसा करणे किती गर्हणीय व पापमूलक आहे हें आता स्पष्ट करून सागण्याची गरज नाहीं.

**यतो मांसाशिषः पुंसो दमो दानं दयार्द्रता ॥**
**सत्यशौचव्रताचारा न स्युर्विद्यादयोऽपि च ॥१॥**

**अर्थः**—इंद्रियदमन, दान, दया, सत्य, पवित्रता, व्रताचार, व बऱ्यावाईटपणाचा विचार हे सगळे सद्गुण मांसभक्षकात नसतात. आपण हिंदु आहात ही गोष्ट ध्यानात ठेवा. आपण हिंदूचे वशज आहांत. आणि हिंदु ( ‘हिं=हिंसा’ व ‘दू=दूर’ ) ह्मणजे ज्यांच्यापासून हिंसा दूर असते ते. “ सिंधूनदीच्या काठी जे प्राचीनकालीं राहत होते ते हिंदु ” असा हिंदु शब्दाचा अर्थ न करितां ज्यांच्यापासून हिंसा दूर असते अर्थात् जे लोक हिंसा करीत नाहींत ते लोक हिंदु होत, असा अर्थ करणे जास्त सयुक्तिक आहे. जे लोक ‘शिन्नळ’ जिव्हेचे दास आहेत तेच लोक ‘ सिंधूनदाच्या तीरी राहणारे ते हिंदुलोक ’ असा अर्थ करितात. आह्मी जैनलोक “ज्या लोकांमध्ये हिंसा प्रच-

लित नाही तेच हिंदु" होत असा अर्थ करितो. व अहिंसेचे तत्व पूर्ण-पणे पाळणाऱ्यानाच हिंदु ह्मणतो. आणि आह्मी केलेला अर्थ सयुक्तिक व योग्य आहे. कारण दया ह्मणते कीं हाच अर्थ बरोबर आहे. जनावरे दयार्द्रतेने व केवीलवाण्या स्वराने ह्मणतात की हाच अर्थ करणे रास्त आहे. सर्वांनी खरे हिंदु अथवा जैन झाले पाहिजे. आह्मी दयामय धर्माच्या उत्कृष्ट तत्वाचे मण्डण करून त्या पक्षाचे समर्थन केले पाहिजे. व हिमालयपर्वतापासून ते रामेश्वरापर्यंत, आणि गुजराथेपासून तें ब्रह्मदेशापर्यंत व तसेच परदेशामध्येहि अशोक राजाप्रमाणे "अहिंसा परमो धर्मः हिंसा सर्वत्र गर्हिता" अर्थात् कोणत्याहि प्राण्याचा वध करू नका, कोणत्याहि प्राण्याला त्रास देऊ नका, हिंसेचा सर्वत्र निषेधच केला आहे व हाच सर्वोत्कृष्ट धर्म आहे. ह्या तत्वाचा डांगोरा पिटवून, आपण ह्या खऱ्या दयामय धर्माची ध्वजा फडकावू या. '**जिघांसन्तं जीघांसीयात्**' अर्थात् 'हतेको हनिये, पाप दोष नहि गनिये' ह्मणजे ज्या प्राण्यांचा वध होणेंच योग्य आहे अशांची खुशाल हिंसा करा असे ह्मणणाऱ्या दयाहीन लोभी पुरुषाच्या ह्मणण्यावर विश्वास ठेवू नका. तसेच यज्ञाकरिता, आहाराकरिता, शिकारीकरिता अथवा दुसऱ्या कोणत्याहि हेतूकरिता कोणत्याहि प्राण्याचा वध करू नका असे आपण शिलेवर व स्तंभावर सोनेरी अक्षरानीं खोदू या. **पुरुषार्थसिध्द्युपाय** ग्रथांत **अमृतचंद्रसूरि** आचार्यांनी ह्मटले आहे---

**अवबुध्यहिंस्यहिंसकहिंसाहिंसाफलेति तत्वेन ।**
**नित्यमवगूहमानैः निजशक्त्या त्यज्यतां हिंसा ॥**

कर्माचे आस्रव रोकण्याला जो माणूस तयार आहे त्याने तत्वदृष्टीनें हिंस्य, हिंसक, हिंसा व हिंसेचे फळ हें ओळखून निरंतर स्वशक्त्यनुसार हिंसेचा त्याग करावा एवढीच **जैनधर्मादर्शाचा** उत्तरार्धं संपविण्यापूर्वी सर्वांना विनंति करून हा लेखक सर्वांची रजा घेतो.

श्री

# परिशिष्ट.

## लेख नंबर १.

आह्मी येथे अकबराच्या फरमानची नक्कल देतों. व माल्कम-साहेबांनीं या विषयावर जे लिहिले आहे त्याचें भाषांतर देतों:—

MEMONS OF CENTRAL INDIA & MALCOLM
VOL II, L. C 135 & 136 ( Foot note. )

An application was made to me to prevent the slaying of animals during the Putchoossur, or twelve days which they hold sacred, and the original Firman of Akber ( carefully kept by their high priest at Oojein ) was sent for my perusal The following is a literal translation of this curious document

IN THE NAME OF GOD, GOD IS GREAT

" Firman of the Emperor Julalo-deen Mahomed Akber, Shah, Padsha, Ghazee.

" Be it known to the Moottasuddies of Malva, that as the whole of our desires consist in the preformance of good actions, and our virtuous intentions are constantly directed to one object, that of delighting and gaining the hearts of our subjects, &c.

" We, on hearing mention made of persons of any religion or faith whatever who pass their lives in sanctity, employ their time in spiritual devotion, and are alone intent on the contemplation of the Deity, shut our eyes on the external forms of their worship, and considering only the intention of their hearts, we feel a powerful inclination to admit them to our association, from a wish to do what may be acceptable to the Deity. On this account, having heard of the extra-

ordinary holiness and of the severe penances performed by Hirbujisoor and his disciples, who reside in Guzerat, and are lately come from thence, we have ordered them to the presence, and they have been ennobled by having permission to kiss the abode of honour.

"After having received their dismissal and leave to proceed to their own country, they made the following request:–That if the King, protector of the poor, would issue orders that during the twelve days of the month Bhodon, called Putchoossur (which are held by the Jains to be particularly holy), no cattle should be slaughtered in the cities where their tribe reside, they would thereby be exalted in the eyes of the world, the lives of a number of living animals would be spared, and the actions of his Majesty would be acceptable to God; and as the persons who made this request came from a distance, and their wishes were not at variance with the ordinances of our religion but on the contrary were similar in effect with those good works prescribed by the venerable and holy Musslman, we consented and gave orders that, during these twelve days called Putchoossur, no animal should be slaughtered

"The present Sunnud is to endure for ever, and all are enjoined to obey it, and use their endeavours that no one is molested in the performance of his religious ceremonies.

Dated 7th Jumad-ul Sani, 992 Hejirah"

पज्रुषणपर्वामध्यें जीवहिंसेची बंदी करावी असा एक अर्ज जैनाकडून माझ्याकडे आला होता. व अकबर बादशहाने दिलेला अस्सल फरमान ( हा फरमान उज्जनी येथे जैनाच्या मुख्य पुजाऱ्यानें मोठ्या दक्षतेनें सांभाळून ठेविला होता ) मजकडे वाचण्याकरिता ह्मणून पाठविला होता. त्याचें खालीं भाषांतर दिले आहे.—

"ईश्वराच्या नांवानें ईश्वर मोठा (श्रेष्ठ) आहे." "**महाराजाधिराज जलालुद्दीन अकबरशाह बादशाह गाजी यांचें फरमान**"

"मालव्यांतील सर्व मुत्सद्दी लोकांना कळविण्यांत येतें कीं, सत्कृत्ये करावींत हीच आमची परमइच्छा आहे. व प्रजेला संतुष्ट ठेवून प्रजेचीं मनें आपल्याकडे नेहमी आकर्षण करून घ्यावींत हाच आमचा मानस आहे.

"आणि ह्यामुळे कोणत्याहि एका धर्मांतील अथवा पंथांतील माणूस आपलें सर्व आयुष्य पवित्र कार्यांत घालवितो, आपला वेळ आत्मध्यानामध्यें खर्च करतो, अथवा केवळ ईश्वराच्या चिंतनामध्येंच तल्लीन झाला आहे असे जेव्हा त्या माणसासंबधानें आह्मी ऐकतो तेव्हा आह्मी त्याच्या पूजेच्या बाह्यस्वरूपाकडे पूर्णपणे दुर्लक्ष्य करितों. व त्याच्या अंतःकरणांतील हेतूचाच फक्त विचार करून त्याची संगति करण्यामध्ये आह्माला अतिशय आनंद वाटतो. आणि ह्याच कारणामुळे नुकतेंच गुजराथेतून आलेले हरिविजयसूरि व त्याचे शिष्य ह्यांचें उग्रतप व असाधारण पावित्र्यासंबंधाचें वर्णन ऐकून आह्मी आमच्या दरबारीं हजर राहण्याचा हुकूम यांना केला आहे. व त्यांना आदरणीय अशा स्थानाचें चुंबन करण्याची परवानगी देऊन त्यांचा योग्य तो सत्कार केला आहे."

"स्वदेशी परत जाण्याची परवानगी घेऊन त्यांनीं खालीं लिहिल्याप्रमाणे प्रार्थना केली. अनाथांचा रक्षक बादशहा यांनी असा हुकूम सोडावा, "भाद्रपद महिन्यामधील बारा दिवसामध्ये ह्मणजे पंचमीपासून तो पौर्णिमेपर्यंत ज्याला जैनलोक पजूषण ह्मणतात व जे दिवस जैनांमध्यें अतिशय पवित्र मानले जातात, जेथे जेथें ह्मणून जैनधर्मीयांची वस्ती आहे तेथे तेथे जीवहिंसा करू नये. असे केल्यानें सर्व जगामध्ये आपली प्रशंसा होईल. व बऱ्याच जीवांचा वध न होता त्यांच्या प्राणांचा बचाव केल्यासारखे होईल. व सरकारचे हे कृत्य परमेश्वराला पसंत

पडेल." व ज्याअर्थी ही विनंति करणारे लोक दूरच्या देशांहून आले आहेत व ज्याअर्थी त्यांची इच्छा आमच्या धर्माज्ञेच्या प्रतिकूल नाहीं, उलट पूज्य व पवित्र अशा मुसलमानांनीं लिहिलेल्या शास्त्रांस धरूनच आहे त्याअर्थी आह्मी त्यांच्या प्रार्थनेला मान दिला आहे व पजूषणच्या बारा दिवसांमध्ये कोठेंहि जीवहिंसा होऊ नये असा हुकूम करीत आहोत.

हा दिलेला ( सनद ) हुकूम नेहमीं अमलांत राहील. व ह्या हुकूमाबरहुकूम सर्वांनीं आपले वर्तन ठेविले पाहिजे. व कोणीहि आपापलीं धार्मिक कृत्ये करीत असताना एकमेकाला त्रास न देण्याचा प्रयत्न करावा असा हुकूम करण्यात येत आहे. मिति ७ जमादुलसानी सन ९९२ हिजरी.

## लेख नंबर २.

आह्मी येथे महाराजा श्रीराजसिंहजी याच्या आज्ञापत्राची नक्कल देतों.

Tod's Rajasthan. VOL I

Appendix No V.—pp. 696 & 697.

Mahrana Sri Raj-Sing, Commanding.

To the Nobles, Ministers, Patels, of the ten thousand ( villages ) of Mewar ( dossebes Mewar-ra, ) according to your stations read !

1 From remote times, the temples and dwellings of the Jains have been authorized, let none therefore within their boundries carry animals to slaughter–this is their ancient privilege

2. Whatever life, whether man or animal, passes their abode for the purpose of being killed, is saved ( amra ).

3 Traitors to the State, robbers, felons escaped confinement, who may fly for sanctuary ( sirna ) to the dwellings ( upasra ) of the Yatis, shall not there be seized by the servants of the Court.

4 The kunchi ( handful ) at harvest, the muti ( handful ) of Keranoh, the charity lands ( doli ), grounds, and houses, established by them in the various towns, shall be maintained.

5. This ordinance is issued in consequence of the representation of the Ric Manoh to whom is granted fifteen Bighas of Adhan land, and twenty five of Malatie The same quantity of each kind in each of the districts of Nimutch and Nimbahira.— Total in three districts, forty five bighas of adhan, and seventy five of mal

On seeing this ordinance, let the land be measured and assigned, and let none molest the Yatis, but foster their privileges Cursed be he who infringes them–the cow to the Hindu–the hog and corpse to the Mussalman.

( By command )

Samvat 1749, Mahsud 5th, A. D. 1693.

Sah Dyal, ( Minister )

**पहा टॉड साहेबांचा ' राजस्थान ' पुस्तक १ लें अपेंडिक्स नं. ५, पृष्ठ. ६९६ व ६९७.**

महाराज श्रीराजसिंह मेवाडच्या दहा हजार गांवच्या सरदार, मंत्री व पाटील याना हुकूम करतात. सर्वांनीं आपापल्या दर्जाप्रमाणें वाचावा.

१ प्राचीनकालापासून जैनांच्या मंदिराना आणि वसतिस्थानांना अधिकार मिळाला आहे. व ह्याकरिता कोणाहि इसमाने त्यांच्या हद्दींत जीववध करू नये. हा त्यांचा पुरातन हक्क आहे.

२ जे जे प्राणी–मग ते मनुष्य असोत वा जनावर असोत–वधार्थ ह्याच्या गृहावरून नेण्यांत येतात ते ते अमर होतात, अर्थात् त्यांच्या जीवाचा बचाव होतो.

३ राजद्रोही, लुटारू अथवा कारागृहामधून पळून आलेले महा-पराधी, जैनयतीच्या उपासरांमध्ये ( गृहामध्ये ) जाऊन जेव्हां शरण येतात तेव्हां त्याना राजाचे नोकर पकडणार नाहीत.

४ हगामाच्या वेळची कुची (मूठभर), करानाची मुठी, धर्मार्थ दिलेल्या जमिनी, व निरनिराळ्या शहरांमध्ये बांधलेली गृहे ह्याचे रक्षण केलें जाईल. हा फरमान ऋषि मुनीच्या ( Ric Manoh ) विनती-वरून काढला आहे. व ह्या ऋषिमुनीना पधरा बिघे धान्याची जमीन, व पचवीस मलेटी धर्मार्थ दिल्या आहेत. नीमच व नीब्रहर येथील प्रत्येक परगण्यामध्ये प्रत्येक जतीला इतकीच जमीन देण्यांत आली आहे. अर्थात् तिन्ही परगण्यामध्ये धान्याचे एकदर पचेचाळीस बिघे व मलेटीचे ७९ बिघे दिले आहेत. हा फरमान हातात पडतां क्षणींच जमीन मोजून देण्यांत यावी. व कोणीहि इसमाने यत्किंचित् त्रास न देतां त्याच्या हक्काचे सरक्षणच करावे. ह्याच्या हक्कांची पाय-मल्ली करणाऱ्या इसमाला धिक्कार असो! हिंदूना गाईची व मुसलमा-नाना सुवरची व प्रेताची शपथ आहे.

आज्ञेने सवत १७४९ महसूद ५ वी ईसवी सन १६९३ शाहदयाल ( मत्री ).

## लेख नंबर ३.

**अकबर बादशहांचे** सुपुत्र **जहांगीर** बादशहा यानेहि आपल्या वडिलाच्याच नियमाचा अवलब करून राज्यासनावर आरूढ होताच जीववध बद होण्याबद्दल आपला एक नवीन हुकूम अमलांत आणला. त्याची नक्कल ' तुजूक जहांगीर ' नामक जहांगीर बादशहाच्या दिन-चर्येच्या पुस्तकातून आह्मी येथे देत आहों.

१ रबिउल अव्वल हा माझ्या जन्माचा महिना असल्यामुळे त्याच्या अठराव्या तारखेपासून माझ्या वयाला किती वर्षे होतील तितके दिवसपर्यंत ह्मणजे एक वर्षाला एक दिवस या हिशेबाने होतील तितके दिवसपर्यंत पशुवध बद करण्यांत यावा.

२ प्रत्येक आठवड्यांत पुढील दोन दिवशी कोणत्याहि पशूचा प्राण घेण्यात येऊ नये; त्यापैकी एक दिवस बृहस्पतिवार हा माझ्या राज्याभिषेकाचा दिवस आहे व दुसरा आदित्यवार हा माझ्या वडिलांचा जन्मदिवस आहे. शिवाय आदित्यवार हा सृष्टीच्या उत्पत्तीचा व सूर्य भगवानाशीं संबंध ठेवणाराहि आहे. माझे वडील या दिवशीं केव्हाहि मासाचे नाव सुद्धां घेत नसत; इतकेच नव्हे तर १५ वर्षांपेक्षां जास्त दिवसांपासून ते स्वत. मांससेवन कधीहि बिलकुल करीतच नव्हते. आणि या दोन दिवशी ह्मणजे गुरुवार व रविवार या दिवशी तर राज्यातील सर्व लोकानीहि मांससेवन करू नये असा त्यांनीं अगदीं निर्बंध केला होता ! येथपर्यंत आह्मी परिशिष्टामध्ये अकबर, जहांगीर आदि बादशहाचे जीवहिंसेच्या मनाईचे फरमान उर्फ हुकूम दिले आहेत.

हल्लींचा दयाळु इंग्रजसरकारचा काळ अकबर व जहांगीरबादशहापेक्षांहि जास्त सभ्यतेचा, सुधारलेला व न्यायनीतीचा समजला जात आहे. शिवाय सध्याचे **श्रीमान् पांचवे जार्ज बादशहा** हे दयाळु, दीनबंधु, क्षमाशील आहेत अशी त्याची ख्याति आहे. हे लवकरच हिंदुस्थानांत राज्यारोहणानिमित्त येणार आहेत. त्यानी वर्षाच्या ३६५ दिवसातून काही दिवस तरी जीवहिंसेची बंदी करावी अशी आमची त्याना सविनय प्रार्थना आहे. श्रीमान् पाचवे जार्ज बादशहा हे राज्यारोहणसमारंभाच्या प्रसंगी जैनप्रजेची ही एवढी विनति मान्य करून बिचाऱ्या मूक प्राण्यांचा शुभाशीर्वाद पदरी बांधून कोट्यावधि भारतप्रजेला प्रसन्न करतील अशी बळकट आशा आहे. त्याचप्रमाणे आमच्या देशी मांडलिक राजानींहि आपापल्या संस्थानांमधून अशाच तऱ्हेचे वर्षांतून कांहीं दिवस जीवहिंसेच्या बंदीचे हुकूम सोडावेत अशी आमची त्याना विनति आहे. विशेषत: या बाबतीत विद्वच्छिरोमणी दयाळु श्रीमन्महाराज **सयाजीराव गायकवाड** हे आपणाकडे नेहमीप्रमाणे अग्रेसरत्व घेऊन अशा तऱ्हेचे जीवहिंसेच्या बंदीचे हुकूम सोडून इतर मांडलिक राजाना व

इग्रज सरकारांना अनुकरणीय असा धडा लौकर घालून देवोत अशी त्या दयाघन वीतराग प्रभूजवळ आमची प्रार्थना आहे.

**लेख नंबर ४.**

आह्मी येथे भागवत स्कध १, अध्याय ४, श्लोक ५ चा उतारा देतों.

**दृष्ट्वा नु यान्तमृषिमात्मजमप्यनग्नं**
**देव्यो ह्रिया परिदधुर्न सुतस्य चित्रम् ।**
**तद्वीक्ष्य पृच्छति मुनौ जगदुस्तवास्ति**
**स्त्रीपुम्भिदा न तु सुतस्य विविक्तदृष्टेः ॥ ५ ॥**

—( भागवत स्कंध १. अ. ४. श्लोक ५. )

**अर्थः**—आपल्या मुलाच्या ( शुकाच्या ) पाठीमागें जाणाऱ्या व्यास ऋषीला पाहून जलक्रीडा करणाऱ्या नग्न अप्सरानीं लज्जेने अगावर वस्त्र परिधान केले. आपल्या नग्न मुलाला पाहून देखील वस्त्र परिधान केले नाहीं यामुळे आश्चर्यचकित होऊन व्यासानीं याबद्दल त्या अप्सरांना प्रश्न केला असतां त्यांनीं उत्तर दिले कीं, हे व्यास, ही स्त्री आहे, हा पुरुष आहे असा आपल्या ठिकाणीं भेद आहे. निर्विकारदृष्टी असा जो आपला मुलगा शुक त्याला हा भेद समजत नाहीं.

**करकृतमपराधं क्षन्तुमर्हन्तु सन्तः ।**